# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

| | | |
|---|---|---|
| १ | फुलें आणि दगड (आ. दु.) | ३ |
| २ | घरट्याबाहेर ( ,, ) | ३ |
| ३ | पहिली लाट ( ,, ) | ३ |
| ४ | स्त्री आणि पुरुष ( ,, ) | २ |
| ५ | सूर्यकमळें ( ,, ) | २॥ |
| ६ | कालचीं स्वप्नें | ३ |
| ७ | आजचीं स्वप्नें | ३ |
| ८ | कलिका | २। |
| ९ | मृगजळांतील कळ्या | २॥ |
| १० | मंजिऱ्या | २। |
| ११ | सायंकाल (आ. दु.) | २॥ |
| १२ | अविनाश | १।।। |
| १३ | मंदाकिनी | १।।। |
| १४ | कल्पलता | ३ |
| १५ | सुवर्णकण | २। |
| १६ | आगरकर व्यक्ति आणि विचार | ३॥ |
| १७ | सहा भाषणें | २ |
| १८ | फुलें आणि कांटे | २। |
| १९ | मराठीचा नाट्यसंसार | ३ |
| २० | हिरवा चांफा (आ. तिसरी) | ५ |
| २१ | दोन ध्रुव ( ,, ) | ५ |
| २२ | पहिलें प्रेम (आ. दुसरी) | ३ |
| २३ | क्रौंचवध ( ,, ) | ५ |
| २४ | पांढरे ढग ( ,, ) | ४। |
| २५ | जळलेला मोहर | ३ |

### साने गुरुजी

| | | |
|---|---|---|
| १ | पुनर्जन्म (आ. दुसरी) | ३ |
| २ | आस्तिक ( ,, ) | ३ |
| ३ | सध्या | ५ |
| ४ | ना खंत ना खेद (कृष्णा हाथीसिंग) | ५ |
| ५ | सोन्या मारुति ? (दु. आवृत्ति) | २ |
| ६ | निळा पक्षी (आवृत्ति दुसरी) | २॥ |
| ७ | गोड निबंध (भाग पहिला) | ३ |
| ८ | गोड निबंध (भाग दुसरा) | ३ |
| ९ | गोड निबंध (भाग तिसरा) | ३ |

### ग. त्र्यं. माडखोलकर

| | | |
|---|---|---|
| १ | अवशेष | २ |
| २ | व्यक्तिरेखा | २। |
| ३ | माझी नभोवाणी | २ |
| ४ | नवे संसार (जप्त) | ४ |
| ५ | चंदनवाडी | ६॥ |
| ६ | नागकन्या | २ |
| ७ | दोन तपें | ५ |

### ना. धों. ताम्हनकर

| | | |
|---|---|---|
| १ | तात्या भा. १ ला (आ. दुसरी) | ४ |
| २ | तात्या भा. २ रा | ३ |
| ३ | निवाडे भा. १ ला | २॥ |
| ४ | निवाडे भा. २ रा | ४ |
| ५ | चकमकी | १॥ |
| ६ | बच्चा नवरा | १॥ |
| ७ | अनेक आशीर्वाद | ३॥ |
| ८ | दाजी भा. १ ला (आ. ति.) | ३॥ |
| ९ | बहीणभाऊ | -।।।- |

### वा. म. जोशी

| | | |
|---|---|---|
| १ | स्मृति–लहरी | २ |
| २ | विचार–लहरी | २। |
| ३ | विचार–विहार | ४। |

### चिं. वि. जोशी

| | | |
|---|---|---|
| १ | आणखी चिमणराव (आ. २री) | ४ |
| २ | वायफळाचा मळा ( ,, ) | ५ |
| ३ | नवें भारूड | २ |
| ४ | स्टेशनमास्तर | २ |
| ५ | नटश्रेष्ठ | -।।।- |

### दत्तु बांदेकर

| | | |
|---|---|---|
| १ | सख्या हरि (आ. दुसरी) | २ |
| २ | नवी आघाडी | १॥ |
| ३ | तूं आणि मी | २। |
| ४ | नजरबंदी | २। |

### प्र. के. अत्रे

| | | |
|---|---|---|
| १ | साखरपुडा | २ |
| २ | ललित वाङ्मय | ३॥ |
| ३ | दूर्वा आणि फुलें | २। |

### ना. म. पटवर्धन

| | | |
|---|---|---|
| १ | हितपत्रें | ३ |
| २ | वा. म. जोशीचरित्र | ४। |

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

**द. र. कवठेकर**

१ अपुरा डाव ३
२ रेशमाच्या गांठी ३
३ आभाळाची सांवली ८

**अनंत काणेकर**

१ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे ( आ. दुसरी ) ३
२ पिकलीं पानें ( आ. दुसरी ) १॥
३ उघड्या खिडक्या १॥

**काकासाहेब कालेलकर**

१ ब्रह्मदेशचा प्रवास १॥
२ भक्ति-कुसुम ३

**य. दि. पेण्ढरकर**

१ प्रापंचिक पत्रें ३
२ घायाळ २

**ना. ह. आपटे**

१ फसगत १॥
२ साजणी ५

**पु. य. देशपांडे**

१ नवें जग ?– २॥

**भाई बेके**

१ रॅायचरित्र– १

**वि. स. खांडेकर** (परिचय लेखक)

१ काव्यज्योति (आ. दुसरी) १

**आनंदीबाई जयवंत**

१ पारंब्या २

**रा. वि. फडतरे**

१ मृगया ४

**लक्ष्मणराव सरदेसाई**

१ ढांसळलेले बुरूज २

**प्रो. वि. ह. कुळकर्णी**

१ व्यक्तिचित्रें २॥

**शकुंतलाबाई परांजपे**

१ भिल्लिणीचीं बोरें ३

**कृष्णाबाई मोटे**

१ मीनाक्षीचें जीवन २।

**र. गो. सरदेसाई**

१ चलतीं नाणीं २

**संपादक आचार्य भागवत**

१ वर्धा शिक्षण योजना ४।

**रा. श्री. जोग**

१ सौंदर्यशोध आणि आनंदबोध ८

**वि. वि. बोकील**

१ बेबीची बहीण ३

**सत्यग्राही**

१ ग्रह आणि तारे– ४॥

**वि. म. भुस्कुटे**

१ स्टॅलिन– ३॥
२ आई ( मॅक्झिम गॉर्की ) ७

**कमलाबाई टिळक**

१ आकाशगंगा २॥

**रामतनय**

१ साखरगोटी ५

**ह. रा. महाजनी**

१ आपलें आर्थिक नियोजन ५

**पं. क्षमा राव**

१ देणगी २॥

**गोपीनाथ तळवलकर**

१ मंगल धाम ३

**श्री. किनरे**

१ प्रकृति दर्शन ५

**प्रो. हॅरॉल्ड लास्की**

१ राज्यशास्त्र प्रवेश २

**बाबुराव गोखले**

१ वारा फोफावला २

**प्रो. एम्. एल्. दांतवाला**

१ आपली राहणी १॥।

**बापू गोखले**

१ निवड ३

**अरविंद गोखले**

१ उन्मेष २॥

**रमातनय**

१ समाजशास्त्र ५

**बिवलकर**

१ नाना पाटील चरित्र १

**एस. एल. आग्रवाल**

१ विद्यार्थ्यांसाठीं विधायक कार्यक्रम १

# पुरस्कार

पुरस्कार लिहावयास मी क्वचितच तयार असतें. परंतु कृष्णा हाथीसिंग लहान होती, तेव्हांपासून मी तिला ओळखतें. तिला नाहीं कसें म्हणूं? तिनें हीं जीं स्मृतिचित्रें लिहिलीं आहेत, त्यांना तिनें आशीर्वाद मागितला. तिचा तो हक्क होता आणि मीं तत्काळ तो मान्यही केला.

१९४२ मधील ९ ऑगस्टचा तो दिवस! तो अशुभ रविवार कोण विसरेल? आणि त्या दिवसानंतरचे ते महिने! कृष्णा घरीं एकटी होती. घरांतील सारीं माणसें कारागृहांत. अशा प्रसंगीं एकान्तांत विरंगुळा म्हणून कृष्णानें हीं स्मृतिचित्रें लिहिलीं.

कृष्णा अद्याप तरुणच आहे. आणि तिनें आपल्या तरुणपणची सारी कथा किती प्रांजळपणानें व मोकळेपणानें सांगितली आहे! येथें आडपडदा नाहीं. सारें सरळ निवेदन! असा प्रांजळपणा अन्यत्र दिसावयाचा नाहीं. तसेंच बाळपणच्या अल्लड व स्वच्छंदी जीवनाचें,

त्या सुखी जीवनाचें कसें सुंदर चित्र रेखाटण्यांत आलें आहे! मोतीलालजींचें घर म्हणजे सुखाचें, संपत्तीचें, सौंदर्याचें माहेर! अशा आनंदधामांत ती वाढली. लहानपणीं कृष्णा हट्टी होती. तिची समजूत घालणें कधीं कधी फार कठिण होऊन बसे. ती बंडखोर होती परंतु हळुहळू घरचें सारें वातावरण बदललें! महान् चमत्कार! ती शांत सौम्य मूर्ति! परंतु अपार सामर्थ्याची! महात्माजी! हो, त्यांनीं चमत्कार केला. जेथें सुखोत्सव सुरू असावयाचे, तेथे महान् त्याग आला. सुखसदनाला समरभूमीचें स्वरूप आलें. प्रखर असा आंतरिक झगडा तेथें सुरू झाला. या सर्वांचें सुंदर वर्णन येथें पाहायला मिळेल. आणि स्वित्झर्लंडमधील तें राहणें! कमला आजारी! त्यावेळचें भावनादर्शन! तसेंच पित्यासह व भावासह फ्रान्स नि इंग्लंड, जर्मनी नि रशिया या देशांतील हिंडणें फिरणें! प्रख्यात क्रान्तिकारकांबरोबर झालेलीं भाषणें, संभाषणें, झालेल्या भेटीगांठी! सारें येथें आहे आणि स्त्रियांच्या तुरुंगांत सत्याग्रही या नात्यानें राहत असतांचे ते अनुभव! आणि ज्याच्याजवळ पुढें जन्माचें नातें जडलें, त्याच्यावर प्रेम कसें जडलें, तें कसें वाढलें, त्याचे लग्नांत परिणयन कसे झाले, यांची सरळ सुंदर प्रांजळ कहाणी! अपरिचित वातावरणांत, नवीन नवीन शहरांत वागतांना मनावर कसे परिणाम होत, कशा प्रतिक्रिया होत, त्यांचेंहि दिग्दर्शन येथें आहे. आणि कृष्णाचे दोन लाडके मुलगे! हर्ष नि अजित! अद्याप कोंवळे, वयानें लहान! ज्यांच्यासाठीं ती मोठ्या कष्टानें राजकीय आंदोलनापासून दूर राहायला तयार झाली! मोठया मिनतवारीनें या लहानग्यांसाठीं तू आगींत उडी घेऊं नकोस असें तिला सांगण्यांत आलें. आणि शेवटीं तिनें दुःखानें ऐकले! अशीं तीं बाळें! या स्मृतिचित्रांमध्ये हें सारें आहे. मधुमधुन ही चित्रें अश्रूंनीं ओलीं झालीं आहेत. प्रियजनांचे चिर वियोग! पित्याचें, मातेचें देवाघरीं जाणें! तसेंच इतर अनेक प्रिय व्यक्तींचें!

कृष्णाची ही जरी स्वतःची जीवनकथा असली, तरी नेहरू घराण्याच्या इतिहासाशीं ती मिसळलेली आहे. नेहरू घराण्याच्या इतिहासाचें जें दिव्य सणंग त्यांतच ही जीवनकथाही विणली गेली

आहे. म्हणून तर बहुजनसमाजाला ही जीवनकथा अधिकच आवडेल, अधिक मोलाची वाटेल, त्यांच्या हृदयाला जाऊन मिळेल आणि नेहरू घराण्याचा इतिहास म्हणजे तरी काय? गेलीं २५ वर्षें नेहरू घराण्याचा इतिहास म्हणजे भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या इतिहासाच नव्हे का? भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यांतून नेहरू घराण्याचा इतिहास वेगळा करतां येणार नाहीं. त्या लढ्याचा एक प्राणमय भाग म्हणजे या कुटुंबाचा इतिहास होय. भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाचें जिवंत प्रतीक म्हणजे नेहरू घराण्याचा इतिहास.

ही जीवनकथा साधी आहे. सारे पडदे उघडे आहेत. वाचकाला जवळ घेणाऱ्या अशा या जीवनकथेंत आपणांस त्या मोतीलालजींच्या व्यक्तिमत्त्वाचें दर्शन होतें! मोतीलालजींसारखा दुसरा मोहरा कोठें शोधावा? मोतीलालजी कुटुंबांचे आधार, कुटुंबावर सत्ता गाज-वणारे; परंतु किती प्रेमळ नि उदार! त्यांचें तें चरित्र किती हृदयंगम व गोड वाटतें! कुटुंबीयांची मोतीलालजींवर किती भक्ति आणि मोतीलालजींची कुटुंबांतील मंडळीवर किती प्रीति! मोतीलालजींमध्यें अनेक थोर गुण होते. परंतु कुटुंबावरची मोतीलालजींची अपार प्रीति हिनें महात्माजींना मोहिनी पडली.

या जीवनकथेंत जवाहरलालांचें निराळेंच चित्र दिसतें! जगाच्या कल्याणाकरितां आवेशानें आणि त्वेषानें लढणारा हा महावीर! परंतु येथें हातांत तरवार नाहीं, अंगावर चिलखत नाहीं. लहान मुलांचे खेळगडी जवाहरलाल येथें दिसतात. आदर्श पुत्र, आदर्श बंधु, आदर्श पति, आदर्श पिता, आदर्श मित्र अशा अनेक-विध संबंधात सुंदर रीतीनें वागणारे जवाहरलाल त्यांचे दर्शन येथें घडतें.

आणि लावण्यमयी शौर्यशालिनी कमला! किती हळुवार हातानें तिचे चित्र येथें रेखाटण्यांत आलें आहे! तिच्या अकाली निधनाची हृदयाला घरें पाडणारी ती कथा! तें जीवन म्हणजे भारताचें भावगीत झालें आहे! तें जीवन म्हणजे भारतीय इतिहासांतील एक पुण्यपुराण झालें आहे!

आणि बहीण स्वरूप ! जिला आपण विजयालक्ष्मी म्हणून ओळखतों. कृष्णाच्या जीवनकथेच्या या भरजरी वस्त्रांत रुप्याच्या तंतूप्रमाणें विजयालक्ष्मीचें जीवन विणलें गेलें आहे. आणि प्रियदर्शनी इंदिरा ! विवाहमंगल वेषांत शोभणाऱ्या इंदिरेचें मुग्धमधुर सुकुमार दर्शन !

परंतु हीं जीं अनेक चित्रें येथें आहेत, त्या सर्वांत मला जर कोणाचें चित्र चटका लावीत असेल, तर तें मोतीलालजींच्या पत्नीचें ! जवाहरलालांची ती माता—तिचें चित्र मला मोलाचें वाटतें. प्रेम आणि श्रद्धा यांनीं तिच्या जीवनांत धैर्य नि सहनशीलता यांचा मधुर चमत्कार निर्माण केला. एखाद्या हस्तिदंताच्या मंजुषेंत मोलाचें रत्न जतन करून ठेवावें, त्याप्रमाणें जिची काळजी घेण्यांत येत असे, जिच्यावर प्रेम केलें जात असे, तरुणपणांत जी अशक्त व नाजुक होती, आणि पुढेंहि जी तशीच दुबळी राहिली; अशी ही अबला ! परंतु तिच्या जीवनांत केवढी क्रान्ति ! वृद्धदशा आलेली, प्रकृति अशक्त ! परंतु अखंड रत्नज्योतीप्रमाणें स्वातंत्र्याच्या संकटमय पर्वतावर चढून जाणाऱ्यांना, त्या सरळ सोट पडाहावर पावलें रोवीत स्वातंत्र्याकडे जाणाऱ्यांना जवाहरलालांची ती वृद्ध दुबळी माता स्फूर्तीचा सदैव प्रकाश देणारी ज्योति बनली !

आणि मातेच्या बहिणीचें, मावशीचें तें अखेरचें ओझरतें दर्शन ! किती दिव्य नि महनीय ! ती बालविधवा मावशी ! परंतु तिनें आपलें सारें आयुष्य नेहरू घराण्यासाठीं अविश्रांतपणें दिलें ! बहीण देवाघरीं गेली असें पाहून, शेवटचें कर्तव्य करून या मावशीनें आपला देह खालीं ठेवला. २४ तासहि झाले नव्हते: तों बहिणीमागून ही बहीणहि देवाघरीं गेली ! जीवनांत वा मरणांत कोठेहि वियोग नको.

मानवी जीवनांत छायाप्रकाशांचा खेळ असायचाच. कधीं प्रसन्न स्वच्छ प्रकाश, कधीं अर्धवट प्रकाश; कधीं अंधुक प्रकाश तर कधीं कृष्णवर्ण गंभीर छाया. या प्रस्तुत जीवनकथेच्या चित्रांत हृदय हलवणाऱ्या या कौटुंबिक इतिहासांत हे सारे रंग आहेत.

छापलेला शब्द येथें संपेल; परंतु नेहरू घराण्याचा जिवंत इतिहास पुढें जातच राहील. देशभक्तीची दिव्य परंपरा प्रख्यात पितापुत्रांनीं निर्माण केली आहे. त्यांच्या पाठीमागून येणाऱ्या नवीन पिढ्या ही थोर परंपरा आदरानें हृदयाशीं धरतील आणि तें योग्यच होय.

—सरोजिनी नायडू

# प्रस्तावना

थोर चित्रांना चौकट वेताची असावी. चौकट वेताची असण्यातच गोडी आहे, सौंदर्य आहे. कारण भडक नसणारी साधी सुंदर चौकट स्वतःकडेच प्रेक्षकाच्या दृष्टीला ओढून न घेतां चित्रांतील सौंदर्याकडे तिला वळवीत असते. कृष्णा हाथीसिंग जीवनकथा सांगत जाते आहे. अगदीं जरूर तेथेंच तिनें थोडें भाष्य केलें आहे. समासांत बाजूला थोडें लिहून ठेवावें तसें हें भाष्य आहे. जीवनकथा स्वतःचा अर्थ स्वतःच सांगत आहे. हा चित्रपट आपोआप उलगडत आहे. ही जीवनकथा म्हणजे एका मोठ्या घराण्याची जणूं महान् नाट्यकथा आहे. या नाटकांत ज्या व्यक्ति आहेत, जीं पात्रें आहेत, ती इतिहासांत सामील झाली आहेत. या इतिहासांत आपण हिंदुस्थान बघतो. हा इतिहास भारताला आकार देत आहे. आनंदभवन—कोट्यवधि-लोकांच्या हृदयाचें तें प्रतीक आहे, कोट्यवधींच्या आशांचें व आनंदाचें स्थान आहे. भारतवर्षभर घोंघावत जाणाऱ्या महान् चळवळी, त्या सर्वांचे उगम या आनंदभवनांत आहेत. येथून स्फूर्ति, येथून प्रकाश हें महान् विद्युत्केन्द्र, नवनिर्मितीचा हा जो महान्

स्रोत, महान् प्रवाह, तो जागृत होऊं पाहणाऱ्या राष्ट्राच्या सर्व दुःखांना, सर्व हालअपेष्टांना, सर्व वेदनांना विसरवून उसळतच राहतो! या नवनिर्मितीच्या प्रकाशांत हें जागृत राष्ट्र सर्व दुःखांना विसरतें. अशी एक महान् सृजनात्मक शक्ति आनंदभवनातून राष्ट्राला मिळत आली आहे. येथें उद्यानाची, हसण्याखेळण्याचीं चित्रें आहेत; प्रभातकाळच्या प्रसन्न रामप्रहरचीं वर्णनें आहेत; आणि या रमणीय आनंदभवनावर, गजबजलेल्या या गोकुळावर, राष्ट्राच्या पुंजीभूत अशा इच्छाशक्तीची मध्यान्हकाळची प्रखर ज्योति प्रकाश पाडीत येते, हें आनंदभवन प्रदीप्त होते; राष्ट्राच्या भवितव्यांतील महान् घटना, दुःखवेदनांनीं भरलेल्या घटना; त्याच्या छाया येथे येतात. हें आनंदभवन खडबडून जागें होतें. महान चमत्कार, थोर आश्चर्य! या जीवनकथेंत शांतप्रशांत अशींहि चित्रें आहेत. तेथे गडबड नाही. धावपळ नाही. एक प्रकारची गंभीर शांति! ते प्रियजनांचे चिरवियोग; ज्या वियोगात सारें राष्ट्र भागीदार होतें. अशा वियोगांचीं तीं चित्रें! खिडक्यावर पडदे सोडले आहेत! मूक गंभीर चित्रें! कृष्णा–नेहरू घराण्यांतील ही मुलगी–ती आपल्या या माहेराला भक्तिपूजा अर्पण करीत आहे. आणि ही भक्तिमय पूजा अर्पण करतांना ती आपणांस सर्वत्र नेते. सज्जातून नेते, दिवाणखान्यांतून नेते; सर्व खोल्यातून ती आणांस हिंडविते. त्या खोल्यातून काय दिसतें? तेथें आत्मसंशोधन चाललेलें दिसेल; धैर्यानें नवीन उद्योगांचे सुरू होणारे आरंभ दिसतील. या जीवनकथेंत साधें घरगुती वातावरण आहे. परंतु त्यांत विचाराचे, बुद्धिवादाचेंहि मधुर मिश्रण आहे. अशी संयमी व प्रमाणशील कला येथें आहे. आणि आपण घराच्या दरवाजांतून जरी शेवटी बाहेर पडलो, तरी ह्या पुस्तकामुळें जी जागा आपल्याला अत्यंत आवडूं लागलेली असते, त्या जागेपासून आपण मनानें दूर जाऊं शकत नाही. त्या प्रिय भवनाभोंवती, आनंदभवनाभोंवतींच आपण घुटमळत राहतों, मनानें प्रदक्षिणा घालीत राहतों.

पितापुत्राची येथें जीं चित्रें काढण्यांत आलीं आहेत, तीं संपूर्ण आहेत. पितापुत्र आधींच विश्वविख्यात आहेत. परंतु कृष्णानें घरचा, जवळचा प्रकाश या दोन थोर व्यक्तींवर टाकला आहे. त्यामुळें हे पितापुत्र डोळ्यांत कसे भरतात! त्यांच्यातील मानवता कशी दिसून येते! खरेखुरे असे ते आपणांला वाटूं लागतात. कृष्णानें आपला विषय सुंदर रीतीनें रंगविला

आहे. असें करतांना कोणती कला तिच्याजवळ होती ? वर्ण्य वस्तूविषयींची खोल सहानुभूति, वर्ण्य विषयाशीं एकरूप होणें, त्याविषयीं आपलेपणा वाटणें, वर्ण्य वस्तूचे सम्यक् ज्ञान असणें याहून अधिक काय पाहिजे ? हें ज्याच्या-जवळ आहे, त्याला आणखी कोणती कला मदतीस हवी ? कृष्णा हाथी-सिंगजवळ ही पुंजी आहे. आठवलेले संवाद, हृदयंगम अशी अपूर्व पत्रें, घटनांचीं भरभर झरझर केलेली वर्णनें, अशा रीतीनें पंडित मोतीलाल व जवाहरलाल यांची चित्रें ती रंगवीत जाते. आणि अखेर आजच्या घटके-पर्यंत जीवनकथा आणून सोडते. आणि आजची घटका अशी आहे कीं ज्या वेळेस त्यांच्याविषयीं पूर्वीचें जें सांगतां आलें, जे सांगणें शक्य झालें, त्यापेक्षांहि फारच कमी सांगतां येई ! जवाहरलालाविषयी येथें हे जें संयमी वर्णन आहे, हा जो झटपट प्रकाश त्यांच्यावर टाकलेला आहे, त्यामुळें वाचक जरा चिडतो. वाटते, अधिक कां नाहीं लिहिलें ? परंतु यामुळेंच जें कांहीं लिहिलें आहे, त्याला एक प्रकारचें अवर्णनीय असें तेज आलें आहे. जवाहरलालांच्या अलीकडील पत्रांतील येथे उतारे आहेत. त्यातील उदात्तता अतुलनीय आहे; त्यांतील क्षमावृत्ति अनुपमेय आहे; केवळ कला या दृष्टीनें पाहिलें, तरीहि हे उतारे अपूर्व वाटतील; त्यांतील उतारे वाचतांना एक प्रकारचा दुःखमय आनंद होत असतो.

या पुस्तकात अविस्मरणीय अशीं शब्दचित्रें, व्यक्तिचित्रें आहेत. विशेषतः आईचें व मावशीचें चित्र दोघांवर लेखिकेचें अपार प्रेम नि भक्ति. त्यांचीं चित्रें रेखाटतांना किती कोमलता दाखविली आहे. त्या महान् आनंदधामांत ही चित्रें सदैव राहतील. आणि आपल्या कल्पनेच्या मंदिरातहि ती पूजिली जातील. कुटुंबांतील मंडळीव्यतिरिक्त इतर व्यक्तींचींहि शब्दचित्रें त्या त्या वेळच्या अर्थपूर्ण अशा अनुभवांच्या संदर्भात येथें सुंदर रेखाट-लेलीं आहेत.

एका अर्थानें हें पुस्तक जरी राजकीयच म्हटले पाहिजे; तरी पण गंमत ही कीं याला राजकीय असें म्हणतां येणार नाही; याचें कारण हें कीं ज्या वेळी राजकारण आपल्या या सृजनशील जीवनाशी, नवीन नवीन निर्माण करू पाहणाऱ्या जीवनाशी एकरूप होतें, त्या वेळीं राजकारण केवळ राजकारण राहत नाही. मग राजकारण म्हणजेच महत्त्वाची घटना असें आपण म्हणू शकत नाही. या पुस्तकात नाना घटना आहेत, अनेक

घडामोडी आहेत. आपल्या राष्ट्राच्या सांस्कृतिक रंगभूमीवर राष्ट्राचें भवितव्य जसजसें घडत जातें, तसतसे नानाविध प्रसंग, नाना महान् कर्में, उद्योग आपणास भराभरा येथें दिसूं लागतात. परंतु या साऱ्या गोष्टी मुद्दाम ओढून ताणून येथें आणल्या आहेत असें दिसणार नाही. सर्व राष्ट्राला हेलावणारे प्रसंग, परंतु या जीवनकथेच्या इतिहासांत अपरिहार्य म्हणून सहजपणें ते येतात व वर्णिले जातात. ज्या वेळी लाखों लोक नवीन रामायण महाभारत निर्मित असतात, महान् घटनांत भाग घेत असतात, शौर्यधैर्याच्या गोष्टी ठायींठायीं प्रतिदिनीं घडत असतात, अशा वेळीं केवळ राजकीय कल्पनांचें महत्त्व मानीत बसणें, या केवळ राजकीय धमक्या आहेत असें मानणें लज्जास्पद होत असतें. आणि ज्या कुटुंबांतील माणसांनीं आपापलीं जीवनें ध्येयार्थ वाहिलेली आहेत, ज्या कुटुंबांतील माणसें अग्निदिव्यांतून जात आहेत, वैयक्तिक नि राष्ट्रीय अशा मोठाल्या जबाबदाऱ्या शिरावर घेत आहेत, असें जीवन म्हणजेच रोजचें जगणें, रोजचें स्वधर्मकर्म, असें ज्यांचें झालें आहे, अशा कुटुंबांकडे तर केवळ राजकीय दृष्ट्या बघणें, केवळ सरकारला या धमक्या आहेत, वगैरेंच्या दृष्टीनें बघणें हें तर अधिकच लज्जास्पद होय. अति महत्त्वाच्या घटनांविषयीं लिहितांनाहि कृष्णा हाथीसिंग निर्मळ सरळ दृष्टीनें लिहीत आहे. तिची एक प्रकारची अनासक्त, अनाग्रही वृत्ति आहे. देशाच्या विशाल ध्येयाशीं एकरूप झाल्यानेंच अशी अनासक्त वृत्ति येऊं शकेल. जणुं या साध्या सामान्य घटना आहेत, अशा रीतीनें ती हें सारें सांगते, लिहिते. व्यक्तींच्या नि राष्ट्राच्या बाबतीत झालेले अन्याय सांगताना कृष्णाला सात्त्विक संताप चढतो. ती जे लिहिते, त्यात एक प्रकारचा खोल आत्मविश्वास दिसतो. परंतु त्या त्या गोष्टींच्या आतरिक भावनांशी ती इतकी एकरूप झालेली असते, की या घटना या आत्मचरित्रात कशाला असे कोणालाच वाटत नाहीं. वाचकहि त्या त्या घटनांशीं एकरूप होतात. त्यांची मनें ओढली जातात. बाह्य घटनांचें वर्णन करतांना त्यात स्वतःचा जिव्हाळा ओतणें, त्या घटनांत स्वतःचे जीवन जणुं मिसळणे ही कला कृष्णाला साधली आहे, आणि या थोर शक्तीचें उदाहरण म्हणून लखनौच्या मध्यवर्ती तुरुंगातील वर्णन वाचा. त्या तुरुंगांत दुसऱ्या पुष्कळ अभागिनी होत्या. देशावर प्रेम करण्याच्या अपराधासाठीं त्या आलेल्या नव्हत्या. निरपेक्षपणें व विशुद्धतम प्रेमाने आपल्या देशांतील बंधुभगि-

नीची सेवा करण्याच्या अपराधास्तव त्या तेथें आलेल्या नव्हत्या. त्या दुर्दैवी भगिनी तेथें भयंकर गुन्ह्यासाठी शिक्षा भोगीत होत्या. आणि कृष्णा त्यांची कथा सांगते.कृष्णानें सांगितलेली ती कहाणी म्हणजे विशुद्ध वाणीचा परमोच्च विकास होय ! एक प्रकारची अति उदात्तता तेथें प्रतीत होते. कृष्णानें जें जे तेथे पाहिले, जें जे अनुभवलें, आजच्या अर्धवट सुधारलेल्या काळांतील नाना प्रकारच्या गुंतागुंतीच्या प्रश्नाचें तिने केलेलें बौद्धिक पृथक्करण, तें सारें येथें अशा काही रीतीनें सांगण्यात आलें आहे, की तें मुळांतच वाचावें. अनुपमेय असें तें आहे. त्याची नक्कल करतां येणार नाही. या कथेत राजकारण आहे, समाजशास्त्र आहे; सारें आहे; काय वाटेल तें म्हणा. परंतु एकदरींत बचुलीची ती करुण गंभीर कथा वाचून काय वाटते ? आपण तत्त्वाची व उद्देशांची भ्रामक वर्गवारी करीत असतों. समग्र मानवजातीचा विचार आपणाला शिवत नसतो. बचुलीची गोष्ट, तिची ती सत्यकथा आपणांस या कृत्रिम भेदांच्या पलीकडे नेते. कृत्रिम भेद निर्मून मानवजातीच्या विराट हृदयाच्या स्पंदनापासून आपण पळूं पहात असतो. परंतु बचुलीची कथा आपणास समग्र मानवजातीचा विचार करायला लावते. बचुली ! गरीब विचारी बचुली ! अंधारांत बुडालेली, चिरडलेली ! आणि बेजबाबदार नि निर्दय अशी आजची समाजव्यवस्था त्या अभागिनीला जन्मठेपीची शिक्षा देते ! बचुलीचा तो दुःखदग्ध आत्मा आपणास पुकारतो. तिच्या पुकाराला आपण काय उत्तर देणार ? बचुलीत सुधारणा व्हावी म्हणून आपण निराळेच सुसंबद्ध असे उपाय योजूं ; सूड-बुद्धीने तिला तुरुंगात पिचत ठेवणार नाही. ज्या समाजाला थोडीफार तरी माणुसकी आलेली आहे, असा समाज अशा भगिनीला निराळ्याच रीतीनें वागवील आणि शेवटीं तुरुंगाच्या उच्च भिंतीचा त्या दृश्यावर पडदा पडतो. ग्रंथकर्त्री त्या लोखंडी दाराकडे शेवटचा दृष्टिक्षेप करते. त्या दाराआड त्या अंधुक आकृति आपलीं जीवनें कंठित राहतील; कृष्णाचे पाय बाहेरच्या रस्त्यावर येतात. ते पाय पुढे जाऊं इच्छित नसतात. तो रस्ता तिला स्वप्नवत् वाटतो. खरा रस्ता कोठें आहे ? कृष्णानें हें जें चित्र येथें रेखाटलें आहे, तें जिवन्त वाटतें, प्राणमय वाटते. तो अनुभव मूर्तिमंत होऊन आपल्या डोळ्यांसमोर उभा राहतो. कृष्णाचा वैयक्तिक अनुभव विश्वाचा होतो. या अशा कायद्यात सुधारणा व्हावी, कैदी सुटल्यावर बाहेर

त्याला साहाय्य मिळावें, म्हणून कृष्णा प्रयत्न करते. तिच्या प्रयत्नांना पूर्ण यश येणें अशक्य आहे. परंतु कृष्णाच्या या प्रयत्नामुळें आपणांसमोर केवढें मोठें कार्यक्षेत्र उभें राहतें, जबाबदारीचें केवढे क्षितिज डोळ्यांसमोर दिसूं लागतें !

या पुस्तकातील ओळ न् ओळ जिवंत आहे. म्हणून वाचकाचें हृदय कृतज्ञतेने भरून येईल. कलावंताचे रंगीत सजीव ठसे येथे आहेत. मनांतील सारें बाहेर पडावें, अशी येथें धडपड आहे. कुशलतेपेक्षां उत्कट उद्गारांची येथे धडपड आहे. पूर्वीची तयारी येथें नाही. भरलेलें हृदय येथें भराभर रितें होत आहे. म्हणून येथील लिखाणात एक प्रकारची सहजस्फूर्ति आहे; तें एकदम स्फुरल्यासारखें वाटते. सजीव वस्तूंपासून हे लिखाण दूर नाही करता येणार. हे जिवंत लेखन आहे. येथें काटेकोर मुद्दे नाहीत; ते असलेच तर ते सूचित केलेले आहेत. आणि मिळण्यासारखें सारें साहित्यहि गोळा केलेले नाही, त्याची वर्गवारी केलेली नाही. आतरिक धडपडीची, आतरिक साहसाची तालबद्धता या लिखाणांत आहे. या पानावर हें दृश्य, तर दुसऱ्या पानावर दुसरें ! सारखे देखावे बदलत आहेत. जसजसें आठवत गेलें, तसतसें विचारानें तें उचललें. स्मृतीचा मागोवा घेत विमर्शिणीबुद्धि जात आहे. आणि त्यामुळे मोठी गमत वाटते. आपण भरपूर आनंद लुटतो. आणि युरोपातील ती परिभ्रमणें ! किती हृदयंगम आहेत ती ! युरोपातील तिचे काम, निरनिराळ्या प्रसंगांतून निभावणें, आणि कलात्मक असे तिचे स्वच्छंद छंद ! आणि स्वतःच्या मुलाबाळाविषयी लिहिणें; गृहजीवनाविषयी लिहिणे; गाजावाजा न करता सेवा करणाऱ्या पतीची थोडीशी ओळख; पतिपत्नीमध्येंच संविभक्त अशा रहस्याची कल्पना देणें हें सारे वाचतांना किती आनंद होतो ! कृष्णा हाथीसिंग आपणांस या गोष्टी आणि इतरहि पुष्कळशा गोष्टी देऊ शकली यासाठी वाचक कृतज्ञता दाखविल्याशिवाय राहणार नाही.

प्रस्तुतची आत्मकथा म्हणजे साध्या चौकटीतील सुंदर चित्र असें आपण म्हणूं. ज्या हातानें हें प्रस्तुतचें रम्य चित्र रेखाटलें आहे, त्याच हाताकडून आणखी दुसरी अशींच रमणीय चित्रें रेखाटलीं जाणें शक्य नाही असें नाही. हें पुस्तक वाचून तर अशी आशाअपेक्षा

अधिकच बळावते. कलेच्या दृष्टीनें पाहूं तर हें चित्र निर्दोष आहे; परंतु या पुस्तकांत जीं अनेक महनीय जीवनें आलीं आहेत, तीं जीवनें अद्याप पुढें जातच आहेत; नवीन नवीन भाग जोडीत आहेत. आणि हे नवीन भाग, जीवनकथांतील हे नवीन सर्ग साऱ्या राष्ट्राच्याच नव्हे, तर साऱ्या विश्वाच्या मालकीचे राहतील. या पुस्तकात जेव्हा हे पुढील भाग लिहिले जातील, तेव्हां अतिपवित्र व्यक्तींचें थोर नांव कलंकित करण्यासाठी जें भ्रामक तमोमय धुकें आज मुद्दाम निर्माण करण्यांत आलेलें आहे, तें नाहींसें झालेलें असेल. त्या वेळीं आकाश अधिक निर्मळ झालेलें असेल. कांहीं सत्यकथांचें स्वरूप अधिक स्वच्छपणें मांडणें त्या वेळीं शक्य होईल. यंत्रारूढ शक्तींना हें सत्य कायमचें कधींही दडपून ठेवतां येणार नाहीं. आपल्या हृदयमंदिरांत ज्या अनेक व्यक्ति आधीच सिंहासनारूढ झालेल्या आहेत, त्या व्यक्ति त्या वेळी आपल्या घरी परत आलेल्या असतील. आपण त्यांचें त्या वेळी स्वागत करूं. थोर मानवी ध्येयासाठीं त्या व्यक्ति सारख्या अविश्रांतपणे धडपडत आहेत; प्रतिकूल शक्तीशी सहकार करता यावा म्हणून अपरिमित असा वैय्यक्तिक स्वार्थत्याग त्यांनी केलेला आहे, आणि असें करून भविष्यकालीन संस्कृतीचा नि सुधारणेचा पंथ त्यानी उजळून ठेवला आहे. परंतु आज आपण हें पुस्तक दुःखानें वाचूं. मन उद्विग्न आहे. परंतु आध्यात्मिक जागृतिहि येत आहे, अशा अवस्थेंत हें पुस्तक आज आपण वाचूं. आणि वाचून धीर धरूं; जीवनाचें अमृत-पाथेय मिळवूं. आजच्या युगांतील जो महान् नवविधाता आहे, जो आपणां सर्वांसाठीं वेदना भोगीत आहे, त्याच्या दिव्य उदाहरणाने, आणि त्याच्या अविचलित अशा नैतिक ध्येयानें संस्फूर्त अशा दुसऱ्या थोर व्यक्तीच्या जीवनकथानींहि हे अमृतपाथेय साऱ्या संत्रस्त मानवजातीलाच मिळाले आहे. जी श्रद्धा कर्तव्यकर्मांपासून अविभक्त असते, ज्या श्रद्धेचे "प्रेमाचे परमोच्च धैर्य" असे रवीन्द्रनाथांनी वर्णन केले आहे, त्या श्रद्धेची ग्वाही प्रस्तुतचे आत्मकथात्मक पुस्तक देत आहे.

—अमिय चक्रवर्ति

## या पुस्तकाविषयीं

किती तरी दिवस पुस्तक लिहावें असें माझ्या मनांत होतें. तीन वर्षांपूर्वी माझ्या पतीनेंहि तें लिहिण्याविषयीं मला म्हटलें. परंतु त्या वेळीं मी तो प्रयत्न केला नाहीं. १९४१ च्या नोव्हेंबरमध्यें राजाला अटक झाली. मी एकटीच बाहेर राहिलें आणि प्रयत्न करायचें ठरविलें. दोनचार प्रकरणें लिहिलीहि; परंतु माझा मोठा मुलगा विषमानें आजारी पडला. पुन्हा लिहिणें तसेंच थांबलें. कसें तेव्हां लिहिणार ? पुढे राजा सुटून आला. बाळ अत्यवस्थ होता. किती तरी महिने काळजीचे असे गेले. पुढें बाळ बरा झाला. जरा हायसें वाटलें. परंतु पुस्तकाचें काम पुन्हां सुरू करण्याचें कांहीं नीट जमेना.

एक वर्ष असेंच गेलें. पुन्हां राजा तुरुंगांत गेला. या वेळीं बेमुदत अटक होती. आणि घरांत पुन्हां मी एकटी. पहिले कांहीं महिने कठिण गेले; सारेंच अस्वस्थ व अशाश्वत होतें; कोणतेंहि काम करण्यासाठीं मनाची घडी बसेना. परंतु हळुहळू नवीन वस्तुस्थितीचीहि संवय झाली. हे कठिण दिवसहि अंगवळणीं पडूं लागले. वेळ कसा दवडायचा तें समजत नसे. कांहीं तरी मनाला विरंगुळा म्हणून मीं हें पुस्तक पुन्हा लिहायला घेतलें. पुन्हां नव्यानेंच सुरू केलें. किती तरी विचार, किती तरी आठवणी हृदयांत

उचंबळत. त्या साऱ्या आठवणी नि ते विचार मी लिहून काढूं शकलें. आणि त्यामुळें माझे हे दीर्घ दुःखदायक दिवस, एकटीला काढावे लागलेले हे किती तरी महिने मला सुसह्य झाले. माझा एकटेपणा नाहींसा झाला. सर्व प्रिय मंडळी सभोंवतीं आहेत असें जणूं लिहितांना वाटे. हें पुस्तक लिहितांना पतीचें मार्गदर्शन नाहीं याची पदोपदीं आठवण होई आणि चुकल्यासारखें वाटे; तसेंच माझ्या भावाची कठोर टीकाहि ऐकायला मिळाली नाहीं. त्या कठोर टीकेचें मीं आनंदानें स्वागतच केलें असतें. परंतु हे सारें शक्य नव्हतें. तथापि आमचे एक स्नेही आहेत. ते नेहमी मला मदत करीत. त्यांनीं बहुमोल सूचना दिल्या. पुस्तक पुन्हां सारें नीट तपासून पाहतांना त्यांचें मार्गदर्शन झालें. आणि म्हणूनच इतक्या लौकर हें पुस्तक मी पुरें करूं शकलें. कधीं कधी तर मी फार विषण्ण असें; कल्पनातीत दुःखी असें; जणूं गळून गेलेली असें. अशा वेळीं हे पुस्तक पुरें करावें असें मनांत येत नसे; परंतु हा आमचा चिर-मित्र उत्साह देई; माझ्या पुस्तकाचें तो कौतुक करी; पुरें करा, खरेंच पुरें करा, असें म्हणे; सल्ला देई, साहाय्य देई. खरोखरच या मित्राची अपार मदत झाली !

डॉ. अमिय चक्रवर्ति यांचीहि मी अत्यंत ऋणी आहें. त्यांना मी "अमियदा" असें म्हणत असतें. अमियदा हे माझे 'गुरु' आहेत. किती तरी वर्षे ते मला सारखें सांगत होते कीं स्वतःच्या आठवणींचे पुस्तक लिही म्हणून; परंतु आपल्याला हे शक्य होणार नाहीं असें मला सदैव वाटे; परंतु अमियदांना मात्र वाटे की मी लिहूं शकेन. त्यांची माझ्या शक्तीविषयीची ती अविचल श्रद्धा पाहून मला कसेसेंच वाटे. मी त्यांचें म्हणणे ऐकत नसें. तरीहि प्रत्येक पत्रातून अमियदा ही गोष्ट लिहीतच असत. आणि येरवडा तुरुंगाच्या भयाण भिंतीपलीकडून राजाहि उत्तेजन देत होता. शेवटीं हो-ना करतां करता मी हे काम अंगीकारलें. आत्मविश्वास फारसा नव्हता, तरीहि मी लिहिण्याचें ठरविलें.

माझ्या या पुस्तकाला प्रस्तावना लिहून अमियदांनीं माझें अभिनंदन केलें आहे, माझा गौरव केला आहे. त्यासाठी त्याप्रमाणेंच त्यानी जे प्रोत्साहन दिलें, मार्गदर्शन केलें, त्यासाठीहि मी त्याची चिरऋणी आहे.

आणि देवी सरोजिनी प्रकृति बरी नसताहि त्यांनीं दोन शब्द लिहिले, याबद्दल त्यांचीहि मी ऋणी आहें. कृतज्ञतापूर्वक त्यांचे आभार मानणें

माझें कर्तव्य आहे. सरोजिनीदेवींचा व माझा जुना परिचय आहे. आमच्या कुटुंबाविषयीं त्यांना किती प्रेम व आत्मीयता वाटते, तें सर्व जगाला माहित आहे.

बचुलीची गोष्ट पुन्हां या पुस्तकांत प्रसिद्ध करायला परवानगी दिल्याबद्दल स्टेट्समन पत्राचे, विश्वभारतींत प्रसिद्ध झालेला " स्मृति " हा लेख येथें पुन्हां छापायला परवानगी दिल्याबद्दल " विश्वभारती "चे नि " दोन बहिणी " हा लेख पुन्हां छापायला परवानगी दिल्याबद्दल " हिंदु पत्रा "चे आभार मानतें.

## दुसऱ्या आवृत्तीविषयीं

पहिली आवृत्ति कांहीं आठवडयांतच संपली. दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करायला विलंब लागला, यासाठीं मी नि माझे प्रकाशक दिलगीर आहोंत.

परंतु जरा उशीर झाला हें एक परी बरेंच झालें. कारण अनेक परीक्षकांनीं आपलीं परीक्षणें लिहिलीं; वाचकांनीं आपलीं मतें कळविली. त्याच्या उत्साहवर्धक परीक्षणांनीं आणि विधायक व साहाय्यक टीकेनें माझा फायदाच झाला आहे. त्यांची मी आभारी आहें. या दुसऱ्या आवृत्तींत त्यांच्या सूचनांचा मी फायदा करून घेतला आहे. परं सर्वांहून अधिक प्रोत्साहन व साहाय्य कोणाचें मिळाले असेल तर तें माझ्या भावाकडून. पुस्तकाची एक प्रत त्याला मी पाठवूं शकलें. कांही तारखा चुकीच्या आहेत असें त्यानें दाखविलें; कांहीं हकीगतींतील माझी स्मृति त्यानें अधिक ताजी केली. या पुस्तकाविषयींचे त्याचे विचार मीं अन्यत्र दिले आहेत. माझ्या वाचकाना माझ्या भावाचे विचार कळावेत अशी मलाहि फार इच्छा आहे. परंतु तो स्वतःचे विचार जितक्या चांगल्या रीतीनें मांडतो, तितक्या चांगल्या रीतीनें ते मी माडूं शकणार नाहीं. आणि या पुस्तकाविषयी त्याला तर किती तरी सांगायचें आहे. म्हणून तें मी अन्यत्र वाचकांसाठीं प्रसिद्ध केलें आहे.

# नान्दी

"नाहीं, अद्याप रात्र नाही
दोन तीन पहारेकरी अद्याप खडे आहेत;
परंतु अंधार तर फारच वाढत आहे, आणि
हे पहारेकरी, त्यांचीहि कदाचित कत्तल व्हायची,
प्रभात पाहण्यापूर्वीच कत्तल"

—पिअरी व्हॅा पॅासे

१९४२ ऑगस्टची ९ तारीख. पहांटेचे बरोबर पांच वाजले होते आणि अकस्मात् मुंबईचे पोलिस जवाहर आणि राजा यांचीं पकडवॉरंटें घेऊन आले. अखिल भारतीय कॉंग्रेस समितीच्या बैठकांमुळे कामाचा खूपच ताण पडलेला होता आम्ही सारीं दमून गेलेलीं होतों; गळून गेलेलीं होतों. रात्रीं बराच वेळपर्यंत आम्ही सारीं बोलत बसलों होतों; नुकत्याच घडलेल्या घडामोडींची चर्चा करीत होतों; रात्रीचे बारा वाजले नि पाहुणे मंडळी निघून गेली; जवाहर, राजा नि मी त्यानंतरही तासभर बोलत बसलो. आणि नंतर आम्ही झोंपीं गेलों.

इतक्या जागरणानंतर इतक्या लौकर कोणी येऊन उठवणे बरें नव्हतें. वाईटच तें. परंतु त्यांत पुन्हां दारांत पोलिस पाहणे म्हणजे अधिकच वाईट. दारांतील घंटा वाजली. मी गाढ झोपेत होतें, तरी मला एकदम जाग आली. पोलिस आले आहेत हें मला सांगावें लागलें नाहीं. पोलिसांशिवाय अशा अवेळीं दुसरें कोण येणार? मी जवाहरच्या खोलीकडे धांवलें. मला वाटलें, वॉरंट फक्त त्याच्याचसाठीं असेल; तो फार थकला होता. डोळेही त्याचे नीट उघडत ना. त्याला काय भानगड आहे कळेना. निद्रामग्न इंद्रियें पटकन भानावर येत ना. क्षणांत सारें घर जागें झालें. अपरिहार्य तें झालें, याची सर्वांना जाणीव आली. जवाहरची आम्ही तयारी करू लागलों. बांधाबांधींत त्याला मदत करू लागलों. राजाही जवाहरसाठीं कांहीं पुस्तकें वगैरे काढू लागला. परंतु इतक्यांत माझी पुतणी इंदिरा म्हणाली "राजाभाई, तुम्हीहि आपली तयारी करा ना. तुम्हांलाही तयार राहिलें पाहिजे." मीं विचारलें "कसली तयारी?" "राजाभाईवरहि वॉरंट आहे" इंदिरा म्हणाली. काँग्रेस कार्यकारिणी समितीच्या सभासदांशिवाय इतरांनाहि या पहिल्या धरपकडीतच अटक होईल, अशी आम्हांला कल्पना नव्हती. परंतु आमची समजूत चुकीची ठरली.

राजानेहि आपली बांधाबांध केली. सर्वांची झटपट तयारी झाली. आम्हीं त्यांचा निरोप घेतला. पोलिसांनीं त्यांना आणलेल्या मोटरीशीं नेलें. राजा पुण्याच्या येरवड्याच्या तुरुंगांत गेला आणि जवाहर? त्याला अज्ञात ठिकाणी नेण्यात आलें; निरोप घेऊन नि निरोप देऊन आम्ही पुन्हा घरात आलों या वेळेस भविष्यकाळाच्या पोटांत आपल्या सर्वांसाठीं काय काय वाढून ठेवलें आहे, त्याचा विचार करीत आम्ही बसलों.

त्या वेळी घर पाहुण्यांनीं भरून गेलें होतें थोडीहि रिकामी जागा नव्हती. दोनच व्यक्ति भरलेल्या घरांतून गेल्या. परंतु तेवढ्यानें सारें बदलून गेलें. कांहीं तरी प्राणमय असे गेलें. जी जागा आतापर्यंत जिवंत वाटत होती, चैतन्यमय वाटत होती, तीच जागा आतां उजाड ओसाड वाटू लागली. कांही तरी येथे कमी आहे असें वाटू लागलें; किती तरी दिवस घरांत लोकांची सारखी जा-ये सुरू होती. आणि आतां तर भेटीला येणाऱ्यांची गर्दी अधिकच वाढू लागली. सग्येसोयरे, आप्तेष्ट, युद्धवार्ताहर या यांची एकच झुंबड झाली. अटकेची विगतवार, इत्थंभूत हकीगत मिळावी म्हणून सारे घिरट्या घालीत होते. परंतु आम्हांला मात्र जे गेले त्यांचीच आठवण येत होती. जिवाची ओढ सारखी त्यांच्याकडे, त्या दोघांकडे होती

आजपर्यंत किती तरी वेळां असे प्रसंग येऊन गेले होते. तरीहि अद्याप त्यांची सवय झाली नव्हती. प्रत्येक वेळेस अशा प्रसंगीं जरा गोंधळल्यासारखें वाटतच असे, चुकल्याचुकल्यासारखें वाटतच असे. आपण आतां एकाकी, असे क्षणभर तरी वाटल्याशिवाय राहत नसे.

एक वर्ष होऊन गेले. तरी प्रिय मंडळी, जवळची मंडळी अद्याप दूरच आहे. लोखंडी गजांआड भयाण भितींच्या आड सारीं आहेत त्यांच्या दर्शनासहि नकार. परंतु त्यांच्या या वियोगानें जरी जीवनांत मला थोडें शून्य वाटत असले, तरी मी निराश झालें आहें, कावरीबावरी झालें आहें, असें मुळींच नाहीं. ज्या ध्येयासाठीं त्यांना बद्ध करून ठेवण्यांत आले आहे, ते ध्येय न्याय्य आहे, महान् आहे अशी माझी निःशंक श्रद्धा आहे आणि या प्रिय मंडळींना ध्येयार्थ हालअपेष्टा भोगाव्या लागणें अपरिहार्यच आहे.

व्यक्तीच्या जीवनात एक वर्ष म्हणजे कांहीं फार मोठा काळ नव्हे. आणि राष्ट्राच्या जीवनांत तर एक वर्ष म्हणजे कांहींच नाहीं. परंतु कधीं कधीं तें एक वर्ष किती प्रदीर्घ वाटतें! एकेक महिना जणूं युगासारखा वाटतो. जातां जात नाहीं. किती तरी मोठ्या चळवळींतून मी गेले आहे. आणखी आणि अशा किती चळवळींतून जावें लागणार आहे ते प्रभूला माहित. राष्ट्रीय आंदोलनाचीं जीं अशीं वर्षे गेलीं, त्या काळांत माझ्याच मनांत नाना प्रकारच्या भावनांचा पूर उसळे असें नव्हे, तर लाखो बंधुभगिनींच्या मनांतहि उसळे. कधीं अपार उत्साह उसळावा, तर कधीं मन जरा निराश व्हावें. आशानिराशांचे असे क्षण आम्हीं अनेकदां अनुभवले. कधीं कधीं सभोंवती इतका अंधार दाटे कीं मार्गहि दिसत नसे. परंतु अंधाराच्या भीषण छायांतून प्रकाशकिरणहि येत. आणि लढा पुढें चालवायला नवीन हुरूप येई: आशा नि उत्साह येई.

सध्यांचे हे जे एकाकीपणाचे नि प्रक्षोभाचे महिने गेले, त्या काळांत हजारो स्मृति मनांत गर्दी करीत. आणि मनाला कांहीं तरी विरंगुळा म्हणून या येणाऱ्या आठवणी मी लिहून काढूं लागले. हळूहळू या लिहिलेल्या आठवणींतूनच या प्रस्तुतच्या पुस्तकाचा जन्म झाला. हें पुस्तक लिहितांना बाळपणचे आणि नंतरचे किती तरी दिवस मी पुन्हां जगत आहें असें मला वाटलें. त्या गत जीवनांत मी पुन्हां गेले. ते जीवन जणूं पुन्हां अनुभवलें. गतकाळच्या या आठवणी संमिश्र होत्या. सुखाच्या होत्या, दुःखाच्या होत्या. किती तरी गोष्टी आठवून मी हंसले आणि किती तरी आठवून मी रडलेहि. या आठवणींनीं एकदरींत मला आनंद दिला. मनाला बरीचशी शांति मिळाली. अर्थात् हृदयाला हुरहुरहि थोडी वाटे: मधून दुःखहि होई.

माझें बाळपण, शांतिप्रधान असे होतें. धीरगंभीर प्रसन्न असे ते बाळपण. आमचे बेताचें कुटुंब. आमच्या त्या लहान जगांत सारा प्रकाश होता. दुःखदैन्याचा, क्लेश-कष्टांचा तेथें स्पर्शहि नव्हता. सुखी चिमुकले जग. हळुहळू आमच्या जीवनांत फेरफार होत गेले. परंतु आम्ही सारीं एकत्र होतो त्यामुळें कांहीं वाटत नसे. परंतु परिस्थि-तीच्या अनुरोधानें पुढें आम्हांला एकमेकांपासून दूर जावें लागलें. जीवन पुढें जातच होतें. नवीन रीतिभाति, नवीन पद्धति यांच्याशीं मिळतें घेऊन, जुळतें घेऊन आम्ही पुढें

जात होतों. मार्गात कांहींहि आले तरी त्याला तोंड देण्यासाठीं मनानें नि शरीरानें आम्हीं तयार होत होतों.

कांहीं महिन्यांपूर्वी " हिंदुस्थानांत कोठें तरी " असणाऱ्या जवाहरलालला गल्या पंधरा वर्षांत आमच्या कुटुंबांत ज्या अनेक घडामोडी झाल्या, जी स्थित्यंतरें झालीं, त्यासंबंधींचे माझे विचार मीं लिहिले होते. त्यानेंहि उत्तर पाठविलें. त्या उत्तरांत त्यानें जें लिहिलें होतें, जें आज आहे व जें पुढें असेल त्याचें किती हुबेहुब वर्णन केलें आहे! जीवनाचा आपणांवर होणारा परिणाम त्यानें दाखविला आहे. आम्हांला अनेक आपत्तींशीं झगडावें लागलें. परंतु आम्हांला त्याचें दुःख नाहीं. " ना खंत, ना खेद. " जवाहर लिहितो :--

" तूं १९२८ मधील वर्णन केलें आहेस. त्या वेळीं आपण सारीं एकत्र होतों. परंतु आज त्यावेळची किती तरी प्रिय माणसें आपणामध्यें नाहींत. जीं आहेत तींहि इकडे तिकडे विखुरलेलीं आहेत. त्यांना एकमेकांस भेटताहि येत नाहीं, पाहतांही येत नाहीं. प्रत्येक पिढीला तोच धडा! प्रत्येक पिढीला स्वतःच्या अनुभवानें तोच धडा शिकणें भाग आहे. प्रत्येक विघटनेनंतर पुन्हां सुघटना येते. परंतु येणारी प्रत्येक नवीन संघटना पूर्वीपेक्षां अधिक वरच्या पातळीवरची असते. कारण गतकाळांतील जयापजयांच्या स्मृति कोठें तरी सुप्त रीतीनें तेथेंहि असतात. भूतकाळाचा बोजा आपल्याबरोबर असतोच. परंतु हा बोजा जड वाटत असला, तरी स्फूर्तिहि देत असतो. तो आपणांस मागें खेचत असला, तरी त्याच वेळेस पुढेंहि ढकलीत असतो; खालीं ओढीत असला, तरी वरही नेत असतो. कधीं कधीं पुन्हां अपार उत्साह संचरतो. पुन्हां आपण तरुण आहोंत असें वाटतें. नव प्राण जणूं येतो. तर कधीं हजारों वर्षांचें ओझें आपल्या शिरावर आहे असें वाटतें. आपण आतां थकलों, वृद्ध झालों असें वाटतें. कधीं न संपणारी ही यात्रा! किती लांब नि दीर्घ! असें मनांत येतें. ही उभयविध भावना उत्साहाची नि अनुत्साहाची, तारुण्यांतील प्रेमाची नि वार्धक्यांतील पंगूपणाची आपणांमध्यें असते. या दोन्ही भावना म्हणजे आपलेंच स्वरूप. या उभयविध वृत्ति आपणांस बनवीत असतात, आपल्या जीवनास आकार देत असतात आणि या अनंत झगड्यांतून, अखंड संमिश्रणातून प्रत्येक वेळीं काही तरी नवीन निर्माण होत असतें; काही तरी अभिनव वर येत असतें. त्या प्राचीन संस्कृतीचीं आपण बाळें आहोत. त्या शेकडों हजारों पिढ्या, त्यांचे विचारविकार, त्यांचे झगडे, त्यांचीं सुखसमाधानें, त्यांच्यांतील क्रान्तिकाल नि शान्तिकाल, त्यांच्यांतील वेग-आवेग, गतिमानता नि स्थिरता हीं सारी आपण अनुभवतों. त्या सर्वांतून आपण वर आलों आहोत. ज्या राष्ट्रांना, ज्या लोकांना असा प्राचीन इतिहास नाहीं, जीं राष्ट्रें अर्वाचीन आहेत, त्यांना हा असा अनंतविध भूतकाळ अनुभवावा लागत नाही. त्यांच्या पाठोपाठ असा हा जुना भूतकाळ येत नसतो.

परंतु आपली गोष्ट निराळी आहे. हजारो वर्षांच्या परंपरेचे आपण वारसदार. त्यामुळे आपण उल्लू होत नाहीं. एक प्रकारचा समतोलपणा, संयम आपणांत राहतो. आपले मन, आपला आत्मा यांच्यांत एक प्रकारची धीरगंभीरता असते. आपण उतावीळ होत नाही जीवनाकडे शांतपणें पाहू शकतो. आपल्या जीवनाचा प्रवाह अखंड सातच आहे. परंतु क्षणोक्षणीं होणा-या फरकांनीं हे जीवन गांगरून जात नसते. ते हुरळून जात नाहीं वा होरपळूनहि जात नाहीं. प्राचीन संस्कृतीचा हाच प्राणमय विशेष. महान चीन देशांतहि हाच थोर विशेष भरपूर प्रमाणांत आहे. आणि मला वाटतें कीं हिंदुस्थानजवळहि हा वारसा आहे. म्हणूनच मनाला वाटतें कीं हिंदुस्थानचें शेवटीं सारें मंगलच होईल.

मी जेव्हां लहान होतो, तेव्हां आपल्या एकत्र कुटुंबांत जवळजवळ वीस माणसें होतीं असें आठवतें. त्या मोठ्या कुटुंबाचे विभाग पडलेलेहि मीं पाहिले. आणि त्यांतील प्रत्येक विभाग आज पुन्हां नव्या मोठ्या कुटुंबाचा केन्द्र बनलेलाहि मी बघत आहे. परंतु हे भाग जरी असे लहान झाले, तरी प्रेमाचे रेशमी धागे त्यांना एकत्र राखीतच होते. समाज हितसंबंध नि परस्पर प्रेम यांमुळें पृथक् असूनहि हे कौटुंबिक विभाग जणुं एका महान् ऐक्यांत परिणत होत असत. अलग असूनहि एकता वाटे. अशी ही संसार-गति सुरूच आहे. आपल्या लक्षांतहि ती येत नसते. परंतु जेव्हां अनेक गोष्टींमुळें ही गति वेगानें सुरू होते, तेव्हां आपणांस एकदम धक्का बसतो. गेल्या पांच वर्षांत चीनमध्ये काय झालें त्याची कल्पना कर. कोट्यवधि कुटुंबांची काय दशा झाली असेल, त्यांना किती आपत्तींतून, वादळांतून जावें लागले असेल, त्याची कल्पना कर. परंतु तरीहि महान् चीन राष्ट्र जिवंतच आहे. पूर्वी कधींहि नसेल इतकें ते आज प्राणमय आहे. तेथे व्यक्ति जन्मत आहेत, वाढत आहेत, आणि स्वतःच्या चिनी राष्ट्राची नि मानवजातीचीहि परंपरा त्या पुढे नेत आहेत. महायुद्धें येवोत, प्रचंड उत्पात होवोत, जीवनप्रवाह पुढे जातच आहे. चीनला ज्या महान् अनुभवांतून जावें लागत आहे, ज्या सर्वजनतास्पर्शी विराट दिव्यांतून जावें लागत आहे, तशा अनुभवांतून आपला हिंदुस्थानही जाईल तर बरें, असें कधीं कधीं मला वाटतें; अशा दिव्यांतून गेल्यामुळे आपण हिंदी लोक अधिक चांगले होऊं. ते कांहीं असो. आपणहि आपल्या विशिष्ट अनुभवातून जातच आहोत आणि हळूहळू परंतु निश्चितपणें नव राष्ट्राची उभारणी करीत आहोंत. ''

## ना खंत ना खेद !

" फुलें फुललेली असावीत, एखाद्या भ्रमराप्रमाणें आशा रसपीत असावी. वाऱ्याची झुळुक येत असावी, काव्य स्फुरत असावें ! दोन्ही गोष्टी माझ्याजवळ होत्या, निसर्गाबरोबर जीवन रमत होते, खेळत होतें. मी लहान होतें तेव्हां आशा नि काव्य यांनी जीवन सम्पन्न होतें. "

—कोलरीज

१९०७ चा नोव्हेंबर महिना. सकाळची वेळ. कडाक्याची थंडी पडली होती. आणि अशा वेळीं त्या पवित्र प्रयाग शहरीं मी जन्माला आलें. प्रयाग, त्याला आपण हल्लीं अलाहाबाद म्हणून ओळखतों. आदली रात्र सारी धांदलींत गेली. सारें घर जागें होतें धांवपळ सुरू होती. किती तरी रात्र झाली, तरी दिवे लखलखतच होते. गजबज सुरू होती. आईला बऱ्याच वेदना होत होत्या, नवबालकाच्या जन्माची चिंतातुर दृष्टीनें सारीं वाट पाहात होतीं आणि बऱ्याच प्रसूतिवेदनानंतर मी जन्मलें. जन्माला आलेलें बाळ गुबगुबीत होते, लठ्ठ नि मोठें होतें; परंतु आपण या जगांत येत असतां आपल्या कृश जन्मदात्रीला कदाचित् जगांतून जायलाहि लावलें असतें, याची त्या बाळाला थोडीहि

कल्पना नसेल ! यानतर किती तरी आठवडे आई आजारी होती. जगणार कीं मरणार अशा स्थितींत होती. सेविका नि इतर मंडळी आईची काळजी घेत होतीं. आणि मी मात्र सर्वमान्य सारीं मुलें वाढतात, त्याप्रमाणें हलुहळू बाळसे घेत वाढत होते.

आस्ते आस्ते आईची प्रकृति सुधारली, तरीहि पुढे बरेच दिवस ती आजाऱ्यासारखीच होती. माझी काळजी घेणें तिला शक्य नव्हते. माझी मावशी नि दाया माझी काळजी घेत. मी तीन वर्षांची झाल्यावर स्वरूपच्या संगोपनाकडे लक्ष देणारी इंग्रज शासिका माझीहि शासिका बनली. जवाहर माझ्यापेक्षां अठरा वर्षांनीं मोठा आहे. बहीण स्वरूप सात वर्षांनीं मोठी आहे. त्यामुळें मीं जणू एकटीएकटीच वाढत होते. बरोबरचें असें कोणी नाहीं. भाऊ जवाहर तर त्यावेळेस इंग्लडांत होता. त्याला मी पाहिलेहि नव्हते: मी पांच वर्षांची झालें, तेव्हां मीं प्रथम त्याला पाहिलें.

माझ्या जन्माचे वेळेस माझे वडील एक नामांकित वकील म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या वकिलींतील हुशारीची नि त्यांच्या संपत्तीची सर्वत्र कीर्ति पसरलेली होती. वडिलांनीं आनंदभवन विकत घेतले त्यावेळेस जवाहर १० वर्षांचा होता. ज्या जागेवर आनंदभवन प्रासाद उभा आहे, ती जागा अत्यत पवित्र मानण्यांत येते. चौदा वर्षांच्या वनवासानतर परत आलेल्या रामाची नि भरताची भेट ज्या ठिकाणी झाली, तीच ही जागा असा समज आहे. जवळच भारद्वाज आश्रम आहे. तेथे प्राचीन काळीं मोठें विद्यापीठ होतें. अद्याप येथें यात्रा भरत असते. आमच्या घरीं नेहमीं पाहुण्यांची गर्दी असायाची. परंतु प्रति बारा वर्षांनीं प्रयागला जो कुंभमेळा भरतो, त्या वेळेस तर आमच्या घरीं माणसांची रीघ असायची. कुंभमेळ्याच्या वेळेस प्रयागला लाखो यात्रा जमते पवित्र संगमाचें स्नान करायला ही यात्रा येते. या यात्रेचे वेळेस आमच्या घरांत इतकी गर्दी जमे, कीं त्यांची व्यवस्था ठेवणेहि कठीण जाई. सारा गोंधळ माजे. आनंदभवनाभोंवतीं लोक वाटेल तेथे बसत, विश्रांति घेत माघमेळा प्रतिवर्षी असतो. त्या वेळेसहि आनंदभवन भरलेलें असे. परंतु कुंभमेळ्याइतकी गर्दी माघमेळ्यांत नसे होत. आमचे घर पाहायला ही सारी यात्रा लोटत असे. आनंदभवन पाहिल्याशिवाय सहसा कोणी आपल्या गांवीं परत जात नसे. आनंदभवनाची पवित्र जागा बघावी म्हणून, आणि हा राजवाडाहि बघावा अशा दुहेरी हेतूने लोक येत. तसेच वडिलांविषयीं, जवाहरविषयीं त्यांनीं पुष्कळ ऐकलेलें असे. त्यांचेंहि दर्शन व्हावे, इतर मंडळीहि दिसावी, या उत्सुकतेनें ते हजारों लोक येत.

आनंभवन राजवाडा प्रशस्त आहे. ऐसपैस पसरलेला आहे. भोंवतीं मोठमोठे व्हरांडे आहेत. आणि प्रचंड बाग आहे. घराच्या एका बाजूला क्रीडाभूमि होती. पाठीमागच्या बाजूस फळबाग होती. घराच्या समोरहि विस्तृत अशी हरितश्यामल क्रीडाभूमि

होती. तेथें टेनिसकोर्ट होतें. ग्रीष्मभवन होतें. या ग्रीष्मभवनाच्या आंत शंकराची मूर्ति होती. एकावर एक दगड ठेवून तेथें कृत्रिम कैलासपर्वत जणुं उभा केलेला होता. आणि त्याच्या शिरावर ती शिवाची मूर्ति होती. या शिवाच्या मस्तकांतून एक लहानसा प्रवाह वाहत असे. या कृत्रिम पर्वताच्या पायथ्याजवळच्या पुष्करिणींत ती शिरोगंगा पडत असे. सभोंवतीं रमणीय फुलें फुललेलीं असत. उन्हाळ्यांत ही जागा किती गार असे. तेथें मजा वाटायची. मला ही जागा फार आवडे. पुढें जेव्हां नवें घर बांधलें गेलें, तेव्हां हें ग्रीष्मभवन पाडून टाकण्यांत आलें. कारण नव्या इमारतीला त्याचा अडथळा होत होता. वडिलांना शिकारीचा व घोड्यावर बसायचा फार शोक. किती तरी घोडे नि कुत्रे घरीं होते. घोड्याच्या गाड्या होत्या. मोटरी होत्या. तबेल्यांभोंवती भटकायची मला हौस असे. मला घोडे बघायला फार आवडत. आणि माझाहि एक घोडा होता. अति सुंदर, बर्फा-प्रमाणें शुभ्र ! तो सुंदर घोडा विकत घेण्यासाठीं किती तरी लोक तयार होते: वाटेल ती किंमत द्यायला ते तयार होते. परंतु माझा हा घोडा फार दिवस जगला नाहीं. त्याला साप चावला. तबेल्यांतच तो एके दिवशीं मरण पावला. मला अत्यन्त दुःख झालें. ती भीषण अशी दुःखद घटना होती. त्या घोड्यावर माझें फार प्रेम होतें. किती तरी दिवस मला त्याची आठवण येई नि वाईट वाटे.

माझ्या लहानपणीं आमच्याकडे पुष्कळसे नातलग राहत असत. कधीं कधीं पुष्कळ मुलेंहि असायचीं. आणि मग मला खूप गमत वाटायची. मी त्यांच्याबरोबर खेळें. घरांतील सर्वांची काळजी आई आपल्या रुग्णशय्येवरून कशी घेई याचें मला आश्चर्य वाटे. आणि घरांतील सारी लहानथोर मंडळी सुखी आहे ना, आनंदी आहे ना, हे पाहण्यासाठीं वडीलहि कसा कोठून वेळ काढीत त्याचा विस्मय वाटे. ते प्रत्येकाजवळ थोडें तरी बोलायचे. वास्तविक त्यांना किती तरी काम असे. परंतु ते वेळांत वेळ काढीत, चौकशी करीत. बाह्यतः आपलें लक्ष नाहीं असें जरी ते दाखवीत असले, तरी घरांतील सर्वांकडे त्यांचें लक्ष असे. त्यांची कृपाळु संरक्षक दृष्टि सर्वांकडे असे. किती उत्कृष्टपणें ते सर्वांची काळजी घेत !

मी जन्मण्यापूर्वीं आईला एक मुलगा झाला होता. परंतु तो लौकरच वारला. तें दुःख आई कधीं विसरली नाहीं. मी मुलगीच जन्मलें म्हणून आईला फार वाईट वाटलें. परंतु वडिलांना तसें कांहीं वाटलें नाहीं. मला लहानपणीं खेळायला कोणी नसे. मी जणूं एकाकी असें. विचित्र एकान्तमय बाळपण मला कंठावें लागलें. आणि उठल्या-पासून तों झोपी जाईपर्यंतचा सारा वेळ जसा आंखलेला. कडक शिस्तः कडक नियमः प्रत्येक क्षणाक्षणाला कांहीं तरी काम आहेच. ही शिस्त मला बोंचे. मला राग येई. मला माहित असलेल्या इतर मुलांना त्यांचे आईबाप किती तरी मोकळीक देत, स्वातंत्र्य देत. त्या मुलांना कोणी शासिका नसे. त्यामुळें त्यांना कडक नियम नसत. ती शिस्त नसे.

त्यांचें ते स्वातंत्र्य पाहून मी अधिकच जळफळत असे. माझी शासिका माझ्यावर सत्ता गाजवी; मला संताप येई. त्या सत्तेविरुद्ध मी बंड करीत असे. मी ऐकत नसे. हट्ट करी. मी हट्टीच होते असें नव्हे, तर बंडखोरहि होते. डोक्यांत राग घालून मी बसत असे. माझा स्वभाव एकदम प्रक्षुब्ध होण्याचा आहे. परंतु हा प्रक्षोभ टिकत नाहीं. माझा शत्रु क्रोधसंताप क्षणभर असतो; लहान मुलाच्या रागाप्रमाणें तो असतो. त्या रागांत द्वेषमत्सर नसतात. तरीहि या रागीट स्वभावामुळें उगीचच्या उगीच मला पुष्कळदां त्रास भोगावा लागतो, हें खरें.

आणि माझ्या बंडखोरीबद्दल मला शिक्षा होई. मला एकटें कोंडून ठेवण्यांत येई. रात्रीचें जेवण पुष्कळ वेळां देण्यांत येत नसे. माझ्या वडील बहिणीवर जेवण गमावण्याचे किंवा कोंडून घेण्याचे प्रसंग येत नसत. ती आज्ञाधारक होती, सौम्य होती. कारण आज्ञा मोडण्यापेक्षां आज्ञापालनांत कमी त्रास पडत होता. मी बंड करीत असे, आदळआपट करीत असे. तरीहि माझ्या त्या इंग्रज शासिकेवर माझें प्रेम होतें. आणि मीहि तिला आवडत असे. माझा तिला लळा होता.

मी लहान होतें, तेव्हां आईची, वडिलांची क्वचितच् भेट व्हायची. वडिलांना काम असे. सकाळीं थोडा वेळ नि सायंकाळीं थोडा वेळ त्यांची भेट होई. आई अधिक वेळां दिसे. परंतु आईशीं फारसें कांहीं करायचें नसे. वरें वाटत असलें म्हणजे आई कधीं स्वस्थ बसत नसे; घरांत किती तरी गडीमाणसें होतीं; आईनें सांगितलेलें बारीक सारीक काम करायलाहि तीं उत्सुक असत. तरीहि आई कांहीं ना कांहीं घरगुती काम स्वतः करायचीच. आईवर माझें फार प्रेम होतें; आणि आई दिसे किती सुंदर ! तिच्या लावण्याची मी पूजा करीत असे. परंतु आईनें आपल्यावर जितकें प्रेम करावें असें मला वाटे, माझी जितकी काळजी तिनें घ्यावी असें मला वाटे, तितकें प्रेम ती माझ्यावर करीत नाहीं, असें मनांत येऊन माझें चिमुकलें हृदय दुःखी होत असे.

माझा भाऊ जवाहर, तो आईचा प्राण होता. त्याच्यावर तिचें अपरंपार प्रेम. आणि तें ती लपवून ठेवीत नसे. वडिलांनाहि जवाहरविषयीं अभिमान वाटे. त्यांचेंहि आईच्याइतकेंच किंबहुना कांकणभर अधिकच जवाहरवर प्रेम होतें. परंतु त्या प्रेमाचें प्रदर्शन ते करीत नसत. ते तसें दाखवीत नसत. निःपक्षपातीपणा नि न्याय यांचे ते भोक्ते होते. सारीं आपलींच मुलें, कोणावर कमी अधिक प्रेम कसें दाखवायचें ? आपल्या-पेक्षां दुसऱ्या भावंडावर आईबापांचें अधिक प्रेम आहे असें आमच्या मनांत येऊ नये, म्हणून वडील जपत आणि त्यांना त्यांत यशहि आलें. परंतु रोज उठून जवाहरचीं स्तुतिस्तोत्रें ऐकून त्याच्याविषयीं मला जरा मत्सर वाटूं लागला आणि तो तिकडे इंग्लंडांत दूर आहे, येथें घरीं नाहीं, याचें वाईट नसे वाटत.

माझी बहीण स्वरूप फार सुंदर होती. साऱ्यांची ती लाडकी. परंतु काय असेल तें असो. तिच्याविषयीं मला कधीं मत्सर वाटला नाहीं. इतक्या सुंदर बहिणीचें सर्वांनीं कौतुक करणें स्वाभाविकपणें योग्यच असे जणू मला वाटे. आणि मीहि स्वरूपवर खूप प्रेम करीं.

माझें बाल्य घड्याळाप्रमाणें नियमित होतें. सकाळीं उठल्यावर आधीं घोड्यावर बसून जायचें. घोड्यावर बसून रपेट करणें मला फार आवडे; आजहि ती आवड कायम आहे. वडील तर घोड्यावर बसण्यांत पटाईत होते. घरीं चांगले घोडे होते. जवाहर, स्वरूप आणि मी तिघेंहि अगदीं लहानपणींच घोड्यावर बसायला शिकलों. चालायला शिकलों, त्याच वेळेस घोड्यावर बसायलाहि शिकलों. आणि आम्ही तिघेहि त्याचे शोकी होतों. अलीकडे आम्हांला घोड्यावर बसायची संधि क्वचितच् मिळते. घोड्यावर बसून फिरून आल्यानंतर माझें शिकणें सुरू होई. आमच्या अवाढव्य बागेच्या एका कोंपऱ्यांत मी नि माझी शासिका बसत असूं, माझा धडा सुरू होई. दुपारच्या जेवणापर्यंत हें शिकणें चाले. जेवल्यानंतर सक्तीची विश्रांति असे. ते जरा पडून राहणें. मला तें मुळींच आवडत नसे. विश्रांति संपल्यावर पियानो शिकणें. त्यानंतर आणखी कांहीं धडे आणि मग संध्याकाळ होई. संध्याकाळीं घोड्याच्या गाडींत बसून आम्ही फिरायला जात असूं. ब्रह्मी घोडे आमच्या गाडीला असत. या घोड्यांचा वडिलांना फार अभिमान वाटे. संध्याकाळचा इतर वेळ जरा कंटाळवाणाच जाई. आजच्याइतका त्या वेळेस सिनेमा फार बोकाळला नव्हता. आणि तो पाहायची परवानगी भाग्यानेंच मिळे. एखादे वेळेस सर्कस, एखादे वेळेस यात्रा पाहायला जाणें म्हणजे पुष्कळ झालें असें मानण्यांत येई. माझ्या दोन मुलग्यांना आज वयाच्या सातव्या आठव्या वर्षीं हिंदी नि अमेरिकन बोलपटांची जितकी माहिती आहे, त्याच्याहून किती तरी कमी मला बाराव्या वर्षीं होती ! कधीं कधीं खेळायला कोणी मित्र मिळत; परंतु नेहमीं नाहीं. म्हणून आमच्या विशाल घरांतच मी सर्वत्र भटकत असें. एकंदरींत जीवन कसें असेल, लोक कसे जगत असतील, जग म्हणजे काय, याचा विचार करीत मी ऐकटीच फिरत असे. परंतु माझे विचार माझ्याजवळच असत. कारण अगदीं लहानपणींच मला शिकवण्यांत आलें होतें कीं फार प्रश्न विचारणें, जास्त जिज्ञासा दाखविणें, हे चांगलें नाहीं. चांगल्या चालचलणुकीचें तें लक्षण नव्हे. " तसेच मुलांना प्रेमानें बघावें, जवळ घ्यावें, परंतु त्यांचें फार ऐकूं नये " हा आमच्या बाबतींतील दंडकहि मला पाठ होता. त्यामुळें मी कोणाजवळ मनांतलें बोलणार, कुणाजवळ सांगणार ? आणि प्रेमानें ऐकणार तरी कोण ? माझ्या डोक्यांत शेंकडों प्रश्न असत. ते प्रश्न विचारायला मी किती उत्सुक असें ! परंतु तसें करण्याची संधि कधीं मिळत नसे. सारें स्वतःशींच ठेवावें लागे.

स्वरूप पांच वर्षांची असतांनाच आई नि बाबांबरोबर इंग्लंडला गेली होती. तेथे ही इंग्रज शासिका बाबांनीं नेमली. तिचे नांव कु. हूपर. फार चांगल्या घराण्यांतील ती होती. दिसायलाहि बरी होती. ती चांगली शिकलेली होती किती तरी विषयांतील प्रमाणपत्रें तिच्याजवळ होतीं. नाना गोष्टींत ती निष्णात होती परंतु ती जुन्या वळणाची होती, तात्यापंतोजी परंपरेची होती. कडक शिस्त, आज्ञाधारकपणा हीं तिचीं सूत्रे होतीं. स्वरूपला वागविणे सोपें असे. परंतु माझी गोष्ट निराळी होती. वडिलांचाच नव्हे, तर पिढ्यान् पिढ्या आमच्या घराण्यांत चालत आलेला हट्टी स्वभाव माझ्यांतहि आलेला होता. कितीहि कठोर शिक्षा करण्यांत आली, तरी मी दबत नसे, माघार घेत नसें, आपलें सोडीत नसे. असे असूनहि सौम्यपणे जर कोणी माझी जरा कानउघाडणी केली, तर लगेच मी लाजेनें खालीं मान घालीत असें नि सांगितल्याप्रमाणें वागायला तयार होत असें. परंतु असें सौम्य रीतीनें कानउघाडणी करून सांगणे क्वचितच कोणी करी. बहुधा कठोर शिक्षाच नेहमी व्हायची. अशा प्रकारें मी वाढत होते. लहानपणापासून मला एकटें एकटें वाटे. आणि जसजशी मी वाढूं लागले, तसतशी फार लाजाळू होत गेलें. माझी सर्वांनीं स्तुति करावी, माझें कोडकौतुक करावें, असे मला फार वाटे. ज्ञानाची, अनेक गोष्टी समजून घेण्याची मला भूक होती. परंतु सनातनी पद्धतीनेंच, तात्यापंतोजी रीतीनेंच ही ज्ञानपिपासा मला तृप्त करून घ्यावी लागे. आईबापहि मला अपरिचितासारखे होते. आणि भाऊ तर तिकडे दूर होता. त्याला मी पाहिलें सुद्धां नव्हतें. येऊन जाऊन स्वरूपशींच तेवढा रोज संबंध येई. आणि आमच्या त्या शासिकेशीं; तिच्यावर कधीं मी प्रेम करीं तर कधीं दांतओठ खाई

१९१२ मध्ये माझा भाऊ इंग्लंडांतून परत घरीं आला. माझ्या आयुष्यांतील ही पहिली मोठी गोष्ट. आपला भाऊ येणार याचा मला फारसा आनंद होत नव्हता. कारण तो मला अगदीं परक्यासारखा होता. ओळख ना देख. तरीहि आपला भाऊ कसा आहे हे पाहण्याची मला जिज्ञासा होती, उत्सुकता होती: तो येण्यापूर्वी किती तरी दिवस घरांत त्याच्या स्वागताची तयारी होत होती. आईचा आनंद शब्दातीत होता. तिला जणूं कांहीं सुचत नव्हतें अत्यंत आवडता मुलगा सातासमुद्रापलीकडून घरीं येणार, घरांत सारें व्यवस्थित असावें, कोठें इवलेंहि कमी नसावें, म्हणून ती जपत होती. इकडे तिकडे हिंडून जातीनें ती सारें बघत होती. तिची कोण धांवपळ, तिच्या मुखावर असें कांहीं तेज फुललें होते कीं तसें मीं पूर्वी कधीं पाहिलें नव्हते. मुलगा झाला म्हणून काय झाले ! त्याच्यावर इतके जीव कीं प्राण करण्यासारखे काय आहे जसें मला वाटे. मला कधीं कधीं आईची चीड येई. आईला त्या वेळेस काय वाटत असेल तें आज मी समजूं शकतें. चांगल्या रीतीनें जाणूं शकतें. माझी बहीणहि घरांत धांपवळ करीत होती. जणूं आपणहि फार उत्सुक आहोंत, अधीर आहोंत अशा मुद्रेनें ती इकडे तिकडे नाचत होती. हें सारें पाहून मी

त्रस्त होत असें. येऊ दे जवाहर मी त्याची गर्दी फू करीन तो मला मुळींच आवडणार नाहीं असें मी मनांत म्हणत होतें, ठरवीत होतें

शेवटीं एकदांचा तो महान दिवस उजाडला. घरांतील त्या आशामय नि उत्सुक वातावरणाचा माझ्यावरहि परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं परंतु माझ्यांत जिज्ञासा-वृत्ति अधिक होती. घरांत आतां सारें शांत होतें. सारे वाट पाहत होते ते उन्हाळ्याचे दिवस होते. थंड हवेचें ठिकाण मसुरी येथें त्या वेळेस आम्ही होतो. अपेक्षित क्षण आला. ठरलेली वेळ झाली. नि घोड्याच्या टापांचे आवाज कानांवर आले. जवाहरला भेटण्यासाठीं सारीं बाहेर धांवलीं. घोड्यावर बसून एक तरुण येत होता दिसायला हुबेहुब आईप्रमाणे किती सुंदर ! मीं त्याला पाहिलें आणि माझें हृदय जरा बावरलें. मनांत क्षण-भर कांहीं तरी वाटल. भावानें घोड्यावरून खालीं उडी मारली. तो आधीं आईजवळ गेला. आईनें त्याला पोटाशीं धरलें, नंतर क्रमाक्रमानें तो सर्वांना भेटला. आकाशांतून एकदम खालीं पडलेल्या या नव्या भावावर प्रेम करायचें कीं नाहीं, त्याचा गर्दा फू करायची कीं काय, असा विचार करीत मी जरा दूर उभी होतें माझ्या मनांत विचारांची अशी गर्दी चालली होती, तोंच मी एकदम उचलली गेलें. जवाहरच्या हातांत मी होतें. आणि तो म्हणाला " ही का माझी लहान बहीण, सर्वांत लहान बहीण ! चांगली लहानशी बाईच दिसते जणू ! " त्यानें माझा पापा घेतला जसें पटकन त्यानें मला उचलून घेतलें होतें, तसेंच पटकन त्यानें मला खालींहि ठेवलें. आणि दुसऱ्या क्षणीच जणू माझ्याविषयीचें सारें तो विसरून गेला.

भावाची नि माझी आतां ओळख होत होती. परंतु पहिले कांहीं दिवस कांहीं फारसे चांगले गेले नाहींत. जवाहर म्हणजे भयंकर चिडविणारा जेव्हां त्याला कांहीं उद्योग नसे, तेव्हां तो माझ्या खोड्या काढायचा, मला चिडवायचा जे जे करायला मला आवडत नसे, किंवा जे जे करण्याची मला भीति वाटे, ते सारें तो मला मुद्दाम करायला लावायचा. आणि मला कधीं कल्पनाहि नसे अशा वेळीं तो निरनिराळ्या देणग्यांचा माझ्यावर वर्षाव करीः माझ्याशीं किती प्रेमानें वागे ' त्यामुळें त्याच्याशीं पुष्कळ वेळ अबोला धरणें, त्याच्यावर रागावून बसणें शक्य होत नसे. तरीहि एकंदरींत मी त्याच्या-पासून दूरच असें. मला त्याचा फारसा लळा लागला नाही.

तें पहिलें महायुद्ध त्या वेळेस आलें. परंतु माझ्या शांत आणि ठरींव जीवनावर त्याचा फारसा परिणाम झाला नाहीं. घरांतहि फारसा मोठा फेरफार झाल्याचें दिसलें नाहीं. फक्त आई अलीकडे क्लबांत वरचेवर जाई. कांहीं हिंदी नि कांहीं अहिंदी स्त्रियांबरोबर सैनिकांसाठीं मोजे वगैरे शिवण्याचें काम ती तेथें करी. आणि पुष्कळदां युद्धवार्ता ऐकून वडील नि जवाहर प्रक्षुब्ध झालेले दिसत.

१९१६ मध्ये जवाहरचें लग्न झालें. कित्येक महिने तयारी चालली होती. कारण लग्न मोठ्या थाटामाटानें व्हावयाचें होतें. मोठा सोहळा व्हायचा होता. घरांत जवाहिऱ्यांची, सराफांची, व्यापाऱ्यांची, शिंप्यांची सारखी ये जा सुरू होती. कितीतरी कारकून सारी व्यवस्था कशी ठेवायची, हे ठरविण्यांत मग्न होते

लग्नसमारंभ दिल्लीला व्हायचा होता कारण वधूचें घर तेथें होतें. एका शुभ मुहूर्तावर नवरदेवाकडची मंडळी निघाली. लग्नाच्या आदल्या दिवशीं अलाहाबाद आम्हीं सोडलें. आमची खास गाडी होती आगगाडी शृंगारण्यांत आली होती. वडिलांचे बरोबर शें-सव्वाशें बडे बडे पाहुणे होते आणि दिल्लीत तर शेंकडों पाहुण्यांची गर्दी उडाली कितीतरी वाडे घेण्यांत आले होते. परंतु तरी जागा पुरेना. शेवटीं तंबू उभारण्यांत आले. एका आठवड्यांत तंबूंची एक लहानशी वसाहतच तेथें बांधण्यांत आली. या वसाहतीला " नेहरू विवाह शिबिर " असें म्हणण्यात येई

दिल्लीला त्या वेळेस कडाक्याची थंडी होती परंतु दिल्ली मला आवडली माझा वेळ मोठा मजेत गेला हिंदुस्थानच्या सर्व भागांतून कितीतरी आप्तेष्ट आले होते. कितीतरी नवीन भावंडें भेटली मी त्यांच्यांत मिसळले, त्यांच्याबरोबर खेळले रोज कोठें ना कोठें मेजवानी असायचीच. दहा दिवस मोठा सोहळा झाला. आणि वरपक्षीय मंडळी अलाहाबादला परतली. येथें पुन्हां अनेक मेजवान्या झाल्या

नवरदेव जवाहर तर सुंदर होताच. परंतु नववधू कमला इतकी सुंदर नवरी मी कधींहि कुठें पाहिली नव्हती! १९१७ मध्ये त्याची एकुलती एक मुलगी इंदिरा जन्मली.

१९१७ पर्यंत जीवन शांतपणे चाललें होतें. विशेष कांहीं घडलें नाहीं. त्या वर्षी माझ्या शासिकेचें तिच्या एका इंग्रज मित्राशी लग्न ठरलें. लौकरच लग्न व्हावें अशी तिची इच्छा होती तिचीं सारीं माणसें तिकडे इंग्लंडांत होतीं. तेव्हां येथीलच एका चर्चमध्ये तिचें लग्न लावण्याचें वडिलांनी ठरविलें माझ्या शासिकेचें लग्न होणार! मला खूप आनंद झाला मी तिची पाठराखीण होणार होतें! परंतु लौकरच तिचा माझा वियोग होईल या कल्पनेनें मला दुःखहि झालें तिच्या ज्या गोष्टी मला आवडत नसत, त्या साऱ्या आतां मी विसरून गेलें कितीतरी वर्षे ती माझी काळजी घेत होती. माझ्यावर प्रेमसुधेचा वर्षाव करीत होती. तिचें तें प्रेम, तिनें घेतलेली प्रेमळ काळजी याच गोष्टी आतां डोळ्यांसमोर उभ्या राहिल्या बारा वर्षे ती आमच्याकडे होती. आमच्या घरांतीलच ती एक झाली होती. आमचें सर्वांचें तिच्यावर प्रेम होतें. आणि तिचाहि सर्वांवर लोभ होता. सर्वांविषयी तिला जिव्हाळा वाटे, भक्तिप्रेम वाटे.

तिच्या विवाहाचा दिवस उगवला. मी दुःखी होतें. सारे सुरेख पार पडलें. वडिलांनीं तिच्यासाठी सारें कांही केलें. आणि तिला समाधान वाटलें. लग्नानंतर ती मधुचंद्रार्थ निघून गेली. कितीं तरी दिवस मी दुःखी कष्टी होते. व चुकल्या चुकल्यासारखे वाटे. माझ्या आयुष्यांतील हृदयाला रडविणारा तो पहिला प्रसंग होता. लहानपणचीं दुःखें लौकर दूर जातात. आणि पुढे हा वियोग अंगवळणीं पडला. मला आतां स्वातंत्र्य मिळालें होतें. या नवप्राप्त स्वातंत्र्याचा मीं उपभोग घेऊ लागले माझ्या इच्छेप्रमाणें आतां मी वागू शकत होतें. आवडीप्रमाणे पुष्कळसे करू शकत होतें. माझ्यावरच सारें सोपविण्यांत आले होतें.

शाळेंत जावें, इतर मुलांबरोबर शिकावें असें मला नेहमीं वाटत असे. परंतु शाळेंत जाण्याची कल्पना वडिलांना मुळींच पसंत पडत नसे. एखाद्या शासिकेपाशीं मी एकटीनें धडे घेणेंच योग्य असें त्यांचें मत. एकान्तांतील ती भव्यता त्यांना आवडे. शासिका नि तिची विद्यार्थीण, यांचेंच जणू फक्त जग त्या काळांत गायन वादन येणें हे मुलींच्या शिक्षणांतील प्रमुख अंग समजलें जाई. पियानो वाजवतां येणें किंवा दुसरें एखादें तंतुवाद्य वाजवतां येणें हे प्रतिष्ठित मुलींना आवश्यक जणू असे. माझी बहीणहि शाळेत कधीं गेली नाहीं. तिचें सारें शिक्षण घरीच झालें होतें. परंतु शाळेंत जाऊन शिकण्याची तिलाहि इच्छा होती असें मला नाहीं वाटत. याच्या उलट मला ती हौस होती. आमच्या शासिकेचें लग्न झाल्यावर शाळेत जाण्याचा मीं हट्ट धरला. वडिलांचें मन वळविण्याची मीं पराकाष्ठा केली. परंतु आरंभी तरी त्यांचा निश्चय अभंग होता. दुसरी एखादी शासिका मी ठेवतों, तिच्याजवळ शीक, असें त्यांचें म्हणणें. त्याचप्रमाणें अनेक शासिका आल्या. परंतु सुदैवानें कोणी फार दिवस टिकली नाहीं. शेवटीं नाइलाजानें का होईना, वडिलांनीं शाळेंत जायला मला परवानगी दिली. एक योग्य अशी शाळा निवडण्यांत आली. लहानशी शाळा. लहान मुलांमुलींची ती शाळा होती. त्या शाळेंत मी जाण्यापूर्वी बरींचशीं इंग्रज मुलेंच तेथें येत परंतु पुढे पुष्कळ हिंदी मुलेंहि त्या शाळेत जाऊं लागलीं.

नवीन जीवनाचा तो नवीन आरंभ होता. मला तरी ते सारें नवीन होतें. आणि प्रत्येक क्षणाचा मी उपभोग घेत होतें आतां सारा वेळ नाना प्रकारचे खेळ खेळण्यांत नि अभ्यासांत जाई. मी एकटी आहें, एकाकी आहे, असें कुढत बसायला आतां वेळच नसे. जीवन इतकें सुखी नि आनंदी भासणें शक्य तरी आहे का ? कोणाला खरेंहि वाटायचें नाहीं. माझ्या आयुष्यांतील शाळेंतील हे दिवस म्हणजे परम सुखाचे होते; परंतु थोड्याच वर्षांनीं हे सुखी दिवस एकाएकीं संपले.

अशा रीतीनें मी वाढत होतें. ते आमचें घर ! त्या घरावर किती प्रेम, किती भक्ति ! त्या घरांतील सुरक्षित नि शांत अशा वातावरणांत मी वाढत होतें, लहानाची मोठी होत होतें.

" जे होते नि जे आहे यांत केवढा फरक ! "

—कोलरीज

आमची शासिका गेल्यापासून वडील बहीण स्वरूपच माझी काळजी घेत असे. कारण आईची प्रकृति नीट नसे. तिची तब्येत फारच हळुवार झाली होती, स्वरूप क्वचितच कठोर वागे. त्यामुळे मी माझ्या इच्छेप्रमाणेंच बहुतेक वागत असें. तिलाहि त्रास नि दगदग कमी आणि मलाहि बरें वाटे. मला काव्य फार आवडे. स्वरूपलाहि. किती तरी वेळां संध्याकाळीं आम्ही दोघी वहिणी बागेत बसत असू. स्वरूप मोठ्याने कविता वाची आणि जवळ बसून तन्मयतेनें मी ऐकत असे. आम्हां दोघींमध्ये अति सुंदर असे, अति दुर्मिळ असे प्रेमबंधन होतें. माझ्या त्या बाल्याच्या काळांत स्वरूप माझी मार्गदर्शिका होती. ती माझी गुरु होती; ती मैत्रीण होती.

१९२१ मध्ये स्वरूप विवाहबद्ध झाली. तिचे लग्न म्हणजे खरोखरच राजाला लाजवील असा सोहळा अगदीं काश्मीरी थाटाने हे लग्न झालें. आप्तेष्ट, सखेसोयरे, पाहुणे यांची किती गर्दी ! आणि कॉंग्रेसच्या कार्यकारिणी समितीची बैठकहि त्याच वेळेस अलाहाबादला असल्यामुळे ते सारे महान् पुढारीहि विवाहाला उपस्थित होते. त्या वेळची माझी ऐट कांहीं विचारू नका. काय करावें, काय करू नये, हे सांगायला कोणी येत नव्हते. माझी मी स्वतंत्र होते. अति सुखांत, खूप थाटामाटांत ते दिवस गेले. परंतु

वर्‍हाण आतां दूर जाणार या विचारानें मात्र मला वाईट वाटत होतें. परतु लग्नांतील मेजवान्या, ते उत्सवसमारभ यांची लूट तर मीं खूप केला.

कॉंग्रेस-पुढार्‍यांच्या उपस्थितीचा स्थानिक कार्यकर्त्यांना फायदा करून घ्यायचा होता. त्यांनीं जिल्हा परिषद ठरविली. आसपासच्या खेड्यांतून शेकडों हजारों शेतकरी या परिषदेसाठीं आले. अलाहाबाद हें जुनेंपुराणें शहर नेहमीं झोपेंत असायचें. परतु त्या शहरांत सर्वत्र चैतन्य दिसू लागलें. चळवळीचें नवीनच वारें जणूं शहरांत पसरलें. सर्वत्र उत्साह होता. शहरांतील इग्रज लोकांचें मात्र त्यामुळें पोट दुखू लागलें. देशांतील ही राजकीय जागृति पाहून बरें नसे वाटत. मोठा उत्पात होणार, जोराचा उठाव होणार असें त्यांना वाटलें. त्यांची भीति, त्यांची त्या वेळची विचित्र वागणूक त्या वेळीं आम्हीं समजूं शकत नसू : परतु लौकरच आम्हीं शोध लावला, कीं माझ्या बहिणीच्या लग्नाचा १० मेचा दिवस म्हणजे १८५७ च्या स्वातत्र्य युद्धाचा वर्षदिन होता! योगायोगच तो.

याच काळात मीं मांसाशनाचा त्याग केला मला मांसाशन फार आवडे; परतु एके दिवशीं गांधीजींचे चिटणीस श्री. महादेवभाई देसाई यांची माझी गांठ पडली. त्या वेळीं मी दुपारचें जेवीत होतें माझ्या ताटांत मांसाशनाचे नाना प्रकार होते. तें सारें पाहून महादेवभाईंना किळस आली. शाकाहारावर त्यांनीं मला एक मोठें प्रवचन तेथेंच दिलें. ताबडतोब माझें मतपरिवर्तन ते करू शकले नाहींत, परतु जेव्हां जेव्हां त्यांची माझी गांठ पडे, तेव्हां तेव्हां ते पुनः पुन्हां सांगितल्याशिवाय राहत नसत. त्यांचा अप्रतिहत प्रचार सुरू होता. आणि ऐन लग्नसमारभांतच मीं मांसाशन सोडलें. पुष्पकांना त्यामुळें जरा कसेंसेंच वाटलें. परतु माझ्या आईला मात्र आनद झाला. तिच्या आनदाला सीमा नव्हती. तिला मांस आवडत नसे. ती आपण होऊन स्वेच्छेनें त्याला स्पर्शहि करीत नसे. आजारीपणांत निरनिराळ्या रूपांत तिला मांस देण्यांत येई. तिची इच्छा नसे. परतु तिला घेणें भाग पडे. तीन वर्षेपर्यंत इच्छा होत असूनहि मी मांसाला शिवलें नाही. परतु नतर कांहीं भावडांबरोबर नाताळच्या सुटींत एक आठवडा राहायला मी गेलें होतें. तीं सारीजणं मांसाशन करीत. आणि मलाहि मोह आवरला नाहीं.

स्वरूप सासरीं गेली. मी पुन्हां दुःखीकष्टी झालें. मला एकटें एकटें वाटू लागलें. घरीं माझी वैनी कमला होती. स्वरूपच्याच वयाची ती होती. स्वरूपची जागा थोड्याफार अशानें तिनें घेतली. याच काळांत वडिलांचें स्वरूप मला अधिक समजू लागलें. त्यांना मी अधिक ओळखूं लागलें. स्वरूप नसल्यामुळें मला चुकल्या चुकल्यासारखें होत आहे ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत आली होती. वेळ मिळे तेव्हां ते माझ्याजवळ येऊन बसत, बोलत आतां कोठें त्यांचा स्वभाव माझ्या ध्यानांत येऊं लागला होता. मी त्यांच्यावर प्रेम करायला शिकत होतें. तोंच त्यांना ती पहिली अटक झाली! आणि परस्पर ओळखीची वेळ सपली. एकमेकांच्या सगतीचा तो अल्पसा काळ सपला.

गांधीजींची नि माझी भेट प्रथम १९१९ मध्यें झाली. वडिलांच्या विनंतीवरून कांहीं विचारविनिमय करण्यासाठीं ते मुद्दाम आले होते. बापूंबद्दल मीं बरेंचसें ऐकलें होते. गांधीजींना बापू म्हणतात. मीं त्यांना पाहिले. पुरातनकाळांतील एक व्यक्ति, असे ते मला वाटले. जुन्या दंतकथा, आख्यायिका यांतील माणसाप्रमाणे ते भासले. मी फार मोठी नव्हते. १२ वर्षांचे माझें वय. मला त्यांचे स्वरूप समजेना. ज्या गोष्टींसाठीं ते जगत होते, जे त्यांचे जीवनसिद्धान्त होते, त्यांचें मला त्या वेळीं कितीसे आकलन होणार ? गांधीजींच्या कल्पना मला स्वप्नवत् वाटत. त्यांचे विचार तऱ्हेवाईक, अव्य-वहार्य वाटत. मीं जेव्हां त्यांना प्रथम पाहिलें, तेव्हां मला त्यांच्याविषयीं फारसे कांहीं वाटलें नाहीं. नीरस असतील हे गृहस्थ असे वाटले. त्यांच्याविषयींची माझी पूर्वकल्पना निराळी होती. गांधीजी म्हणजे मोठे उंच धिप्पाड पुरुष असतील, डोळ्यांत चमक असेल, त्यांची धीरोद्धता गति असेल, अशी माझी कल्पना होती. परतु त्याऐवजीं दुःष्काळांत जणूं सांपडलेली अशी कृश मूर्ति मीं पहिली. कमरेला पंचा. हातांत काठी. थोडे वांकलेले. दिसायला शान्त दान्त; अति सौम्य: गांधीजींची ही अशी मूर्ति पाहून माझी निराशा झाली. आमच्या देशासाठीं प्रचंड चळवळी करू पाहणारा, परकी सत्तेपासून देशाला स्वतंत्र करूं पाहणारा, तो हाच का लहानसा माणूस ? मला आश्चर्य वाटलें.

जालियनवाला बागेतील त्या भीषण हत्याकांडाची सविस्तर हकीगत मीं ऐकली होती, वाचली होती. मी लहान होते. तरीहि त्या गोष्टीचा सूड घ्यावा असें मला वाटे. जशास तसे करणें म्हणजे सूड उगवणें अशी माझी समजूत. अत्याचार नि रक्तपात यानेच आपणहि बदला नको का घ्यायला असे मला वाटे. परंतु बापूंच्या अनत्याचारा-विषयीं, अहिंसेविषयीं मीं ऐकले. मला ते सारे स्वप्नवत् वाटले, विक्षिप्तपणाचें वाटलें. कोणाला तरी असे वागतां येणे शक्य आहे का ? आणि सारे राष्ट्र या मार्गाने जाणे तर मुतराम् अशक्यच असे मनांत आले. माझ्या स्वभावांतहि मुद्दाम उलट जाण्याची एक लकेर आहे. जो उठला तो बापूंची स्तुति करीत होता. त्यांची जणूं सारे पूजा करीत होते. त्यांच्या तोंडून शब्द बाहेर पडण्याचा अवकाश, एखादी क्षुल्लक इच्छा प्रकट होण्याचा अवकाश, कीं त्याप्रमाणें वागायला सारे तयार. हें पाहून मी मुद्दामच बेमुवर्तपणा दाखवूं लागले. बाह्यतः तरी बापूंबद्दल मला कांहीं वाटत नाहीं असें मी दाखवूं लागलें. परंतु याचे आईला फार दुःख झालें. मनांतून मीहि बापूंची भक्तिच करीत होतें. त्यांच्यावर प्रेम करीत होतें. परंतु हा कोणी संत आहे, महात्मा आहे, अशा दृष्टीनें पाहायला मी तयार नव्हतें.

हळूहळू बापूंचें अधिकाधिक स्वरूप मला दिसूं लागलें नि मी त्यांच्याकडे ओढली गेलें. कधीं कधीं या मर्त्य भूमीवरचे ते नाहींतच असें वाटे. परंतु ते या पृथ्वीवरचेच होते.

ऐहिक वस्तूंचा ते तिटकारा नसत करीत. त्यांचाहि परामर्श ते घेत. त्यांतील गोडी बघूं शकत. त्यांचे ते शान्तप्रशान्त डोळे आणि ते विजयी हास्य ! त्या डोळ्यांनीं, त्या गोड हास्यानें त्यांनीं मला जिंकलें. लाखोंना याप्रमाणें त्यांनीं ओढून घेतलें आहे, जवळ घेतलें आहे. आणि क्षणापुरतें नव्हे, तर कायमचें. बापूंजवळ जिवाभावाचा संबंध एकदां का जडला, की तो कधीं तुटायचा नाहीं.

१९२० मध्ये गांधीजींनीं सत्याग्रहाची चळवळ सुरू केली. आणि त्या चळवळी-मुळें माझेंच नव्हे, तर कुटुंबांतील सर्वांचेच जीवन बदललें. देशांतील शेंकडो लोकांच्या जीवनांत क्रान्ति झाली. चळवळींतील अनेक कार्यक्रमांपैकीं ब्रिटिश शाळांवरील बहिष्कार हाहि एक होता. मी माझ्या अभ्यासांत दंग होतें. मी माझ्या लहानशा जगांत गुंग होतें. माझ्या स्वतःच्या घरांत जे फेरफार होत होते, जें वादळ येत होतें, त्यांची मला यत्किंचितहि कल्पना नव्हती. आणि वडिलांनीं जेव्हां एके दिवशीं मला बोलावून सारें समजावून मीं शाळा सोडलीच पाहिजे असे निक्षून सांगितलें, तेव्हां मी स्तंभितच होऊन गेलें; मला तो मोठा धक्काच बसला ! माझ्या शाळेवर माझें प्रेम होतें. शाळेत किती तरी नवीन स्नेहसंबंध निर्माण झाले होते. शाळा सोडण्याच्या विचारानें मला दुःख झालें. प्रथम तर कांहीं सुचेना. शाळा सोडणें हेंच योग्य याची खात्री मला पटली होती. तरीहि वाईट वाटत होतें. त्याच वेळीं दुसऱ्या एखाद्या शाळेत नांव घालणें बरें दिसलें नसतें. वडिलांनीं घरींच माझ्या शिक्षणाची व्यवस्था केली. निरनिराळ्या विषयांतील तज्ज्ञ शिक्षक शिकविण्यासाठीं येऊं लागले. किती तरी दिवस मी अस्वस्थ होतें. कारण कांहीं करायलाच फारसें नव्हतें. सारेंच अनिश्चित होतें. परंतु त्या कालचें जीवन वेगानें पुढें जात होतें. आणि प्रचंड चळवळींत मीहि ओढली गेलें. त्या महान् वातचक्रानें मलाहि खेचलें. आपल्या राष्ट्राच्या कायापालट करणाऱ्या क्रान्तिकारक घटना भराभर होऊं लागल्या.

दररोज कांहीं तरी नवीन घडत होतें. आणि माझें ते ठरींव सांच्याचें नीरस नि कंटाळवाणें जीवन बदलूं लागलें. क्षणाक्षणाला माझ्या जीवनांत फरक होऊं लागला; प्रत्येक दिवस निराळा, रोज कांहीं तरी नवीन. दुसऱ्या क्षणाला काय होईल याची कल्पनाहि नसे. जीवनांत चैतन्य आलें. गांधीजींना मिळण्याची जवाहरची इच्छा होती. वडिलांची अद्याप तयारी नव्हती. उडी घेण्यापूर्वी सर्व साधकबाधक गोष्टींचा ते विचार करीत होते. परंतु जवाहरच्या मनाची केव्हांच तयारी झाली होती. सत्याग्रह चळवळीची शपथहि त्यानें घेतली. असे करण्यापूर्वी मानसिक झगडा त्याला करावा लागला नाहीं असें नाहीं. गांधीजीच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रह करण्यावांचून स्वराज्यप्राप्तीचा दुसरा मार्गच नाहीं असे त्याला वाटलें. परंतु बापूंना जाऊन मिळण्यासाठीं वडिलांची पूर्ण संमति मिळविणें सोपें काम नव्हतें. गांधीजीचे विचार वडिलांनीं एकदम स्वीकारले नाहींत.

होणाऱ्या सत्याग्रही आंदोलनाचा त्यांनी बऱ्याच सहानुभूतीने विचार केला होता. त्यांनीं पाठिंबा दिला असला, तरी ही चळवळ त्यांना मनांतून फारशी आवडत नव्हती. तुरुंगांत जाण्यांत कांहीं विशेष आहे असें त्या वेळीं त्यांना वाटत नसे. आणि जवाहरनें तुरुंगांत जावें ही कल्पना त्यांना आवडली नाहीं. तुरुंगाची यात्रा अद्याप सुरू झाली नव्हती. वडिलांचें जवाहरवर अपार प्रेम. आणि आपल्या लाडक्या पुत्राला तुरुंगांत जायला लागावे, त्याला हालअपेष्टा भोगायला लागाव्यात, याचें त्यांना साहजिकच दुःख वाटे.

वडिलांच्या नि जवाहरच्या दोघांच्या मनांत कित्येक दिवस झगडा चालला होता. दोघांच्या तासन् तास चर्चा होत. कधी शब्दाशब्दी होई, रागानें बोलणीं होत; दोघे परस्परांची खात्री पटविण्याची पराकाष्ठा करीत होते. किती तरी दिवसरात्री अशा गेल्या. दोघांच्या मनाला क्लेश होत होते. दोघांच्या हृदयाला वेदना होत होत्या. बापूंच्या पाठोपाठ जाण्याचा जवाहरचा कृतनिश्चय पाहून वडील दुःखीकष्टी होत. ते जमिनीवर झोंपून बघत. ही गोष्ट आम्हांला पुढें कळली. आपल्या मुलाला उद्यां तुरुंगांत फरशीवर निजावें लागेल. जमिनीवर साऱ्या फरशीवर निजणे म्हणजे काय ह्याचा अनुभव वत्सल असे वडील घेत होते. घरांतील सगळ्यांनाच ते दिवस मोठ्या दुःखाचे गेले. विशेषतः आई नि कमला ह्यांचा जीव तर खालीवर होत होता. पितापुत्रांची राजकारणामुळे, या कधी न संपणाऱ्या वादविवादानीं ताटातूट व्हावी, दोघे एकमेकांपासून दूर जावेत हा विचारच आईला नि कमलाला सहन होत नव्हता. घरांतील सारें वातावरण विजेनें भारल्यामारखें झालें होते. न जाणो, वडिलांचा राग जागृत होईल किंवा जवाहर चिडेल, संतापेल, या भीतीनें एक शब्दहि बोलण्याची आमची छाती होत नसे.

परंतु पंजाबांतील घडामोडींनीं, जालियनवाला बागेतील त्या गोकद घटनेने वडील बदलले. जवाहरच्या विचारसरणीकडे ते बरेचसे आले. पुत्रावरील अपार प्रीतीमुळे, तसेच पुत्राचा अविचल निश्चय बघून, सत्याग्रहावरील त्याची पूर्ण श्रद्धा बघून वडिलांचीहि शेवटीं खात्री पटली. जवाहरबरोबर उडी घ्यायची, गांधीजींचे नेतृत्व स्वीकारायचे, असा त्यांनीं निर्णय घेतला. परंतु असें करण्यापूर्वी त्यांनी आपल्या वकिलीच्या धंद्याला रामराम ठोकला. हजारो रुपयांची ही मासिक मिळकत थांबली. आणि आतांपर्यंत ऐषआरामाचे, सुखोपभोगांचे असे जे आमचे जीवन चालले होते, त्यांतहि साहजिकच मोठा बदल करणें भाग होते. आमच्या जीवनांत साधेपणा आला. थोडे कष्टहि आले.

वडिलांनीं आतांपर्यंत लाखो रुपये मिळविले होते आणि लाखों मुक्तहस्ते खर्चहि केले होते. त्यांनीं कधीं संचय करून ठेवला नाहीं. वकिलीचा धंदा सोडतांच घरांत अनेक बदल करणें प्राप्तच होते. आतां पैचेंहि नवीन उत्पन्न नसतां ज्या पद्धतीने आतां-

पर्यंत राहत आलों, त्या पद्धतीनेंच पुढें राहणें केवळ अशक्य होतें. वडिलांनीं पहिली गोष्ट केली ती ही कीं त्यांनीं घोडे विकले, घोड्यांच्या गाड्या विकल्या; असें करणें सोपें नव्हतें. कारण घोड्यांवर वडिलांचें फार प्रेम होतें. त्या घोड्यांचा त्यांना अभिमान वाटे. परंतु ते आतां विकून टाकणें प्राप्त होतें. नंतर घरांत जे खंडीभर नोकरचाकर होते, त्यांतील कांहींना रजा देण्यांत आली. इतरहि अनेक बाबतींत काटछाट सुरू झाली. मेजवान्या बंद झाल्या. दोन तीन आचारी घरांत असायचे. आतां एकच उरला. आणि ते झटपट काम करणारे चपळ बटलर आणि त्यांच्या हाताखालची इतर दुय्यम मंडळी, सर्वांना फांटा मिळाला. कांचेचीं नि चिनी मातीचीं रमणीय नयनमनोहर भांडीं–व्हेनिसहून आणलेलीं, ड्रेस्डेनहून आणलेलीं, इतरहि अनेक मौल्यवान वस्तु,–सारें विकण्यांत आलें. घरांत आतां फार गडी माणसें उरलीं नाहींत. रोजचे सुखोपभोग कमी झाले. मी अद्याप फारशी मोठी नव्हतें. लहानच होतें. म्हणून या फेरबदलाचें मला फारसें वाटलें नाहीं. परंतु इतरांना, विशेषतः माझ्या आईबापांना तें सारें जडच गेले.

या साऱ्या घडामोडी होण्यापूर्वी एक विशेष गोष्ट घडली होती. चमत्कारिक घटना. आमच्या घराच्या पाठीमागें पुष्कळशा लहान लहान खोल्या होत्या. त्यांतून कोळसे, लांकडें, तसेंच इतर सामान सांठवून ठेवण्यांत येत असे. एका खोलींत एक प्रचंड नाग राहत असे. त्या खोलींत लांकडें असत. मला आठवते आहे त्यावेळेपासून तो तेथें असे. तो नाग कोणाला त्रास देत नसे. आणि रात्रीच्या वेळींहि गडी माणसें त्या खोलींत निर्धास्तपणें जात. कधीं कधीं हा नागोबा बागेंतून सळसळ करीत जातांना दिसे. तो शांतपणें जात असे. कधीं कधीं त्या सामानाच्या खोल्यांभोंवतीं तो प्रदक्षिणा घालीत फिरे. कोणासहि त्याची भीति वाटत नसे. लोकांची अशी समजूत होती कीं जोंपर्यंत तो नाग कुटुंबाच्या हिताचें रक्षण करीत तेथें आहे, तोंपर्यंत आमच्या घरावर कधीं संकट येणार नाहीं. जोंपर्यंत तो नागोबा येथें आहे, तोंपर्यंत घरांत भाग्यलक्ष्मी नांदणार.

परंतु १९२० मध्यें केव्हां तरी पुढील गोष्ट घडली. वडिलांनीं अद्याप वकिली सोडली नव्हती. घरांतल्या एका नवीन नोकराला तो नागोबा तेथें असतो हे माहित नव्हते. एके दिवशीं तीन्हीसांजा तो नाग त्याच्या दृष्टीस पडला. तो नोकर घाबरला. इतरांच्या मदतीनें त्यानें त्या नागास ठार केलें. ती गोष्ट कळतांच सारे जुने नोकर घाबरले. आईहि घाबरली. गोष्ट होऊन तर गेली. आणि पुढे लौकरच घरांत क्रांति झाली. जें घर पूर्वीं सुखविलासांचें माहेरघर होतें, त्या घरांत अति साधेपणा आला. आणि जवाहर नि वडील तर तुरुंगांत गेले. तो नाग मारला गेला म्हणून हा दुर्दैवाचा फेरा आला, असें नोकरचाकर म्हणत !

असहकार म्हणजे पूर्वीच्या जीवनाचाहि संपूर्णपणें परित्याग, असें वडिलांना वाटे. वयाच्या ६० व्या वर्षी ते आपल्या जीवनाला नवीन वळण देऊ लागले. परंतु

असे करतांना वकिलीच्या धंद्यांतील, राजकारणांतील सहकाऱ्यांपासून दूर जाणें प्राप्त होतें; एवढेच नव्हे, तर बापूजींच्या मतांशीं ज्यांचीं मतें ततोतंत जुळत नव्हतीं, अशा चिरमित्रांपासूनहि दूर जाणे प्राप्त होतें. तसेंच जीवनांतील अनेक सुखांचा त्याग करणें प्राप्त होते. आतांपर्यंतचें सारें जीवन सुखांत गेलेलें; परंतु अमुक एक मार्गच योग्य, अशी एकदां खात्री पटल्यावर वडील मागेंपुढें बघत नसत. ते संपूर्णपणें उडी घेत.

आणि दिवसेदिवस वडील नि जवाहर राजकारणांत अधिकच खोल शिरूं लागले. आतांपर्यंत आमच्या घरांतील जीवन सथ, शांत होतें. परंतु आतां सारेंच अशाश्वत; केव्हां काय होईल याचा नेम नव्हता. हिंदुस्थानच्या चारी कोंपऱ्यांतून किती तरी कॅांग्रेस-कार्यकर्ते आमच्या घरीं येत. कांहीं दिवस राहत. चर्चा करीत. विचारविनिमय करीत. जवळ जवळ रोज बैठक असे. माणसांची जाऱ्ये सारखी सुरू असे. वडिलांना भेटायला पूर्वीहि पुष्कळ लोक येत असत. मला या गोष्टीची सवय होती. परंतु पूर्वींचे भेटणारे नि आतांचे भेटणारे यांत जमीन-अस्मानाचा फेर होता. पूर्वींचे लोक झकपक मोटरींतून येत; किंवा सुंदर घोड्यांच्या गाड्यांतून येत. आपापलें वैभव दाखवायला, आपली ऐट दाखवायला ते उत्सुक असत. कोणाचें ऐश्वर्य अधिक याची जणूं त्यांची स्पर्धा असे. परंतु चळवळ सुरू झाल्यावर वडिलांना भेटायला येणारी ती पूर्वींची बरीचशी मंडळी आतां दूर राहूं लागली. पूर्वी धनकनकसंपन्न लक्ष्मीधर भेटायला येत. परंतु त्याच्या-ऐवजीं आतां साधीं खादीधारी माणसें येऊं लागलीं. ना अहंकार, ना बडेजाव. येणाऱ्या या स्त्री-पुरुषांत किती नम्रता असे. परंतु त्याच्या किंवा तिच्या हृदयांत अजिंक्य असा निश्चय असे, अभग निर्धार असे; देशाची सेवा करण्याचा कृतसंकल्प असे; देशाला स्वतंत्र करूं पाहणारें अदम्य धैर्य असे; आणि जरूर पडलीच तर प्राणार्पणाचीहि तयारी असे.

१९२१ मध्यें गोष्टी जरा निकरावर आल्या. सरकारनें सर्रास अटकेचें सत्र सुरू केलें. सर्वत्र धरपकड सुरू झाली. हिंदी जनताहि तयार होती. हजारों लोक तुरुंगांत जायला अधीर झाले. आतांपर्यंत तुरुंगाची कोणाला स्पष्ट कल्पना नव्हती. परंतु अज्ञान व अपरिचित असणारा तुरुंगच आतां हजारोंचे घर होणार होता. याच वेळेस राजपुत्र हिंदुस्थानला भेट द्यायला आले. अलाहाबादला ते यायचे होते. तारीख ठरली. राजपुत्र अलाहाबादला येण्यापूर्वीं जिल्हाधिकाऱ्याने एके दिवशीं वडिलांना बोलावलें. तो म्हणाला, " तुमच्या घराभोंवतालची जागा तात्पुरती आमच्या ताब्यांत द्या. आम्ही ठराविक वेळीं दरवाजे बंद करीत जाऊ. कोणाला आंत सोडायचे, सोडायचें नाहीं, तें आम्हीं ठरवूं." वडिलांनीं उत्तर दिलें, " माझ्या मालमत्तेच्या उपयोगावर जिल्हाधिकाऱ्याची सत्ता नाहीं. आणि मला योग्य नि कायदेशीर वाटेल, त्या रीतीनें मी माझ्या मिळकतीचा उपयोग करीन. " वडिलांनीं त्यांना अशीहि ग्वाही दिली कीं राजपुत्र अलाहाबादला येईल, त्या वेळेस त्यांना

यत्किंचितहि धोका पोंचणार नाहीं अशी दक्षता घेणें हें सत्याग्रही या नात्यानें, असह-कारी या नात्यानें माझें कर्तव्यच आहे. परंतु वडिलांनीं हें जें आश्वासन दिलें, त्याचें बक्षीस त्यांना काय मिळालें? त्यांना अटक करण्यांत आली. एके दिवशीं सायंकाळीं अशी वार्ता कानांवर आली कीं सर्वत्र धरपकड व्हायची आहे: सारे पुढारी नि प्रमुख कार्यकर्ते यांना गिरफदार करण्यांत येणार आहे. आणि त्याच सायंकाळीं पोलिसांनीं आनंदभवनाला आपली पहिली भेट दिली. १९२१ च्या डिसेंबरची सहा तारीख होती. वडिलांवर नि जवाहरवर पकड वॉरंट होतें. यानंतर पोलिस आनंदभवनला वरचेवर भेटी देऊं लागले. कधीं कुटुंबांतील एखाद्या माणसाला अटक करायची असे, तर कधीं आक्षिप्त वाङ्मया-साठीं झडती घ्यायची असे. हें आक्षिप्त वाङ्मय पोलिसांच्या कल्पनेंतीलच असे. पुष्कळदां आमच्या मोटरी जप्त करण्यासाठीं ते येत. दंड वसूल करण्यासाठीं घरांतील पुष्कळसें लांकडी सामान ते घेऊन जात. घरांत जास्त झालेली ती अडगळ ते कमी करीत.

त्या दिवशीं सायंकाळीं पोलिस आले नि घरांत एकच गडबड उडाली. घरांतील जुनीं गडी माणसें प्रक्षुब्ध झालीं. पोलिसांना चांगले लंबे करून अंगणाच्या बाहेर फेकून देण्याची त्यांची इच्छा होती. परंतु असें कांहीं वेड्यासारखें करूं नका, असें आईनें त्यांना बजावलें. एकाएकीं पकडवॉरंटें आलेलीं पाहून आम्हां सर्वांनाच जरा दुःख वाटलें. परंतु वडील नि जवाहर शान्त होते. आपलीं प्रिय माणसें तुरुंगाच्या गजांआड जाणार हें मनांत येऊन कसेसेंच वाटलें. तुरुंगांत कोणत्या हालअपेष्टा त्यांना भोगाव्या लागतील याची आम्हांला कल्पना नव्हती. सर्वांत आईला तें फार जड होतें. गेले कांहीं महिने घरांत क्रान्तिकारक फेरफार होत होते. या सर्वांचें पुढें पर्यवसान कशांत होणार याची अद्याप तिला स्वच्छ कल्पना नव्हती. परंतु ती वीरपत्नी होती; त्याहूनहि अधिक म्हणजे वीरमाता होती. त्या क्षणीं जरी ती दुःखीकष्टी होती, तरी तिनें तसें मुळींहि दाखविलें नाहीं. वडील नि जवाहर तयार झाले. त्यांनीं सर्वांचा निरोप घेतला. पोलिसांच्या मोट-रींत ते बसले. डिस्ट्रिक्ट जेलमध्ये त्यांना नेण्यांत आलें. आईच्या नि कमलाच्या तोंडा-वर तें वीरहास्य होतें. दोघांचे पति दूर गेले. परंतु त्यांच्या तोंडावर जरी तें शौर्यधैर्याचें हास्य होतें, तरी हृदयांत अंधारच होता. तेथें दुःख होतें. आपण आतां एकटीं अशी भावना होती. मोटर दृष्टीआड झाल्यावर आम्हीं माघारी वळून घरांत आलों. परंतु क्षणापूर्वीं जें घर चैतन्यमय वाटत होतें, तेंच आतां निरानंद नि निर्जीव असें वाटूं लागलें.

वडील, जवाहर नि इतर मंडळी यांचा खटला ७ डिसेंबर १९२१ रोजीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटसमोर चालला. सरकारी वकील हिंदीच होता. वडिलांचा तो जुना स्नेही नि सहकारी. हा खटला मी चालवीत नाहीं असें म्हणण्याचें, राजिनामा देतों असें म्हणण्याचें त्याला धैर्य नव्हतें. परंतु खटला चालवतांना तो किती शरमिंधा झाला होता, किती

गांधळून गेला होता ! वडिलांकडे सरळ पाहण्याचें त्याला धैर्य नव्हतें. सबंध खटला चालवीत असतांना तो दुसरीकडेच पाहत होता. त्याला मोठयानें धड बोलवेना. त्याचें बोलणें कोणाला नीट ऐकू येईना. अशा रीतीनें त्यानें खटला चालविला. यापूर्वी तो वडिलांना बहुधा रोज भेटत असे. आमच्या घरीं येत असे. स्वागत-सत्कार घेत असे. मित्रपणाचे सारे हक्क उपभोगीत असे. परंतु वडिलांना अटक होतांच तो हें सारें विसरून गेला. वडिलांना व जवाहरला सहा सहा महिन्यांची साधी शिक्षा देण्यांत आली. शिक्षा झाल्यावर वडिलांनीं आपल्या सहकाऱ्यांना पुढील संदेश पाठविला:

"तुमच्यांत काम करीत असतांना मीं माझें शक्तिसर्वस्व दिलें. यथाशक्ति तुमची सेवा करून मातृभूमीच्या सेवेसाठीं माझ्या एकुलत्या मुलासह तुरुगांत जाण्याचें सद्भाग्य आतां मला लाभलें आहे. आपण लौकरच स्वतंत्र म्हणून भेटू. मला जातांना एकच गोष्ट सांगायची आहे. स्वराज्य मिळेपर्यंत आपला अनत्याचारी असहकार सुरू ठेवा. शेकडोंनीं, हजारोंनी स्वयंसेवकदलांत सामील व्हा. हिंदुस्थानांत आज तुरुंग हें एकच स्वातंत्र्यमंदिर आहे. त्या मंदिराच्या यात्रेला हजारोंनीं चला. यात्रा अखंड चालूदे. तिला खंड न पडो. दिवसेंदिवस ही यात्रा संख्येनें नि सामर्थ्यानें वाढतच जावो. वंदे मातरम्."

नवजीवनाचा हा आरंभ होता. ज्या जीवनांत शाश्वति नाहीं, निश्चितता नाहीं, अशा त्यागमय, दुःखमय, हृदयभेदी जीवनाचा हा आरंभ होता. ज्या ध्येयासाठीं आम्ही लढत होतों, तें ध्येय अति उदात्त होतें, महनीय होतें. आणि म्हणून त्याच्यासाठीं कितीहि त्याग केला, तरी तो योग्यच वाटे. वडिलांपासून, जवाहरपासून ताटातूट व्हावी याची चीड तर येई; परंतु मातृभूमीच्या संकटकाळीं ते उभे राहिले, आपलें कर्तव्य त्यांनीं बजावलें, असें मनांत येऊन त्यांचा आम्हांला अभिमान वाटे.

त्यांच्या अटकेनंतर पोलिस वरचेवर घरीं येत. दोन चार दिवस झाले कीं येटे यायचे, सारें घर धुडाळायचे. त्यांना ती चटकच जणूं लागली. प्रत्येक वेळेस दंडवसुलीच्या निमित्तानें कांहीं ना कांहीं ते जप्त करायचे. कधीं लांकडी सामान, तर कधीं अन्य एखादी वस्तु. आपण काय नेत आहोंत, किती किंमतीचें नेत आहोंत, याचा विचारच त्यांच्या मनाला शिवत नसे. त्यांना दंडाचे फक्त ५०० रुपये वसूल करायचे होते. परंतु हजारों रुपये किंमतीचा गालीचा नि आणखी इतर वस्तु जप्त करतांना त्यांच्या सदसद्विवेकबुद्धीला कांहींहि वाटत नसे. प्रथम प्रथम क्रोधसंतापानें मी लाल होत असें. परंतु पुढें या गोष्टींची मला संवय झाली.

वडील नि जवाहर तुरुंगांत असतांना गुजरातमध्यें अहमदाबादला कॉंग्रेसचें अधिवेशन भरलें. त्या वेळीं गांधीजी बाहेर होते. त्यांनीं आईला नि कमलाला अधिवेशनास येण्याविषयीं लिहिले होते. आम्हीं जायचे ठरविलें. आई, कमला, तिची लहान मुलगी इंदिरा नि मी चौघें निघालों. ज्यांचे पति तुरुंगांत होते, अशा दुसऱ्याहि कांहीं आमच्या आप्त स्त्रिया आमच्याबरोबर निघाल्या. आमच्यांत प्रथमच तिसऱ्या वर्गानें आम्हीं प्रवास केला. तो नवीन अनुभव होता. आणि पुढें त्याचीच संवय झाली. प्रवास बराच दूरचा होता. फारसा सुखावह असा तो झाला नाहीं; तथापि एकंदरींत गमत होती, मजा होती. मला कंटाळा आला नाहीं ही गोष्ट खरी. असा प्रवास म्हणजे जणूं खरोखरचें शिक्षणच. बहुजनसमाजाला गांधीजींविषयीं, इतर कॉंग्रेसपुढाऱ्यांविषयीं किती भक्तिप्रेम वाटतें, तें प्रथमच मीं पाहिलें. बहुजनसमाजाला वाटणारी ती श्रद्धा, वाटणारी ती भक्ति वरवरची नव्हती, तर आंतरिक होती. प्रत्येक स्टेशनावर आमच्या डब्याभोंवतीं गर्दी जमे. मध्यरात्र असो, वा प्रभात असो, लोकांचे थवे यायचेच. ते आमच्यावर फुलांचा वर्षाव करीत. खाद्यपेयांची रेलचेल उडवीत. जनतेसाठीं स्वराज्य आणायला पुढारी जो त्याग करीत आहेत, त्या त्यागाची आम्हांला जाणीव आहे, त्या त्यागाची आम्ही कदर करतो, असें शेंकडों लहानसान प्रकारांनीं ते दाखवीत. बहुजनसमाजाची ती श्रद्धा पाहून मी चकित झाले. आमच्यावर त्यांनीं केलेली प्रेमवृष्टि पाहून मी दिङ्मूढ झालें. परकीय सत्तेपासून त्यांना मुक्त करण्यासाठीं आम्ही मदत करीत आहोंत असा त्यांना विश्वास वाटत होता. प्रश्न न विचारतां, पुढेंमागें न बघतां, कां कूं न करतां एक लहान माणसाच्या हातांत ते आपलें भवितव्य सोपवायला तयार होते. आणि तो लहान माणुस म्हणजेच गांधीजी.

अविस्मरणीय अशा त्या दीर्घ प्रवासानंतर आम्हीं साबरमती आश्रमांत पोंचलों. आश्रमाविषयीं आम्हीं पुष्कळ ऐकले होतें. परंतु आम्हांला माहिती तशी फार नव्हती. गांधीजींनीं मोठ्या प्रेमानें आमचे स्वागत केलें. वडिलांच्या नि जवाहरच्या प्रकृतीविषयीं त्यांनीं विचारपूस केली. नतर कुणाला तरी आम्हांला आमच्या खोल्या दाखवायला सांगितलें. ते एक प्रकारचें विद्यार्थ्यांचें वसतिगृह होते. त्यांत आम्हीं राहिलों. तें वसतिगृह अगदीं साधें होतें. कांहीं नसणें हेंच तेथील सौंदर्य होतें. दुसरी शोभा तेथें नव्हती. फारशा सुखसोयीहि तेथे नव्हत्या. सर्वांना एकत्र एका मोठ्या खोलींत निजावें लागे. आईला फक्त तिच्यासाठीं एक स्वतंत्र खोली होती. डिसेंबर महिना होता. खूप थंडी होती. परंतु प्रार्थनेसाठीं पहांटे ४ वाजतांच आम्हांला उठावे लागे. नतर स्नानें करून, कपडे धुवून बापूंबरोबर थोडा वेळ आम्हीं दवडीत असूं. बाकी सारा दिवस स्वेच्छेप्रमाणें आम्ही वागत असूं. इतक्या लौकर पहांटे उठणे प्रथम भारी जड गेलें. परंतु तो पहांटे उठण्याचा त्रास फुकट नसे जात. साबरमतीच्या तीरावरील त्या प्रातःप्रार्थना फारच सुंदर वाटत. एकहि प्रार्थना चुकवूं नये असें मला वाटे.

साबरमतीचा आश्रम म्हणजे इतस्ततः पसरलेल्या बऱ्याचशा लहान लहान झोंपड्या. मध्यवर्ती मुख्य झोंपडी बापूंची; इतर झोंपड्यांतून महादेवभाई, गांधीजींचे पुतण्ये नि अन्य कार्यकर्ते राहत. एका झोपडींत अनेक कुटुंबें राहत. बहुधा प्रत्येकजण जमिनीवरच झोपे. मला जमिनीवर झोंपणे आवडत नसे. परतु लौकरच सवय झाली. आम्हांला वाढण्यांत येणारें अन्न फारच साधे असे. साधें, फारच साधें, कमालीचें साधें. चव आणण्यासाठीं मसाले नसत, नाना व्यंजनें नसत. फक्त उकडलेलें असे. प्रथम प्रथम तर आम्हां सर्वांनाच ते खाववेंना. भारी जड जाई. मला नेहमीं भूकच असे. पोट भरेल तर ना. घरीं केव्हां जाईन नि चारी ठाव पोटभर कधीं जेवेन असें झालें होते.

आश्रमांत स्वतःचे कपडे आम्हांलाच धुवावे लागत. ती जाड लठ्ठ खादी धुणें सोपें काम नव्हतें. त्या काळांत ज्या खादीच्या साड्या आम्हीं वापरीत असू, त्या फारच जाड्याभरड्या असत. आईचे व दुसऱ्या एका पोक्त नातलग बाईचें धुणें धुवायला एक मुलगा देण्यांत आला होता. परंतु बाकीच्या आम्हां सर्वांना स्वतःच स्वतःचें धुणें धुवावें लागे. प्रथम तर नीट धुतांच येईना. परंतु हळुहळू जों सवय होऊ लागली, तों घरीं जाण्याची वेळ आली. आमच्या टोळींतील बऱ्याच जणींना चांगलेच धुवायला येऊं लागलें. त्या कलेंत त्या निष्णात झाल्या. परंतु मी मात्र त्यांच्यापैकीं नव्हतें.

अहमदाबादला पंधरा दिवस राहून आम्ही घरीं परतलो. जातांना वाटेंत जो अनुभव आला, तोच पुन्हां परत येतांना. आश्रमांत राहणें, बापूंना पुष्कळसें अवलून पाहायला मिळणें म्हणजे मोलाचा थोर अनुभव होता. तो महान् अनुभव मी कधीं विसरणार नाहीं. तो अनुभव सदैव स्मरणांत ताजाच राहील. बापूंकडे किती तरी लोक असे येत कीं जे आपल्या जीवनांतील वैयक्तिक प्रश्नहि त्यांना सोडवायला सांगत. आपलीं सांसारिक गाऱ्हाणीं, आपल्या कटकटी बापूंकडे आणणें बरें नव्हे असें मला वाटे. खाजगी बाबतींत सल्ला देण्याची उठाठेव बापू कां करतात, ही जबाबदारी आपली आहे असें ते कां समजतात, याचा उलगडा मला कधीं झाला नाहीं. आणि अपेक्षेप्रमाणें जर गोष्टी घडल्या नाहींत, तर हे लोक पुन्हां गरीब बिचाऱ्या बापूंनाच दोष देतात.

वडिलांची नि जवाहरची ही पहिली शिक्षा सहा सहा महिन्यांची होती. आम्ही अहमदाबादहून आलो नि लौकरच जवाहरची सुटका करण्यांत आली. शिक्षा भोगून तीनच महिने झाले होते. परतु जवाहर बाहेर फार दिवस राहू शकला नाहीं. सहा आठवड्यांतच तो पुन्हां तुरुगांत गेला. आणि त्या वेळेपासून तुरुगांत जाणें वा बाहेर येणे ही गोष्ट आमच्या कुटुंबांतील बहुतेक मंडळींच्या अंगवळणींच पडली आहे. ही संवय आतां जणू जाणार नाहीं.

अशा प्रकारें जीवन जात होतें. दिवसामागून दिवस, महिन्यापाठीमागून महिने जात होते. मी घरीं अभ्यास करीत असे. मधून मधून तुरुंगांत भेटीसाठीं जाणें हाच काय तो प्रवास. दुसरा प्रवास आम्हीं केला नाहीं. १९२३ मध्ये सर्व राजकीय कैद्यांची मुक्तता झाली. वडील नि जवाहर पुन्हां आमच्यांत आले. किती छान झालें. वडिलांचें तें सर्वस्पर्शी हास्य इतके दिवस सुन्या असलेल्या घरांत पुन्हां दुमदुमूं लागलें. त्या हास्याचे ध्वनि उमटूं लागले. पुन्हां एकदा आनंदभवनांत तें नेहमींचें शान्त, प्रसन्न जीवन सुरू झाल्याचा थोडाफार भास झाला.

" मुलाच्या इच्छेनुरूप त्याचें जग असतें. बाळघरांतील शेगडीजवळ आपल्याच चित्रांशी तें खेळत असतें. दिव्याच्या प्रकाशांत हें जग किती मोठें दिसतें ! परंतु सारें आठवीत स्मृतीचे डोळे जेव्हां मागें बघतात, तेव्हां तेंच जग किती लहान वाटतें !"

—चार्लस बॉडलेअर

१९२३ च्या अखेरीला नाभा संस्थानांत जवाहरला अटक झाली. सुटल्यानंतर लगेच तो घरीं आला. विषमज्वरानें तो आजारी पडला. दुखणें गंभीर स्वरूपाचें होतें. महिना दीड महिना मोठा काळजीचा गेला. परंतु तो बरा झाला. आमच्या जिवांत जीव आला. जरा हायसें वाटलें.

तरंगाच्या यात्रेला जरा खीळ पडली होती. आम्हांला एकमेकांचें स्वरूप समजून घेणें, स्वभाव समजून घेणें थोडें शक्य झालें. गया कॉंग्रेसनंतर देशबंधु चित्तरंजन दास नि आमचे वडील या दोघांनीं स्वराज्यपक्ष स्थापण्याची कल्पना काढली. पहिली पक्षाची बैठक आनंदभवनांतच भरली. देशबंधु पक्षाचे अध्यक्ष झाले. वडील जनरल सेक्रेटरी झाले.

१९२५ च्या जून महिन्यांत देशबंधु दिवंगत झाले. आतां वडीलच स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आले. देशबंधूंच्या मरणानें वडिलांना मोठाच धक्का बसला. चित्तरंजन वडिलांचे निष्ठावंत नि विश्वासाई सहकारी होते एवढेच नव्हे, तर ते वडिलांचे परम प्रिय मित्रहि होते. वडील आतां मध्यवर्ती विधिमंडळाच्या कामकाजांत गढून गेले. स्वराज्यपक्षाचे ते अध्वर्यु होते. विधिमंडळांतील विरोधी पक्षाचे ते नेते होते. १९२६ च्या मार्च महिन्यांत दिल्लीला विधिमंडळाच्या बैठकींतून सरकारचा निषेध म्हणून एक दिवस स्वराज्यपक्ष एकजात उठून बाहेर गेला. कांहीं सुधारणांच्या बाबतींतील सरकाराच्या वृत्तीचा निषेध करण्यासाठीं हें उठून जाणें होतें. स्वराज्यपक्षानें तसें करण्याचा आदेश दिला होता. वडील सर्वांच्या पुढें होते. ते निघाले नि पाठोपाठ स्वराज्यपक्षाचे सारे सभासद निघाले. या प्रसगीं वडिलांनीं केलेलें भाषण केवळ अप्रतिम होतें, बेफाम होतें. विधिमंडळाची बैठक चालू असतांना मी कधीं कधीं वडिलांना भेटायला दिल्लीला जात असें; आठवडा आठवडा तेथें राहत असें. बैठकींनाहि प्रेक्षक म्हणून हजर राहत असे. स्वच्छ खादीच्या पोषाखांतील वडिलांची ती धीरोदात्त भव्य मूर्ति पाहून अभिमानानें माझें हृदय भरून जाई. कठिण कठिण असे प्रश्न हाताळण्याची तसेंच विधिमंडळाच्या बैठकीच्या वेळेस विचारलेल्या प्रश्नांचीं समयसूचकपणें बिनतोड उत्तरें देण्याची वडिलांची हातोटी पाहून मला अपार आनंद होई. पक्षानें एकदां विशिष्ट निर्णय घेतल्यावर त्यांत कमीअधिक करायला ते कधीं तयार नसत. ते अशा वेळीं कठोर बनत. भिळते घ्यायला ते बिलकुल तयार नसत. कधीं कधीं निष्ठुरपणें आपल्या सहकाऱ्यांना ते चांगलेंच फैलावर घेत; त्यांची कानउघाडणी करीत. कोणी कांहीं चूक केली, दुबळेपणा दाखविला—जो दाखवायला नको असे—तर मग त्याची दयामाया नसे. तेथें क्षमा नसे. वडिलांचा असा जरी खानदानी नि नबाबी खाक्या होता, तरी ज्यांना त्यांचा स्वभाव माहित होता, जे त्यांना ओळखीत, ते त्यांच्यावर प्रेमच करीत, त्यांची स्तुतिच करीत. प्रतिस्पर्धी वडिलांना जरा टरकूनच असत. वडिलांच्या वाटेस जाण्याऐवजीं दूर बाजूला राहण्याचेच ते पसत करीत.

विधिमंडळांत जेव्हां कडाक्याचा वाद होई, तेव्हां तेथें मीं ऐकायला जात असें. हे जोराचे वादविवाद मला फार आवडायचे. वडील मधून मधून मेजवान्या देत आणि आई येथें नसल्यामुळे आलेल्या पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्यांत वडिलांना मी मदत करीत असें. मी जणू यजमानीण बनें. तें काम करतांना मला खूप आनंद होई, मौज वाटे.

कस्तुरभाई लालभाई म्हणून सुप्रसिद्ध असलेले एक गिरणीमालक विधिमंडळाचे सभासद होते. माझ्या पतीचे-राजाचे ते मामा. कधीं कधीं राजा दिल्लीला त्यांच्याकडे येऊन राहत असे. तेथें तुला मीं प्रथम पाहिलें आणि तेव्हांच तुझ्याशीं लग्न लावायचें

मीं ठरविलें, असें राजा दाव्यानें सांगत असतो. परंतु दुःखाची गोष्ट ही कीं तेथें राजाला पाहिल्याचें मला कांहीं आठवत नाहीं. मीं असें म्हटलें म्हणजे राजा अद्याप चिडतो; जरा सत्रस्त होतो. परंतु तसें मला वाईट वाटण्याचें वास्तविक कारण नाहीं. लग्न होण्यापूर्वी आठ वर्षें राजानें माझ्याशीं लग्न करायचें ठरविलें होतें, याचें मला कां म्हणून वाइट वाटावें ?

१९२५ च्या अखेरी अखेरीला कमला बरीच आजारी पडली. बरींच वर्षें ती आजारी आजारी अशी होती. जवाहरला, तसेंच माझ्या आईवडिलांना ती एक मोठी चिंता लागून राहिली होती. उपचारासाठीं यांना स्वित्झर्लंडमध्यें घेऊन जा असा डॉक्टरांनीं सल्ला दिला. १९२६ च्या मार्च महिन्यांत जवाहर, पत्नी कमला व मुलगी इंदिरा यांना घेऊन युरोपला गेला. त्यांच्याबरोबर स्वरूप व तिचे यजमान हींहि गेलीं. स्वरूपच्या यजमानांचें नांव रणजित पंडित. त्यांना सुटी होती. आणि त्या सुटींत युरोपला जाण्याचें त्यांनीं कधींपासून तरी ठरवून ठेवलें होतें.

त्या वर्षाच्या जून महिन्यांत वडिलांनींहि युरोपांत जायचें ठरविलें होतें. आणि त्यांच्याबरोबर मी जाणार होतें. किती तरी वर्षांत त्यांना विश्रांति मिळाली नव्हती. काम तर खूपच करावें लागे. किती व्याप, किती उद्योग, थोडी विश्रांति घ्यावी, थोडा थारेपालट व्हावा, असें साहजिकच त्यांना वाटलें.

परंतु दुर्दैवानें जाणें रद्द करावें लागलें. एका महत्त्वाच्या खटल्यासाठीं थांबणें प्राप्त होतें. बरेच दिवस हा खटला रेंगाळत पडला होता. आणखी पुढें ढकलणें अशक्य होतें. वकिलीचा धंदा सुरू असतांनाच हा खटला चालवायला वडिलांनीं घेतला होता. पुन्हां कोर्टांत जाण्याची कल्पना त्यांना असह्य होती. परंतु जुन्या पक्षकारांचें पूर्वीचें काम पुरें करणें प्राप्त होतें.

वकिली सोडल्यावरहि किती तरी जुने पक्षकार घरीं यायचे. गयावयां करून प्रत्येकजण म्हणायचा, "माझा एवढा खटला चालवा. माझ्या बाबतींत अपवाद ठरवा." परंतु वडील सदैव नकारच देत. पैशाच्या राशी वडिलांसमोर ते ओतीत; परंतु वडील व्रतच्युत होत नसत. एकदां तर एक पक्षकार एक लाख रुपये फी म्हणून घेऊन आला. वडिलांना तो म्हणाला, "घ्या हे लाख रुपये. माझ्या खटल्यांत तुम्हींच वकील म्हणून काम करा." माझ्या वडिलांनीं तिरस्कारानें त्या पैशांकडे पाहिलें. मी जवळच उभी होतें. माझ्याकडे वळून ते म्हणाले "बेटी, हे पैसे मीं घेणें न्याय्य होईल का, योग्य होईल का ?" काय उत्तर द्यावें मला समजेना. क्षणभर मी गोंधळलें. वडिलांची या वेळीं चणचण होती, त्यांची जरा ओढाताण होती, ही गोष्ट मला माहित होती. आणि ही मोठी रक्कम आली असती तर बरें झालें असतें. ऐन वेळीं मदत झाली

असती. परंतु ते पैसे घेणे रास्त झाले नसते. " नाहीं बाबा, तुम्हीं हे पैसे घ्यावे, असे मला नाहीं वाटत. " एवढेच मीं म्हटले. पटकन् त्यांनीं माझा हात धरला. जणू मीं दिलेल्या निर्णयाचा त्यांना अभिमान वाटला. ते त्या जुन्या पक्षकाराकडे वळून म्हणाले, " माफ करा. मी दिलगिर आहे. तुम्हीं पाहिलेतच, कीं माझी ही मुलगीहि हे पैसे घेण्याच्या विरुद्ध आहे. " मोहाला बळी पडून पित्याला न शोभणारी कन्यका मी ठरते, किंवा पित्याच्या अपेक्षेप्रमाणे त्याला शोभेशी मी ठरतें हें पाहण्याची वडिलांची इच्छा असावी असे मला मागून वाटलें. म्हणूनच त्यांनीं मला तो प्रश्न विचारला.

एकटीनें मीं आतांपर्यंत कधीं प्रवास केला नव्हता. कुटुंबांतील मंडळीशिवाय मी कधीं घरांतून दूर गेले नव्हते. वडिलांनीं स्वतःचे तिकिट तर रद्द केले. माझेंहि करायचे कीं काय, हा प्रश्न होता. युरोपांत का मी एकटी जाऊ ? या बाबतींत वडील माझ्याजवळ बोलले. ते म्हणाले, " तुझ्या इच्छेप्रमाणे कर. तुला मुभा आहे. " एकदां वाटे जावे एकटेंच. एकदां वाटे नये जाऊं. दोन इच्छांचे द्वंद्व चाललें होते. वडिलांबरोबर प्रवास करण्याची माझी इच्छा होती. परंतु वडील तर येऊ शकत नव्हते आणि ही संधि गमावीन, तर लौकरच दुसरी येण्याची कांहीं शक्यता नव्हती. शेवटीं मीं जायचे ठरविले. आणि मला वाटतें, कीं तो माझा निर्णय शहाणपणाचा होता.

अशा बाबतींत निर्णय घेण्याचे वडिलांनी माझ्या इच्छेवर सोंपविलें ही गोष्ट आईला तितकीशी आवडली नाहीं. माझ्यासारख्या तरुण मुलीनें एकटीनें त्या अपरिचित अशा दूर देशांत जाणें ही गोष्ट आईला फारच अयोग्य अशी वाटली. जाण्यापासून माझें मन परावृत्त करण्याची तिनें खटपट केली. तिचे मन दुखविण्याची मला इच्छा नव्हती. परंतु जायला तर मला हवे होते. शेवटी बरीच भवति न भवति होऊन मी एकटीच युरोपच्या यात्रेला निघाले. आयुष्यांत प्रथमच एकटीने केलेला हा प्रवास, आतां नवीन प्रकारचे जीवन, नवीन जग, असे मनांत येऊन थोडी भीति वाटे, तर उत्सुकताहि असे. पहिले कांहीं दिवस अगदी एकाकी वाटले. जरा दुःखीकष्टीच मी होते. परंतु लौकरच नवीन मित्र मिळाले नि बोटीवरचे दिवस आनंदांत, मजेत जाऊ लागले. मी एकटी होते. असरंक्षित होते माझी देखभाल करायला तेथें कोण होते ? परंतु असे कांहीं नवीन मित्र मिळाले, की जे माझे पालक बनले ! आपण होऊन पालकाचा अधिकार ते दाखवू लागले. कोणा तरुणाबरोबर मी बोलत आहे असें बघतांच ते मला प्रवचनें देऊ लागत. अपरिचित अशा तरुणाबरोबर मैत्री जोडणे धोक्याचे असते अशा सूचना ते देत. दहाचे ठोके पडतांच अंथरुणावर जाऊन पडायला ते सांगत. कांहीं दिवस याप्रमाणे मी वागलें. परंतु माझ्या मनाने पुढे बंड पुकारले. त्याचा परिणाम म्हणून अधिक प्रवचनें मला ऐकावीं लागलीं. माझ्याकडे डोळे वटारून जरा रागाने ही पालक मंडळी बघत. परंतु सहीसलामत मी पार पडले. कोणीहि मला बोल लावू शकत नव्हता.

त्या वेळीं जवाहर जिनीव्हाला होता. ब्रिंडिसी येथे तो मला भेटणार होता. परंतु त्याची गाडी चुकली नि तो वेळेवर येऊ शकला नाहीं. मी एकटी कोठे जाणार, कोठे उतरणार? मी जरा कावरीबावरी झालें. परतु बोटीतून माझ्याबरोबर उतरलेल्या कांहीं मित्रांनीं मला मदत केली. नाहीं तर फारच फजिती झाली असती. चांगलेच पस्तावावें लागले असते.

जवाहर मला नेपल्सला भेटला. आम्हीं सरळ जिनीव्हाला न जातां वाटेंत रोम, फ्लॉरेन्स वगैरे शहरें पाहिलीं. मीं जें जें पाहिले, त्याच्यावर माझे प्रेम जडलें. रोमविषयीं मीं किती तरी वाचले होतें. तसेच फ्लॉरेन्स व इतर शहरांबद्दलहि. प्राचीन रोमच्या वैभवानें माझें हृदय सदैव उचंबळत असे, अगावर आनंदाचे रोमांच उभे राहत. याच मुशाफरींत खरा जवाहर मीं पाहिला. जवाहर म्हणजे आदर्श सांगाती, गंमतीदार वाटाड्या. ज्याच्याविषयीं मला जरा भय वाटे, दरारा वाटे, असा तो मोठा भाऊ आतां नव्हता. तो आवडता सोबती झाला, प्रेमळ सवगडी बनला. नाना प्रकारचे मनोरम देखावे बघत जे थोडे दिवस आम्हीं एकत्र दवडले, ते खरोखरच फार सुखाचे होते.

जिनीव्हाला आमची जागा होती ती लहान होती. त्या लहान लहान खोल्या. प्रथम मला मजा वाटली. परंतु नतर ती जागा तितकीशी आवडेना. आनंदभवनांतील त्या प्रशस्त खोल्या, तीं विशाल अगणे, ती ऐसपैस जागा पदोपदीं आठवे. परंतु सध्यां जिनीव्हा येथील या गाळ्यांतच राहणे प्राप्त होतें. मला येऊन अद्याप आठवडाहि झाला नव्हता. तोंच जवाहर एके दिवशीं जिनीव्हा शहराचा नकाशा घेऊन आला. त्याने तो नकाशा, एक इंग्लिश-फ्रेंच शब्दकोश, आणि ट्राम व बस यांच्या तिकिटांचीं कुपनें मला दिलीं. एवढें साहित्य असलें म्हणजे वाटेल तेथें तू एकटीनें जाऊ शकशील, आणि असें स्वावलंबन लौकरच सुरू करणें बरें, असे मला सांगण्यांत आले. कमला घरांत आजारी असल्यामुळे घरकामहि मीं केलें पाहिजे असे मला बजावण्यांत आलें. प्रथम मला जरा जड गेले सारें. परतु हें नवीन शिक्षण मिळाले हें एकापरी चांगलेच झालें. लौकरच सर्व गोष्टींची सवय झाली. त्या काळांत मला फ्रेंच फारसें येत नव्हतें. शाळेंत मीं थोडेफार शिकले होतें. परतु तें असून नसल्यासारखेच होतें. भावाच्या निर्वाणीच्या खलित्यामुळे प्रथम मी जरा घाबरलेंच. परंतु त्याच्याजवळ चर्चा करून उपयोग नव्हता हे मला माहित होतें. मीं कुरकुर न करतां सारें कबूल केलें; त्याप्रमाणे वागायचें ठरविलें: शक्य तों सारें नीट पार पाडायचें असा संकल्प केला. एका गोड तरुण स्विस मुलीजवळ मी फ्रेंच शिकूं लागलें. पुढें ती माझी फार प्रिय मैत्रीण बनली. मार्गरेट ही आमची मोलकरीण. गृहव्यवस्था कशी ठेवायची याचें गुह्यतम शास्त्र तिनें मला शिकविलें. आणि आम्हीं गाडा नीट रेटला. मधून मधून बारीक सारीक भानगडी जरी

उत्पन्न होत, लहानशीं पेल्यांतील वादळें उठत, तरी पण एकंदरींत आरंभीं जीवन जितकें कठिण वाटलें होतें, तसें कांहीं पुढें वाटलें नाहीं.

जिनीव्हाला एक आंतरराष्ट्रीय वासंतिक पाठशाळा होती. जगाच्या सर्व भागांतील लोक तेथें जमा होत. विशेषतः उन्हाळ्याची सुटी असल्यामुळें जिनीव्हाला येणारे विद्यार्थी तेथें जमत. हिंदी, चिनी, सिलोनी, अमेरिकन, फ्रेंच, जर्मन इत्यादि अनेक राष्ट्रांतील विद्यार्थी तेथें गोळा होत. जवाहर त्यांत सामील झाला. थोड्या दिवसांनीं मीहि सामील झालें. तेथें किती तरी नवीन मित्र मीं जोडले. सुप्रसिद्ध असे राजकारणी पुरुष तेथें व्याख्यानें देत. राष्ट्रसंघाची बैठक त्या वेळेस सुरू असल्यामुळें अनेक नामांकित मुत्सद्दी तेथें आलेले होते. ऑक्सफर्ड, केंब्रिज आणि इतर विद्यापीठें यांतील आचार्यहि व्याख्यानें देत. कांहीं विख्यात ग्रंथकारांचींहि तेथें भाषणें होत. व्याख्यानेंहि सरस असत. परंतु मुख्य गोष्ट म्हणजे जगांतील सर्व भागांतील लोकांचे नमुने पाहायला मिळत. त्यांच्याशीं भेटीगांठी होत. हा खरा फायदा.

शाळेच्या वतीनें शनिवार-रविवारीं सफरी आंखण्यांत येत. कमलाची प्रकृति जरा बरी असली, तर जवाहर नि मी पुष्कळ वेळां या सफरींतून सामील होत असू. एकदां अशीच एक सफर ठरली होती. कोल दे व्होझा हा पर्वत पाहायला जाण्याचे आम्हीं निश्चित केलें होतें. आणि ठरलेली मंडळी निघाली. या मंडळींतील बहुतेक अमेरिकन नि स्विस होते. मोठा आनंदी होता हा जथा. जवाहर, मी आणि एक सिंधी विद्यार्थी, अशीं तीन जणंच आम्ही हिंदी होतों. आमचा जो सिंधी मित्र जरा पोषाखी होता. चापून चोपून तो पोषाख करी. आपल्या नीटनेटक्या नि व्यवस्थित पोषाखाची त्याला सारखी जाणीव असे. बाकी सर्वांनीं ढोंपराखालीं घट्ट असणाऱ्या विजारी घातल्या होत्या. अंगांत पुलओव्हर घातले होते. पायांत मोठ्या चुका मारलेले जाड बूट घातले होते. परंतु तो सिंधी सुटसुटित पोषाख करून आला होता. त्याच्या पायांत पॉशशूज होते. आम्ही प्रथम साध्या रेल्वेनें गेलों. नंतर फनीक्युलिअरनें गेलों. फनिक्युलिअर म्हणजे डोंगर चढून जाणारी विशिष्ट प्रकारची आगगाडी. पुढें पर्वत चढून पायींच आम्हांला ठराविक जागीं जायचें होतें. आम्ही चढूं लागलों. दोन तास झाले. चढणें फार कठिण होतें. इतक्यांत पाऊस सुरू झाला. गारांचा पाऊस. बर्फाचीहि वृष्टि होऊं लागली. त्या सिंधी मित्राच्या चढणें जिवावर आलें. त्याचे ते बूट सारखे घसरत. पर्वतारोहणाला ते नाजुक बूट योग्य नव्हते. कधींहि अशा सफरींवर जायचें झालें, तर जवाहर आधींपासून सारी तयारी करायचा. आयोडिन, बॅंडेजिस आणि अशाच इतर आवश्यक वस्तु बरोबर घेतल्याशिवाय तो राहत नसे. त्यानें त्या सिंधी मित्राला एक दुसरा मजबूत शू दिला. त्या सिंधी मित्राची बरीचशी अडचण दूर झाली. नाहीं तर गडी अगदीं आबलदा होता, रडकुंडीस आला होता.

आणखी एक तास आम्हीं चाललो. ओलेचिंब होऊन गेलो होतो. इतक्यांत अशा एका स्थळी आम्ही आलो, कीं जेथें जरा गरम वाटत होतें. नुकत्याच पडलेल्या बर्फावर सूर्यकिरण पसरले होते. आम्ही थकून गेलो होतो. परंतु नुकत्याच पडलेल्या बर्फावरून घरगळत जाण्याचा मोह कोणाला आवरणार? एकापाठीमागें दुसरा, त्याच्या पाठीमागें तिसरा असे लागले बर्फावरून खालीं घसरायला. कोणी दोघे दोघे गेले, कोणी तिघे तिघे. जवाहरहि त्या खेळांत सामील झाला. वरून खालीं जावें, पुन्हां वर येऊन पुन्हां खालीं जावें. मडळी रंगली. फारच थकल्यामुळे मी नुसती बसून बघत होतें. जवाहर पुन्हां एकदां घसरगुंडीची तयारी करीत होता. त्याच्या पाठीमागें दुसरा एक विद्यार्थी बसत होता. परंतु बसतांना जवाहरला त्याचा एकदम धक्का लागला. आणि एकदम जवाहर खालीं जाऊं लागला! त्याची अद्याप तयारी झालेली नव्हती! आणि पाठीमागून मिळाला धक्का! आता काय करायचें! एकटाच चालला खालीं खालीं. त्या उताराच्या कडेला एक प्रचंड कडा होता. आतां जवाहरला तोल सभाळवना. त्या कड्याकडे तो सरळ घसरत चालला. आमचा सर्वांचा श्वास जणू थांबला. सर्वांच्या तोंडचे पाणी पळालें. ते पांच दहा सेकंद. परंतु तेवढ्या वेळांत मी कोट्यवधि वेळां मरण अनुभवलें. त्या तुटलेल्या कड्याच्या जवळ अधिकच जवळ आपण चाललों आहोंत याची जवाहरला जाणीव होती. प्रसगावधान राखण्याची त्यानें पराकाष्ठा केली. एका कुशीला वळण्याचा त्यानें अतिमानुषी प्रयत्न केला. त्याला यश आलें. आणि बर्फातून पुढें आलेल्या कांहीं दगडाळ भागावर जाऊन तो लागला. त्यामुळे तो वांचला. त्याचें तोंड खरचटलें होतें. दडांना लागलें होतें. परंतु प्राण वांचले. दोनचार मिनिटांतला सारा खेळ. परंतु किती तरी वेळ नतर माझे गुढघे दुखत होते. ढोपरांतील सारी शक्ति गेली असें मला वाटलें.

या गभीर घटनेनतर आम्ही सारींच शांतपणें जवळच असलेल्या एका झोंपडीजवळ गेलो. तेथें विस्तव पेटलेला होता. आम्ही त्याच्याभोंवतीं शेकत उभीं राहिलों. आमच्या त्या सिंधी मित्रानें आपले बूट विस्तवाजवळ वाळत ठेवले. आम्हींहि तसेंच केलें. परंतु थोड्या वेळानें तो सिंधी आपले वाळलेले बूट आणायला म्हणून गेला, तर ते वेडेवांकडे झाले होते. पायांत घालणें शक्यच नव्हतें. तो दुःखी झाला. आणि आमचे ते लट्ठ बूट मात्र चांगलेच खडखडीत वाळले असे पाहून तर त्याला अधिकच वाईट वाटलें.

त्या झोंपडींत एक वृद्ध जोडपें राहत होतें. त्या रात्रीं आम्ही परत फिरूं शकत नव्हतों. शेवटीं तेथेंच आम्हीं पथाऱ्या सोडल्या. त्या जोडप्यानें आम्हांला रुचकर जेवण दिलें. पुरुष मडळी खालीं जमिनीवरच झोंपली. तेथें पुरेशा खाटा कोठून असणार? एक जादा खाट त्या जोडप्याजवळ होती. त्या खाटेवर आम्ही दोन मुली गुरंगुटी करून झोंपलों. त्या दोन मुलींपैकीं एक मीच होतें हें सांगायला नकोच. थंडी जणूं चिमटे

काढीत होतों. माझ्याजवळच्या मुलीचें नाव होतें मोली. ती मला म्हणाली, "तू ही चादर अशी वर धर. मी मेणबत्ती पेटवतें आणि हें आंतलें अंथरुण जरा गरम करतें." मीं बेधडक संमति दिली. मीं चादर वर धरली. मोलीनें मेणबत्ती पेटवली मेणबत्ती इकडे तिकडे फिरवून ती बिछाना गरम करूं लागली. परंतु एकाएकीं आम्हांला कांहीं तरी जळल्याची घाण आली. आम्ही पाहूं लागलों. तो चादर पेटली होती तिला चांगलेंच भोंक पडलें. आम्हीं मेणबत्ती झटदिशीं विझविली; आणि पुन्हां बिछान्यांत शिरलों बरें झालें, एवढ्यावरच निभावलें, म्हणून आम्ही देवाचे आभार मानले. नाही तर सारी झोपडी जळून जायची. दुसऱ्या दिवशीं आम्ही घरीं जायला निघालों आम्ही थकून गेलों होतों. गळून गेलों होतों परंतु फिरायला आनंद होत होता

माझा भाऊ पुष्कळदां रोमां रोलांना भेटायला जात असे. जिनेव्हाच्या जवळच व्हिलेनव्ह म्हणून ठिकाण होतें तेथें रोमां रोलां राहत असत भावाबरोबर कधीं कधीं मीहि त्यांच्याकडे जात असे दुसऱ्याहि पुष्कळ विख्यात ग्रंथकारांची, शास्त्रज्ञांची, तत्त्वज्ञानविशारदांची नि माझी भेट झाली. आइन्स्टीन नि अर्न्स्टटोलर हे दोघे तर माझ्या स्मरणांत कायमचे आहेत आइन्स्टीनना मीं प्रत्यक्ष भेटलें नाहीं. परंतु श्री. जगदीशचंद्र बसू यांच्या व्याख्यानाला ते आले होते त्या वेळेस मीं त्यांना पाहिलें व्यासपीठावर इतरांच्या मागे लपून ते बसले होते ते तेथें होते, हें कोणाला माहितहि नव्हतें. परंतु एका अमेरिकन विद्यार्थ्यानें त्यांना ओळखलें आणि ती बातमी क्षणात सर्वत्र पसरली. मग काय विचारतां! मोठीच गर्दी नि गदारोळ झाला. आइन्स्टीनना पाहायला साऱ्यांची धडपड सुरू झाली. "तुम्ही पुढे या, आम्हांला पाहूं दे" अशी हाकाटी सुरू झाली. शेवटीं पुष्कळ मनधरणी केल्यावर आइन्स्टीन पुढे आले विनयानें जरा लाजत सर्वांचें त्यांनीं अभिनंदन केलें. लोकांचें तें भक्तिप्रेम पाहून त्यांना गोंधळल्यासारखें झालें. व्यासपीठावर दोनचार सेकंद ते उभे होते, आणि नंतर पटकन् पाठीमागे कोठें तरी त्यांनी दडी मारली.

टोलरना मीं ब्रूसेल्स येथें पाहिलें त्यांची मूर्ति डोळ्यांत भरण्यासारखी नव्हती. परंतु त्यांचे डोळे आश्चर्यकारक होते तुमच्या मनाच्या आंतल्या गाभाऱ्यांतील विचार ते डोळे जणुं वाचीत आहेत असें वाटे. तसेंच त्यांच्याजवळ बोलण्यांत मोठी गोडी वाटे. कधीं कधीं त्यांच्या तोंडावर अनंत दुःखाची छाया दिसे: दृष्टि मात्र सारखी कशाच्या तरी पाठीमागे जात आहे, असें वाटे.

नाझी राजवटींत टोलरला मातृभूमीचा त्याग करावा लागला. दुसऱ्या देशांत त्यांना आश्रय शोधणें भाग होतें. ते महान् कवि होते. अति थोर अशा दोन वस्तूंचें

त्यांना वेड होतें. सत्याचे वेड नि दुसरे स्वातंत्र्यभक्तीचे वेड. अत्यंत निर्भय अशीं जीं कांहीं माणसें आजपर्यंत मीं पाहिलीं, त्यांच्यापैकीं टोलर हा एक होता. एखाद्या गोष्टी-वर एकदां का विश्वास जडला, एखादी गोष्ट करणें योग्य असें सदसद्विवेकबुद्धीनें जर सांगितलें, तर तसें केल्यावांचून तो कधीं राहत नसे: मग कांहींहि होवो.

स्वतःच्या जन्मभूमीपासून हांकलून दिला गेलेला, भग्नहृदय नि हताश, सारीं स्वप्नें ज्याचीं सपलीं आहेत, सारे भ्रम ज्याचे दूर झाले आहेत, अशा या कवीनें शेवटीं आत्महत्या केली. एक तेजस्वी जीवन अशा प्रकारें संपलें. त्याच्या मृत्यूमुळें जगाची हानि झाली आहे. जग अधिक दरिद्री झालें आहे. परंतु टोलरची काव्यें नि टोलर यांना मरण नाहीं अनंत कालपर्यंत ती अमर राहतील.

जिनीव्हांत थोडे महिने दवडल्यावर आम्हीं मॉन्टाना या डोंगरावर असणाऱ्या गावीं गेलों. फारच लहान होता हा गांव. परंतु अति रमणीय होता. तेथें बरेच महिने आम्हीं राहिलों. तेथेंच मी प्रथम शिशिर क्रीडांत भाग घेतला. बर्फावरून स्केटिंग करणें, ते लांकडी जोडे घालून बर्फावरून चालणें, हे सारें मी शिकलें. विशेषतः ते लांकडी जोडे घालून बर्फावरून खेळण्यांत मला फार मजा वाटे. किती तरी सुखाचे नि मजेचे ते तास गेले.

मॉन्टाना येथें राहत असतांनाच जवाहर नि मीं मधून मधून पॅरिसला जात असू बेल्जम, जर्मनी नि इंग्लंड या देशांतहि कधीं कधीं जात असू इंग्लंड मला मुळींच आवडलें नाहीं. परंतु फ्रान्सवर माझें प्रेम जडलें. विशेषतः पॅरिसवर कधीं आम्हीं सभा-संमेलनासाठीं म्हणून जात असूं, तर कधीं केवळ मजेखातर. प्रथम प्रथम जवाहर एक-टाच जात असे. पुढें एकदां तो म्हणाला, "तू माझ्या उपयोगी पडणार असशील, माझी सेक्रेटरीण म्हणून काम करणार असशील, तर तुलाहि मी बरोबर नेत जाईन " भावा-बरोबर जायला मिळणार या विचारानें हृदय आनंदानें फुललें. परंतु चिटणीसाचें काम कसें जमणार ? कारण जवाहरला संतुष्ट करणें मोठें कठिण काम होतें त्याला योग्य काम हवें असे. बावळटपणा त्याला सहन होत नसे. काम नीट झालें नाहीं, तर तो संतापत असे. परंतु भावाबरोबर जाण्याचें मोठें आकर्षण होतें. मीं त्याची अट मान्य केली लगेच तडक जाऊन जवाहरजवळचा टाइप रायटर मीं मागून घेतला त्याच्यावर काम शिकू लागलें. जवाहरचे पुढें मला चिटणीस व्हायचें होतें. त्याची तालीम मी घेऊ लागलें. तयारी करूं लागलें. यापुढें जवाहरबरोबर मी बहुतेक साऱ्या सफरींत होतें. तें एक शिक्षणच मला मिळत होतें. परंतु माझी कल्पना होती तेवढी गमत नि मौज मात्र लाभलीं नाहींत. जवाहर माझी कधीं गय करीत नसे. माणसानें खूप काम करावें असें त्याला वाटे. आणि मला कामाची मुळींच सवय नाहीं, असें त्याचें म्हणणें. तो एकदां

मला म्हणाला, " फारच सुखांत नि ऐषआरामांत तूं वाढलीस. असलें सुखासीन जीवन व्यक्तित्वाचा विकास नाहीं करीत. थोडे श्रम करीत जा. काम करीत जा. तुझी बघ मग कशी सुधारणा होईल ती. " आणि मला कबूल केलें पाहिजे, कीं काम करूं लागल्या-पासून मी पुष्कळच सुधारलें.

जवाहरला जेव्हां फारसें काम नसे, तेव्हां तो मला कलासंग्रह, पदार्थसंग्रहालयें, चित्रशाळा वगैरे गोष्टी दाखवीत असे. जर मला थकल्यासारखें वाटलें नि मीं जवाहरला म्हटलें कीं " आतां उरलेलें सारें आपण टॅक्सींतून जाऊन बघूं " तर तो म्हणे, " एका अटीवर टॅक्सी करीन. रात्रीं मग नाटकाला नाहीं जायचें " केवळ सारखा ऐषआराम करून मनुष्य बिघडतो असें त्याला वाटे. मी मग गप्प बसायची. रात्रींचें नाटक गमावण्यापेक्षां पायपिटी करणेंच मी पसत करीत असें. जरा मुतकी चेहरा करून मी चालूं लागें: तें एक चांगलें शिक्षण मिळत होतें. मला एक सुरेख वळण लागत होतें. ही गोष्ट मला प्रांजलपणें कबूल केलीच पाहिजे. हिंदुस्थानांत अशा प्रकारच्या शिक्षणक्रमांतून मी कधींहि जाणें शक्य नव्हतें. अनावश्यक कष्ट माझा भाऊ माझ्यावर लादीत आहे असें मनांत येऊन कधीं कधीं मी त्याचा द्वेष करीत असें, त्याच्यावर जळफळत असें.

जेथें जेथें मी गेलें, तेथें तेथें मीं नाना राष्ट्रांतील मित्र जोडले; हे मित्र बहुधा विद्यार्थी असत, कलावान असत. अत्यत मोकळ्या वातावरणांत मी वाढलेली होतें. मुलांमुलींत भेदभाव करण्याचें शिक्षण मला देण्यांत आलें नव्हतें. मी मुलीपेक्षां पुष्कळशी मुलासारखीच होतें. पुष्कळदा आई त्यामुळें मला रागें भरत असे. मुलेमुली एकमेकांशीं मोकळेपणानें वागतांना पाहून मला आश्चर्य वाटत नसे. त्यांत कांहीं नवीन आहे असें वाटत नसे. ज्यांना ज्यांना मी भेटें, त्यांच्याशीं वागतांना मी कधीं गोंधळून जात नसें, किंवा उगीच लाजत बसत नसें. कांहीं तर फारच चांगले मित्र मिळाले. आतां—आतांपर्यंत आमचा पत्रव्यवहार सुरू होता. हे महायुद्ध सुरू झाल्यावरहि एक वर्षपर्यंत पत्रें येतजात होतीं; परंतु पुढें सारें बद पडलें. नाझींची टोळधाड जसजशी एकापाठीमागून एक सर्व राष्ट्रांवर पडूं लागली तसतशी माझ्या मित्रांची थोडीहि बातमी येणें बद झालें. त्यांचें आज काय झालें आहे मला माहित नाहीं. ते मित्र का नाझींच्या त्या क्रूर कोंडवाड्यांतून असतील? का या ठिकाणाहून त्या ठिकाणीं अनाथा-प्रमाणे धांवपळ करीत असतील? त्या सर्व स्नेह्यांचा विचार मनांत येऊन मी दिङ्मूढ होऊन जातें. नाना तर्ककुतर्क करीत बसतें. ते सारे मित्र डोळ्यांसमोर येतात. ते उत्साहाचे सिंधु होते. भविष्याची भीति त्यांना कधीं शिवली नाहीं. उद्यां आपलें काय होईल याची फिकीर त्यांनीं कधीं केली नाहीं. या उद्यांच्या भविष्याला आम्हीं आकार देऊं असें ते म्हणत. ज्या जगांत शौर्यधैर्य आहे, परंतु त्याचबरोबर शान्ति नि समृद्धि

आहे, असे नवीन जग आम्हीं बनविणार आहोंत असे ते म्हणायचे. अशीं स्वप्नें खेळवायचे; परंतु तसें नव्हतें व्हायचें: निष्ठुर नियतीनें त्यांची स्वप्नें धुळींत मिळविलीं आहेत. तीं स्वप्नें पुन्हां कधीं कोणाला मिळतील का, हरि जाणे !

सर्वांत सुखाचे दिवस स्वित्झर्लंड नि पॅरिस येथे गेले. आपण पुन्हां ते सुखाचे दिवस जगावे असें कितीदां माझ्या मनांत येते. त्यावेळचे तें निश्चित जीवन. ना काळजी ना कथा. आनंदी असे ते जीवन पुन्हां जगावें, त्या जुन्या मित्रांना पुन्हा भेटावे, असे मनांत येई. कितीदां तरी युरोपांत पुन्हां जायची मीं तयारी केली. परंतु कोठें तरी माशी शिंके. ते बेत, त्या योजना, तशाच राहत. आणि मी पुन्हां गेले नाहीं, हे मात्र खरें.

१९२७ च्या आरंभाला ब्रुसेल्स येथे साम्राज्यशाहीविरोधी असा एक संघ स्थापण्यात आला. संघाची बैठक भरणार होती. हिंदी राष्ट्रीय सभेचा प्रतिनिधि या नात्यानें जवाहरने हजर राहावें असें आमंत्रण देण्यांत आलें. जवाहर तेथें गेला. नेहमीप्रमाणें मी त्याच्याबरोबर होतेंच. जगाच्या सर्व भागांतील लोक तेथे होते. दूरच्या चीनमधले, जावा, सीरिया, पॅलेस्टाइन, आफ्रिका, अमेरिका, इत्यादि देशांचे लोक तेथें होते. आणखीहि इतर पुष्कळ देशांचे होते. अमेरिकेंतील नि आफ्रिकेंतील नीग्रो प्रतिनिधींनीं केलेलीं भाषणे अत्यन्त स्फूर्तिदायक होतीं, पाझर फोडणारीं होतीं.

येथेच प्रथम वीरेंद्र चट्टोपाध्याय मला भेटला. सरोजिनीदेवीचा हा भाऊ. "अंकल चट्टो" (चट्टोकाका) या नांवानेंच ते ओळखले जात. मातृभूमींतून त्यांना निर्वासित करण्यांत आलें आहे. कित्ती तरी वर्षे मायभूमीपासून ते दूर आहेत. एका देशांतून दुसऱ्या देशांत सदैव भटकायचें. कोठें घर ना दार. जवळ पैसा नाहीं. असा हा वीरेंद्र कसा तरी जगत होता. आला दिवस ढकलीत होता. परंतु तो वैतागला नव्हता. जगावर वा जीवनावर रुष्ट झाला नव्हता. कपाळावर आंठी ना आढी. तो कशांत कांहीं नाहीं असें म्हणणारा नास्तिक नव्हता झाला. त्याच्या जीवनांत कटुता नव्हती आली. उलट त्याच्या मुखावर सदैव स्मित झळकत असे. प्रत्येकाशीं अनंदाने बोले. तो हुशार होता. सौम्य, स्निग्ध होता. थोडक्यांत म्हणजे गोड होता. ज्यांच्यावर खूप प्रेम करावें असे वाटे, अशा ज्या कांहीं व्यक्ति आयुष्यांत मला भेटल्या, त्यांच्यापैकीं हा वीरेंद्र एक होता. मला त्याचा लळा लागला, त्याला माझा. जसजसा त्याचा अधिक परिचय होऊं लागला, तसतसा त्याच्याविषयीं वाटणारा आदर वाढतच गेला. त्याच्याबद्दल वाटणारे कौतुक वाढतच गेले. उपासमार डोळ्यांसमोर दिसत असतांहि त्याचें धैर्य गळत नसे. पुष्कळ वेळां दुपारचे जेवण तो थोड्या फळांवरच करी. परंतु तीं दोनचार फळेंहि तो एकट्यानें खात नसे. अडचणींत असलेल्या एखाद्या गरीब हिंदी विद्यार्थ्यालाहि तीं खाण्याचा, त्यांत

भागीदार होण्याचा तो आग्रह करी. १९२७ च्या ऑक्टोबर महिन्यांत आम्ही बर्लिनला गेलो. तेथें चट्टोकाका पुन्हां भेटला. त्याच्या स्वभावाचें अधिकच अंतर्दर्शन झालें. आम्हां सर्वांनाच त्याच्याविषयीं प्रेम वाटे नि तोहि आम्हांवर प्रेम करी. तू परित्यक्त नाहींस, तू आमच्या कुटुंबांतलाच जणू आहेस, ही भावना का आमच्यापासून त्याला मिळाली? कितीं तरी वर्षांत आपलेपणाच्या भावनेची ही प्रेमळ ऊब त्याला मिळालेली नव्हती, म्हणून का तो आम्हांवरहि प्रेम करी?

त्या दिवशीं सायंकाळीं आम्ही बर्लिन सोडणार होतो. वीरेन्द्र स्टेशनवर आला होता. निरोप द्यायला आला होता. एकटें राहायची त्याला आतां सवयच झाली होती. परिव्राजकाचेंच त्याचें जीवन होतें. तरीहि आम्हांला निरोप देतांना तो सद्गदित झाला. तो प्लॅटफॉर्मवर उभा होता. नमस्ते म्हणत होता. त्याच्या डोळ्यांत अश्रु आले. तो म्हणाला "कृष्णा, हा कायमचा निरोप आहे कीं आपण पुन्हां भेटूं? पुनरागमनायच असें का म्हणूं? तुला पुन्हां मी भेटेन अशी आशा तर आहे. आणि कोणाला माहित कदाचित् मीच तिकडे हिंदुस्थानच्या सीमेजवळ यावयाचा, तुझें दर्शन घ्यायला यायचा!" माझें हृदयहि भरून आलें होतें. रडायच्या बेतांत मी होतें. कारण वीरेन्द्र पुन्हां दृष्टीस पडणार नाहीं, असें मला वाटत होतें. गाडी स्टेशनांतून बाहेर पडली. वीरेन्द्र दिसत होता, तोंवर मी हातरुमाल हलवीत होतें. त्याच्या ओठावर थरथरणारें तें शेवटचें स्मित मला अद्याप आठवतें. तें स्मित तो दाखवूं इच्छित नव्हता. आंतल्या आंत दाबू पाहत होता. आणि अशा रीतीनें आमची ताटातूट झाली. त्या प्लॅटफॉर्मवर त्याची ती एकाकी, परित्यक्त मूर्ति होती. त्याला सोडून आम्हीं गेलों. तो आपल्या कष्टाच्या, अनिश्चिततेच्या, एकाकी जीवनाकडे गेला. आणि आम्हीं आमच्या सुखसमृद्धीनें भरलेल्या घराकडे आलों. आम्हांला कशाची ददात नव्हती. सारी सुरक्षितता होती. त्याला उद्यांची फिकीर. त्या वेळेपासून जवाहरला नि मला चट्टोकाका अधून-मधून लिहित असत. त्याची खुशाली कळे. परंतु पुढे बातमी येणें बंद झालें. नाना प्रकारच्या बऱ्याच वाईट वार्ता कानांवर येत. कोणी म्हणत, तो जिवंत आहे; परंतु त्याची फार दैना आहे. दुसरे कोणी म्हणत, कीं त्याला अटक करण्यांत येऊन रशियांत गोळी घालून ठार मारण्यांत आलें. खरोखर काय घडलें, तें कोणालाच माहित नाहीं. वीरेन्द्र जिवंत आहे कीं मेला, हें अद्याप गूढ आहे.

बर्लिन व इतर शहरांत पुष्कळ हिंदी क्रान्तिकारक आम्हांस भेटले. त्यांच्याजवळ बसून त्यांच्या नानाविध चळवळी, अनेक गोष्टी ऐकायला मला आवडे. त्यांचें धैर्य पाहून मला अपार आदर वाटे. त्यांनीं किती तरी त्याग केला होता: किती तरी हालअपेष्टांतून ते गेले होते. आर्थिक अडचण तर नहमीं त्यांच्या डोळ्यांसमोर असे. तरीहि ते शक्य तितक्या आनंदानें जीवन कंठित. त्या प्रतिकूल स्थितींतहि उत्साहानें

राहत. सर्व जगभर हे निर्वासित देशभक्त पसरलेले आहेत. त्यांचे शौर्य कल्पनातीत आहे. मातृभूमीचे उमदे असे सुपुत्र! परंतु हिंदुस्थानांतील किती जणांना त्यांची माहिती आहे! आणि ज्यांना त्यांची माहिती आहे, ते तरी त्यांची कितीशी आठवण करीत असतील, त्यांच्यासबंधीं विचार करीत असतील!

अविस्मरणीय अशी दुसरी भेटलेली व्यक्ति म्हणजे धनगोपाळ मुकर्जी ही होय. धनगोपाळहि फार प्रेमळ. त्याचा कोणाला कंटाळा येणार नाहीं. प्रेम करण्यासारखी ती मूर्ति होती. सर्वांना हवीहवीशी वाटणारी ती मूर्ति होती. तो तरुण बंगाली ग्रंथकार होता. आपल्या घरून तो पळाला. पुष्कळ रोमांचकारी साहसांनतर तो अमेरिकेत गेला. अमेरिकाच आतां त्याचे घर. तेथला तो नागरिक झाला आहे. फावल्या वेळांत काम करून फीचे पैसे तो जमवी. आणि अशा रीतीने कॉलेजचें शिक्षण त्यानें घेतलें. कॉलेज सोडल्यावर तो पुस्तकें लिहू लागला. "फेस ऑफ सायलेन्स" "कास्ट ॲंड आउट कास्ट," "माय ब्रदर्स फेस" हीं त्याचीं पुस्तकें मीं वाचलीं आहेत. मीं वाचलेल्या कांहीं उत्कृष्ट पुस्तकांपैकीं तीं आहेत. मुलांसाठींहि "गे नेक," "करी दी एलिफंट" इत्यादि गमतीदार पुस्तकें त्यानें लिहिली आहेत.

आम्ही जिनीव्हाला होतों. एक दिवस धनगोपाळचें आम्हांला पत्र आलें. माझ्या भावाच्या नांवानें तें पत्र आलें होतें. परंतु भाऊ त्या वेळीं इंग्लंडांत असल्यामुळें कमलानें तें पत्र फोडलें. आम्हांला भेटण्याची धनगोपाळला इच्छा होती. कमलानें उत्तर पाठविलें कीं जवाहर येथें नाहीं. परंतु तुम्हीं वाटेल तेव्हां येऊं शकतां. तुमचें स्वागत आहे. दोन दिवसांनीं संध्याकाळीं पांच वाजतां बाहेरची घंटा वाजली. मोलकरणीला त्या दिवशी सुट्टी होती. मींच दार उघडलें. तो समोर एक तरुण मनुष्य उभा. काय पाहिजे म्हणून मीं विचारलें. तो म्हणाला, "नेहरूंच्या पत्नींना नि बहिणीला मी भेटायला आलो आहें." मला जरा शंका आली. म्हणून मीं नांव विचारलें. "मी धनगोपाळ मुकर्जी" तो म्हणाला. मी एकदम स्तंभितच झालें. कारण धनगोपाळ म्हणजे लांब दाढी असलेला, पायघोळ कपडे असलेला एखादा वृद्ध पुरुष असेल, अशी माझी नि कमलाची कल्पना होती. परंतु समोर तर एक तरुण देखणा पुरुष उभा होता. त्याच्या बोलण्यांत अमेरिकन हेल होता. डोळे प्रेमस्नेहमय होते. मला वाटणारें आश्चर्य लपविण्याचा प्रयत्न करीत मी त्यांना आंत येऊं दिलें आणि लगबगीनें जाऊन कमलाला बातमी दिली. थोड्या वेळानें आम्ही दोघी बाहेर आलों. तो तेथें धनगोपाळ काय करीत होता, माहित आहे! विस्तव विझत चालला होता. त्यानें निखारे पुन्हां हलवले. टोपरें जमिनीवर ठेवून तो विस्तव पेटवीत होता. आम्हांला पाहतांच तो म्हणाला "आल्यात वाटतें तुम्हीं! येथें जरा ऊब आली म्हणजे बरें, नाहीं का? सारें

गारठलें आहे. मला ऊबदार आवडते." असें म्हणून तो मद स्मित करता झाला. त्याच्या त्या स्मितानें आम्हांला जिंकून घेतलें. किती तरी लोकांना त्यानें आपल्या त्या गोड मोकळ्या स्मितानें आजपर्यंत आपलेंसें करून घेतले होते. त्यावेळेपासून धनगोपाळशीं जेव्हां जेव्हां म्हणून संबंध येई, जेव्हां जेव्हां त्याची गांठ पडे, तेव्हां तेव्हां कांहीं तरी गमत असायचीच. तो आम्हांला अनेक प्रकारे चकित करायचा. कधीं तो फळें घेऊन यायचा, तर कधीं फुलें आणायचा. कधीं भाजीच घेऊन स्वारी यायची. आणि मग हट्ट धरून बसायचा नि म्हणायचा "मी बगाली पद्धतीनें ही भाजी करतो. बघा तरी!" तो भाजी शिजवी, परतु ती बगाली पद्धत मुळींच नसायची! तो कधीं कधीं मलाहि फिरायला नेत असे. चालतां चालतां जर उकडायला लागलें, तर तो आपला कोट, आंतील बडी सारेंच काढून कांखेखालीं घेऊन चालायचा. मला ते बरें नसे वाटत. असा कसा हा वागतो असें वाटायचें. तो मला नेहमीं म्हणायचा, "तुमची नेहमीं जरा धांवपळ असते. सारी धांदल असते. तुम्ही हिंदी नाहीं दिसत. इतकी घाई करून करायचें काय? जीवन जरा शांत असावें. रोज सकाळीं तुम्ही घटकाभर ध्यान करीत जा. जीवनात एक प्रकारचा समतोलपणा नि शांन्ति त्यामुळे येईल. बघा करून." असा मोठा विक्षिप्त होता हा धनगोपाळ. कांहीं विशिष्ट गोष्टींचे त्याला वेड होते. परंतु एकदरीत फार प्रेमळ नि गोड मनुष्य. मला जीं माणसें भेटलीं, त्यांत हा धनगोपाळ म्हणजे फारच आनददायी, फारच प्रेमार्द्र; किती तरी वर्षे पुढे आमचा पत्रव्यवहार सुरू होता. १९३२ मध्यें धनगोपाळ हिंदुस्थानांत धांवती भेट द्यायला आला होता. त्याच्याजवळ पूर्वीचें तें तारुण्य, तो जगण्यांतील आनद आतां तितका राहिला नव्हता. जीवन वाटते तितकें सोपे नाहीं, असा त्याला अनुभव आला होता. पुष्कळसा त्याचा भ्रमनिरास झाला होता. ग्रथकार म्हणून मिळावें तेवढें यश त्याला मिळाले नाहीं. अपेक्षप्रमाणे सारें झाले नाहीं. तो थोडा निराश झालेला दिसला. एका अमेरिकन बाईशी त्यानें लग्न लावलें होते. त्याला एक लहान मुलगा होता. त्याचें नांव गोपाळ. त्या मुलाचेंहि आज २५ वर्षांचे वय असेल. धनगोपाळची पत्नी त्याच्यापेक्षां वयानें मोठी होती. न्यू-यॉर्कमधील एका मोठ्या मुलींच्या शाळेची ती प्रिन्सिपॉल होती. फारच छान होती ही बाई. हुशार नि कार्यक्षम होती. कुटुंबांतील कायमची मिळविणारी अशी तीच. त्यामुळेच धनगोपाळ जरा दुःखीकष्टी असावा. पत्नीच्या पैशांवर आपल्याला बरेचसें जगायला लागावें, हे त्याच्या मनाला बहुधा बोचत असावें. १९३२ पासून पुढे धनगोपाळचीं जीं पत्रे येत, ती दिवसेंदिवस अधिकच निराशेनें भरलेलीं अशीं येत. त्या पत्रांतून उत्तरोत्तर वाढती खिन्नताच दिसे. पुढे पत्रे बदच झालीं. आणि १९३५ मध्ये आम्ही असें ऐकलें कीं गळफांस लावून घेऊन धनगोपाळनें आत्महत्या केली!

धनगोपाळ हा आमचा फार आवडता मित्र होता. त्याच्या मृत्यूची ती करुण गर्भीर वार्ता ऐकून जवाहर, कमला, मी, आम्हां सर्वांनाच मोठा धक्का बसला. आमचा प्रेमळ नि निष्ठावत मित्र गेला. हिंदुस्थानचा एक अज्ञात परंतु तेजस्वी असा सत्पुत्र गेला.

१९२७ च्या उन्हाळ्यांत वडीलहि युरोपला आले. मला फार आनद झाला. जवाहरलाहि. वडिलांना केवळ विश्रांतीचीच जरूर होती असें नाहीं, तर निराळ्याच वातावरणांत जाऊन राहण्याची जरूर होती. जरा सपूर्णपणे निराळें असे जग त्यांना हवें होतें. ते येणार म्हणून आम्ही वाट बघत होतों. सारखी भीति वाटत होती कीं पुन्हां कांहीं तरी काम निघेल आणि मागच्याप्रमाणे पुन्हां बेत रद्द करावा लागेल. परतु एकदांचे आले. कांहीं भानगडी उत्पन्न झाल्या नाहींत. तिकिटाची वगैरे सारी व्यवस्था झाली. बोटींत बसण्यापूर्वीच्या पत्रांत ते लिहितात:

"तुझा नि भाईचा तिकडून सारखा आग्रह सुरू आहे कीं मीं विश्रान्तीसाठीं युरोपला यावें. इकडे स्वरूप नि रणजित यांचेहि सारखे तेच सांगणे. त्यामुळे मी यायचे ठरवीत आहे. लौकरच मी तिकडे येण्याची शक्यता दिसत आहे. गेलीं सात वर्षे जें सार्वजनिक कार्य मी करीत आहे, त्यामुळें मी जरा थकून गेलो आहे. आणि इतकीं वर्षे काम करून डोळ्यांत भरण्यासारखी देशाची कांहीं प्रगति मी करू शकलों आहें असेंहि दिसत नाहीं. मनाला या गोष्टीचा त्रासच होतो. जरा दुःखच होते. म्हणून थोडी विश्रांति घ्यावी असे मीं ठरविलें आहे. तुमच्याबरोबर राहण्याचा आनंद तरी थोडा कां न लुटावा, असे मनांत येते. "

मीं पाठवलेल्या एका पत्रांत ब्रसेल्स येथील साम्राज्यविरोधी सघाची हकीगत कळविली होती. त्यासबधीं वरील पत्रांतच पुढील मजकूर होता.

" ब्रसेल्स येथील परिषदेची तू हकीगत लिहून पाठविलीस, ती हकीगत मिळाली. वाचून आनंद झाला. तुला त्या परिषदेविषयीं काय वाटले ते तू लिहिले आहेसच. बेटी, तू तर लहानशी राजकारणपटु बाईच बनली आहेस जणु. तू मुलगी आहेस म्हणून घाबरून जाण्याचें कारण नाहीं. त्यामुळे तुझ्या राजकीय जीवनांत अडथळा येईल असे समजण्याचे कारण नाहीं. पुरुषाप्रमाणेच किती तरी स्त्रियांनीं आपापल्या देशाच्या उद्धारांत महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. कांहींनीं तर पुरुषांपेक्षांहि वरचढ नि श्रेष्ठ दर्जाची सेवा केली आहे. पुरुषांपेक्षांहि त्या अधिक प्रसिद्ध झाल्या आहेत. आपल्याला आपल्या देशाविषयीं काय वाटते, हा मुख्य प्रश्न आहे. तुम्ही स्त्री आहांत कीं पुरुष हा मुख्य प्रश्न नाहीं. देशोद्धाराच्या कामाला अंतःकरणपूर्वक कोण वाहून घेतो हा प्रश्न आहे: स्त्रीला येथे मज्जाव नाही. उलट एखाद्या निश्चयी स्त्रीचा जितका प्रभाव पडेल, तितका पुरुषाचाहि पडणार नाही. म्हणून सांगतो कीं तुलाहि सपूर्ण सधि आहे. खरी देशभक्ति

तुझ्या रक्तांत आहे हे ध्यानांत धर. विसरू नकोस. तूं आपण होऊन ती देशभक्ति आतल्या आंत दडपूनच टाकलीस, तर गोष्ट वेगळी. परंतु ती तुझ्या रक्तांत आहे आज ना उद्यां ती प्रकट झाल्याशिवाय राहणार नाहीं; प्रभावी ठरल्याशिवाय राहणार नाहीं. "

१९२७ च्या सप्टेंबरमध्ये वडील आले. एका वर्षाच्या वियोगानंतर वडील आपल्या मुलाबाळांत पुन्हां आले होते. त्यांना आनंद झाला नि आम्हांलाहि. जवाहर-बरोबर दवडलेला काळ, आणि आतां वडिलांबरोबर जाणारा काळ यांत किती अंतर. जवाहरबरोबर राहणें म्हणजे एक प्रकारचें व्यापक शिक्षण घेणें. त्या वेळीं मी अभ्यास करीत असें. त्याची सेक्रेटरीण बनून काम करीत असें. नाना प्रकारें त्याच्या उपयोगीं पडत असें. त्याला साहाय्य करीत असें. परंतु आतां वडिलांबरोबर जरा सुखांत, आरामांत दिवस दवडूं लागले. या दिवसांचा मीं मनसोक्त आनंदानें उपभोग घेतला. परंतु हें सुखासीन जीवन फार दिवस मीं उपभोगलें नाहीं. आणि त्याचें वाईट नाहीं वाटत. उलट तें बरेंच असें वाटतें.

आम्ही लंडनला सारीं बरोबर गेलों. जवाहरला हॅरो येथें ठेवण्यासाठीं किती तरी वर्षांपूर्वी जेव्हां वडील आले होते, तेव्हां ज्या हॉटेलांत ते उतरले होते, त्याच हॉटेलांत आम्ही याहि वेळेस राहिलों. तेथें आल्यावर तेथल्या एका नोकराला मीं विचारलें " आमचीं पत्रें वगैरे आहेत का ? " " कृपा करून नांव सांगतां आपलें ? " " नेहरू " मीं म्हटलें. तो पत्रें आहेत का पाहूं लागला. आणि " नेहरू नेहरू " असें सारखें पुटपुटत होता. एकदम तो माझ्याकडे वळून म्हणाला, " किती तरी वर्षांपूर्वी नेहरू नांवाचे एक सद्‌गृहस्थ येथें उतरले होते. मला माहित आहेत ते. ते फार श्रीमंत होते. आणि एकंदरींत फारच चांगले होते ते गृहस्थ. त्यांची पत्नी, तीहि मोठी सुरेख होती. त्यांचा मुलगा हॅरोला जात असे. तुम्ही त्याच नेहरूंच्या का कोणी नातलग ? " त्याचें तें बोलणें ऐकून मी रोमांचित झालें होतें. माझ्या तोंडावर आनंद फुलला होता. मीं त्या आश्चर्यचकित नोकराला म्हटलें, " ते जे सभ्य गृहस्थ येथें राहत होते, तेच माझे वडील. तेच आज आले आहेत, आणि आज त्यांच्याबरोबर जरा टक्कल पडलेले असे दुसरे जे सद्‌गृहस्थ आहेत, तेच ते पूर्वीचे हॅरोला जाणारे त्यांचे चिरंजीव. " त्या जुन्या नोकराला आनंद झाला. आणि त्यानंतर आमचें काम तो फारच दक्षतेनें करी. इतक्या वर्षांनंतरहि आमचें नांव त्याच्या ध्यानांत राहिलें हें आश्चर्यकारक नव्हे का ? त्यानें सांगितलेली ती जुनी हकीगत ऐकत असतां मला केवळ आश्चर्यच नाहीं वाटलें, तर माझें हृदयहि हेलावलें.

वडिलांबरोबर जेथें जेथें आम्ही जात असूं, राहत असूं, तेथें तेथें आमचा राज-शाही सत्कार व्हावयाचा. आम्ही त्या हॉटेलांत उतरलों नाहीं तोंच मॅनेजरनें फुलें पाट-

विलीं, अभिनंदनपर निरोप पाठविला. थोड्या वेळाने तो स्वतः भेटायला आला. आमची सारी सोय नीट लागली आहे कीं नाहीं ते त्यानें पाहिले. नेहमीं कोणी ना कोणी आमच्याभोंवतीं घिरट्या घालीत असेच. थोडा वेळ का होईना, हा जो जीवनांत बदल झाला, त्यामुळे मला तरी खूप आनंद होत होता. मी सुखावले होते.

आम्ही पॅरिसला होतों, तेव्हां एके दिवशी वडील एकटेच लंडनला जात होते, "तुला लंडनहून काय आणू?" त्यांनीं मला विचारलें. मीं सांगितले कीं बरेच दिवसांपासून एक लहानसा कातड्याचा कोट घेण्याची मला इच्छा आहे. तो घेऊन या मिळाला तरः लांब कोट नव्हे होः आंखूड. जवाहरनें कांहीं घेऊन दिला नाही. कशाला हवा, काय जरूरी, असे तो म्हणे." "बरें, मी आणीन हं बेटी" ते म्हणाले. ते गेले. परंतु माझें माप घेऊन जायला ते विसरले. लंडनला गेल्यावर "सेल्फ्रीजीस" या दुकानांत ते गेले. ते म्हणाले "मॅनेजरला मला भेटायचे आहे." मॅनेजर आला. शांतपणे वडील त्याला म्हणाले "माझ्या मुलीसाठीं एक कातडी कोट मला घ्यायचा आहे. परतु मीं माप तर आणले नाहीं, तेव्हां तुम्ही असे कराल का कृपा करून? दुकानांत काम करणाऱ्या ज्या मुली आहेत, साधारण पांच फूट दोन इंच उंचीच्या अशा, त्यांना येथें रांगेत उभ्या करा. त्या मुली अगांत कोट घालून बघतील, आणि माझ्या मुलीला साधारणपणे कोणता ठीक होईल ते मी त्यावरून ठरवीन." ही विचित्र मागणी ऐकून मॅनेजर चमकला. परंतु वडिलांनीं आग्रहच धरला. त्या विचित्र गिऱ्हाइकाची ती लहर शांत करण्याचे मॅनेजरनें ठरविले. आणि तो सारा विनोदी प्रकार तेथे झाला. आणि वडील एक छानसा कोट माझ्यासाठीं घेऊन आले. कोट पसंत करण्याच्या त्या विचित्र तऱ्हेचे त्यांना कांहींच वाटले नाहीं. त्यांत कांहीं चूक झाली, कांहीं अप्रस्तुत, जगाविरहित असें घडले असें त्यांना वाटले नाहीं. त्यांनीं तो सर्व प्रकार जेव्हां आम्हांला सांगितला, तेव्हां कमलला, नि मला हसू आले, गमत वाटली. परतु जवाहर खवळला. आपला हट्ट पुरविला जाईल अशी बाबांना खात्री होती म्हणून ते असे वागले. परतु बाबांनीं असे करायला नको होतें, ती चूक झाली, असे त्याला वाटले.

१९२७ मध्ये आम्ही थोडे दिवस बर्लिनला आलो होतो. मास्कोला त्या वेळेस रशियन क्रान्तीचा दहावा वार्षिकोत्सव होता. वडिलांना नि जवाहरला हजर राहण्याविषयीं आमंत्रण आले होते. जवाहरला जायची इच्छा होती. कमला नि मीहि जायला उत्सुक होतो. वडील प्रथम म्हणाले, "कशाला जातां? रशियांत फार तर एक आठवडा आपल्याला राहतां येईल. कारण मार्सेलिसला बोट पकडायची आहे. जास्त दिवस नाहींत." जवाहरची फार इच्छा होती. मग वडिलांचें काय चालणार? आम्ही सारीं मास्कोला गेलों. तो कंटाळवाणा प्रवास होता. फार दगदग झाली. वडील तर थकून गेले.

मास्को शहर गभीर परतु जरा नीरस असें वाटले. परतु तेथील स्त्री-पुरुषांना भेटल्यावर कांहीं निराळाच अनुभव येई. साध्या पोषाखांतील त्या स्त्री-पुरुषांच्या अंतरंगांत कांहीं तरी नवीन होतें. हृदयांत कसला तरी नवीन प्रकाश होता. जो त्यांच्या तोंडावरहि थोडा उमटे. आणि त्यामुळें त्यांच्याजवळ बोलण्याचालण्यांत आनंद वाटे. त्यांच्याकडे पाहावें असें वाटे. आपला देश सर्व जगांत महान् करूं, उत्कृष्ट करूं, त्यासाठीं साऱ्या आपत्ति सोसूं, सारे कष्ट करूं, वाटेल तो त्याग करूं, असा एक प्रकारचा कृतसंकल्प, एक प्रकारचा शान्त परतु निर्धाराचा निश्चय त्यांच्याजवळ होता. तो निश्चय त्यांच्या सर्व जीवनांत भरून राहिला होता.

ग्रॅंड हॉटेलमध्ये आम्ही उतरलो होतों. ती एक प्रचंड इमारत होती. प्रशस्त खोल्या होत्या. झारशाहींतील सामानावर जाडेभरडे कापड घालून सारा नवाबी रुबाब झांकून टाकण्यांत आला होता. भांडवलशाही वातावरण तेथें नव्हतें. थंडी तर मी म्हणत होती. सकाळीं घंटा वाजवून मीं मोलकरणीला बोलावून म्हटलें, " स्नान करायला गरम पाणी हवें. " आश्चर्यानें ती माझ्याकडे पाहत राहिली. तिनें नाना प्रकारच्या खुणांनीं नि हावभावांनीं सांगितलें कीं " स्नानाला कढत पाणी मिळणार नाहीं. हें पाणी आहे तेवढयांत भागवा. स्नानाला कढत पाणी मागणाऱ्या अशा तुम्ही आहांत तरी कोण ? स्वतःला तुम्ही काय समजतां ? " तिचा भाव आमच्या ध्यानांत आला. तपेल्या दोन तपेल्या पाणी मिळालें. मीं तोंड वगैरे धुतलें. तेवढया पाण्यांतच आम्हांला सारें समाधान मानलें पाहिजे होतें. परतु वडील ऐकेनात. उन्हाळा असो कीं हिंवाळा असो. दररोजचें स्नान झालेंच पाहिजे. रशिया असो कीं आणखी कोणता देश असो. ते आपली रोजची सवय सोडायला तयार नव्हते. " मला स्नान करायचें आहे, नि गरम पाणी हवेंच " असा ते हट्ट धरून बसले. हॉटेलच्या व्यवस्थापक मंडळींना जरा राग आला.

वडिलांच्या अनेकांशीं मुलाखती, भेटीगांठी व्हायच्या होत्या. रशियन परराष्ट्रमंत्री चिचेरिन-यालाहि भेटायला वडील जाणार होते. चिचेरिन अति हुशार, मोठा कारस्थान-पटु नि धूर्त. त्याला अनेक भाषा येत होत्या. वडिलांची नि त्याची जी मुलाखत व्हायची होती, तिची वेळ ठरली. एक तरुण रशियन भेटीची वेळ सांगायला आला. तो म्हणाला, " चिचेरिनसाहेबांना रात्रभर काम आहे. तुम्हीं पहांटे चार वाजतां या. " वडिलांचा त्या सांगण्यावर विश्वासच बसेना. हा तरुण मनुष्य शुद्धीवर तरी आहे कीं नाहीं, अशी त्याना क्षणभर शंका आली. " काय, ४ वाजतां ! पहांटे ? आणि मी का रात्रभर जागत बसूं ? " वडिलांनीं विचारलें. शेवटीं त्यावेळेस यायला वडील फार नाराज आहेत असें जेव्हां चिचेरिननें पाहिलें, तेव्हां १ च्या सुमारास मुलाखत व्हायचें ठरलें.

क्रान्तिदिनाचा वार्षिकोत्सव मोठ्या प्रमाणावर होता. आम्ही एक दिवस उशीरां आलो. त्यामुळें लाल सेनेची परेड आम्हांस पाहायला मिळाली नाहीं. ते दृश्य मोठें

भव्य होते असे आम्हांला सांगण्यांत आले. लाल चौकांत लेनिनची समाधि आहे. एका कांचेच्या घरांत लेनिनचा देह ठेवलेला आहे. मसाले भरून तो नीट राहील असें केले आहे. ठरलेल्या वेळेला लेनिनचें दर्शन घेण्यासाठीं लोकांना सोडण्यांत येई. त्या महापुरुषाच्या स्मृतीला प्रणाम करण्यासाठीं लाखो लोक येत होते. शांतपणें डोक्यावर टोपी न घालतां जथे करून रांगेंत ते उभे होते. आपली वेळ केव्हां येते याची वाट पाहत गभीरपणें उभे होते. त्या समाधीच्या बाहेरच्या द्वाराशीं दोन सशस्त्र सैनिक पहारा करीत असत. आंतहि पहारेकरी होते. आम्हीहि गेलो. ती समाधि पाहिली. लेनिन जणूं जिवत आहे असे वाटते. केव्हांहि उठून हा बोलेल असें वाटतें.

सोव्हियट सरकारचे जे पाहुणे होते, त्या सर्व पाहुण्यांच्या सत्कारार्थ एके दिवशीं एक मोठी सरकारी मेजवानी होती. लांब दाढी असलेलें, नि अति रुबाबदार अशा दोन कॉमिसारांच्या मध्यें मी बसले होते. स्वभावानें ते गोड होते. ते अस्खलितपणें इंग्लिश नि फ्रेंच बोलत. कितो तरी वेळ जेवण चाललें होतें. कटाळा आला. मला तर तहान लागली होती. परंतु तेथें पिण्यासारखें कांहीं नव्हतें. मी शांतपणें बसून होतें. कोठें कांहीं पेय दिसतें का ते मी पाहत होते. प्रत्येक ताटाजवळ ग्लासें होतीं. आणि मधून मधून मोठाल्या बाटल्या भरून ठेवलेल्या होत्या. त्यांत साधें पाणी असेल असें वाटत होतें. बाटली घेण्यासाठीं मी माझा हात लांबवूं लागलें. परतु एका कॉमिसारनें मला ती तकलीफ घेऊं दिली नाहीं. मला काय पाहिजे ते त्याच्या लक्षांत आलें. त्यानें माझें ते लहानसें ग्लास भरलें नि स्वत:चेंहि भरलें. त्याने पटकन् ग्लास रिकामेंहि केलें. मींहि ग्लास तोंडाला लावलें. एक दोन घोट घेतले नि मला गुदमरल्यासारखें वाटूं लागलें! माझा घसा भाजून निघाला. डोळ्यांतून पाणी येऊं लागलें. तें चुरचुरूं लागलें. मीं शांतपणें निमूटपणे ते ग्लास खालीं ठेवलें. आणि समोर जे खाद्यपदार्थ होते, त्यांतील भराभरा खाऊं लागलें. एकेक क्षण जणूं युगासारखा वाटत होता. थोड्या वेळानें मला जरा बरें वाटलें. नतर मला कळलें कीं मी जें प्यालें तें पाणी नव्हतें. रशियांतील सुप्रसिद्ध असें ते व्होड्का पेय होतें. एक प्रकारची दारूच ती, मद्यच तें.

मास्को हें रशियांतील एकच शहर आम्हीं पाहिलें. तेथें पुष्कळ गोष्टी पाहिल्या. बहुतेक चर्चचे आतां म्युझियम बनवण्यांत आले आहेत. परतु अधूनमधून एखादा वृद्ध पुरुष, एखादी वृद्ध स्त्री त्या चर्चवरून जातांना क्रॉससारखी हाताची खूण करून मग पुढें जातात. जिकडे तिकडे “ धर्म म्हणजे लोकांना गुंगी आणणारी अफू आहे ” अशीं वाक्यें लिहिलेले पोस्टर्स आहेत. तरीही ईश्वराविषयींची कल्पना लोकांच्या हृदयांतून सपूर्णपणें नष्ट झाली आहे, असें म्हणतां येणार नाहीं.

आम्हीं तेथला एक तुरुंग पाहिला. माझ्या मनावर त्याचा खूप परिणाम झाला. १९२० पासून पुढें मीं अनेक तुरुंग पाहिले. सोव्हियट सरकार आपल्या कैद्यांना कसे वागवतें हें जाणण्याची मला जिज्ञासा होती. राजकीय कैद्यांना कसें वागवण्यात येतें, इतर गुन्हेगारांना कशा रीतीनें वागवतात हें मला पाहायचे होते. हिंदुस्थानांतील तुरुंगांच्या मुख्य दरवाजापाशीं सशस्त्र पहारेकरी असतात. आणि तुरुंगांत वॉर्डर असतात. त्यांच्या-जवळ दंडुके असतात. कधीं कधीं इतरहि शस्त्रे असतात. आम्हीं सोव्हियट तुरुंगाच्या जवळ जेव्हां गेलो, तेव्हां मुख्य दरवाजाजवळ एक बंदुकवाला होता. तो पुढेमागे करीत पहारा करीत होता. परंतु तुरुंगाच्या आंत जे रखवालदार होते, त्यांच्याजवळ ना दंडुका, ना कांहीं आम्हीं सरळ आंत शिरलो. तुरुंगाचा गव्हर्नर म्हणाला, " कोणत्या कोठड्यांना भेटायची इच्छा आहे ? पसंत करा. जेथें जायची इच्छा असेल तेथें जाऊं. " नेहमींची हीच पद्धत असते कीं आजच्या खास पाहुण्यांसाठी म्हणून अपवादात्मक ही पद्धत होती ते मला माहित नाहीं. कांहीं भाग आम्हीं निवडले ते आम्हांला दाखविण्यांत आले. बहुतेक कैद्यांना स्वतंत्र खोली होती. प्रत्येकाच्या खोलीचीं दारें उघडीं होतीं. कैदी इच्छेप्रमाणे ये जा करीत, होते. पहारेकरी दूर भिंतीजवळ उभे होते. ते एरवी अडथळा करीत नव्हते. कांहीं कैदी रेडिओवर ऐकत होते तीं यंत्रे त्यांनीच बनविलीं होतीं. कोणी संगीत शिकत होते. आपापलीं वाद्ये वाजवायला शिकत होते. कैदी आठवड्यांतून एकदां जलसा करीत. [illegible] गायन-वादन असे कांहीं कैदी आपल्या खोल्यांत बसून गाणीं, चिजा रचित होते. दुसरे कांहीं कारखान्यांत गेले होते. कोणी बाहेर अंगणात होते. सोव्हियट तुरुंगांतील कैदी माणसे आहेत असे वाटे याच्या उलट हिंदुस्थानांतील कैद्यांची स्थिति असते हिंदी तुरुंगांतील कैद्यांच्या तोंडावर सदैव भीति. डोळे कसे कावरेबावरे असतात. आनंद नाहीं, मोकळेपणा नाहीं. पशुप्रमाणे, रानटी माणसांप्रमाणे त्याना वागवण्यात येते. आम्हीं जो सोव्हियट तुरुंग पाहिला, तो आदर्श वाटला, निर्दोष वाटला. रशियातील सारेच तुरुंग असे असतील असे नाहीं मी म्हणत तेथल्या तुरुंगाविषयीहि पुष्कळ वाचले आहे, ऐकले आहे. तेव्हा सारेच तुरुंग असे असतील, असा निर्णय कसा देऊं ?

मास्कोत असतांना दुसरी एक गमतीची गोष्ट घडली. एकदां एका सभेला मी गेले होते. साधी डाक्याची साडी नेसून मी गेले होते. कोणत्याही प्रकारचा दुसरा शृंगारसाज नव्हता. त्या काळांत छानछोकीकडे तिरस्काराने पाहण्यांत येत असे. एक तरुण कम्यु-निस्ट मुलगी थोडा वेळ माझ्या शेजारीं बसली होती. ती माझ्याकडे वांकून व माझ्या कपाळावरील कुंकुमतिलकाला स्पर्श करून म्हणाली " कशाला हें कुंकूं ? हे का धार्मिक चिन्ह आहे ? रशियांतील आम्हां लोकांना धर्म नाहीं आवडत. " आपण कुंकूं कां लावतों याचा विचार क्वचितच कधीं मीं केला असेल. तो प्रश्न ऐकून मी जरा चपापले,

गोंधळलें. रोजची वेणीफणी कपडे करतांना कुंकूहि लावायचें, एवढेच मला माहित. रोजच्या साध्या वेषभूषेतीलच ती एक गोष्ट. जेव्हां तो प्रश्न विचारण्यांत आला, तेव्हां मी खरें ते तिला प्रामाणिकपणें सांगितलें; परंतु तिचा माझ्यावर विश्वास बसेना. ती म्हणाली, " जर धर्माची ही खूण नसेल, तर सौंदर्यवर्धनाची असेल. आपण अधिक सुंदर दिसावे म्हणून लावतां ना हे कुंकू ? सांगा. स्वतःचे सौंदर्य कृत्रिम साधनांनीं वाढविणें ही भांडवलशाही संस्कृति आहे. असल्या गोष्टींवर आम्हीं कम्युनिस्ट विश्वास ठेवीत नाहीं, " मीं तिला म्हटलें, " अद्याप मी कांहीं कम्युनिस्ट नाहीं. पुढेमागे पटल्यावर होईनहि कदाचित्. कोणी सांगावें ? " तें कांहीं असो. रशियन लोक मला फार आवडले ही गोष्ट खरी. माझ्या उत्तरानें त्या कम्युनिस्ट मुलीचें थोडें समाधान झालें. परंतु तरीहि असंतोषानेंच, नापसंतीच्या दृष्टीनेंच ती माझ्याकडे पाहत होती. कसा हिचा उद्धार होणार, कांहीं आशा नाहीं, अशा दृष्टीनें जणू ती पाहत होती. त्या काळांत रशियांत कडक कपडे वापरणें म्हणजे मनाला थोडा संकोचच वाटत असे. आमच्या अत्यंत साध्या साड्याहि तेथील वातावरणाला शोभत नसत. त्याहि जरा भांडवलशाही-छाप वाटत. परंतु एक विचार माझ्या मनांत येई. सामान्य जनतेचें जीवन सुखमय करणें, त्यांचा संसार सुखाचा करणें असें निश्चित ध्येय ठरवून तदनुसार उद्योग करणें म्हणजे का सर्व कलात्मक दृष्टीचा त्याग करणें ? अशा क्रांतीचा सुंदरतेशीं कांहीं का संबंधच नाहीं ? परंतु असेंहि असण्याचा संभव आहे कीं मला जी स्त्री भेटली, ती जरा अधिक कडवी असेल, जरा आत्यंतिक टोकाला गेलेली असेल.

एका आठवड्यानें आम्हीं बर्लिनला परतलो. रशियाला आम्हीं दिलेली ही भेट फार धांवती होती. परंतु तेवढ्या थोड्याशा अवधींत जो अनुभव आला तो किती प्राणमय, किती मोलाचा, महत्त्वाचा ! त्यांच्या पुष्कळ योजना अद्याप बाल्यावस्थेत होत्या परंतु एक गोष्ट डोळ्यांत भरल्याशिवाय राहत नसे. जो जो कोणीं तेथें आम्हांला भेटे, त्याच्या त्याच्याजवळ आशेचा एक नवीन संदेश होता. आम्हीं, कांही तरी क्रांतिकारक करून दाखविणार असा निर्धार सर्वांजवळ होता. अशी श्रद्धा अडचणींचे पर्वत कां बरें ओलांडून जाणार नाहीं ? हे रशियन लोक अधिक सुखी असा नवा समाज निर्माण करण्यांत यशस्वी होवोत अशी मनापासून मीं प्रार्थना केली; अशी सदिच्छा, आशा मनांत राखली. आणि रशियांत जर असा एक सुखी समाज निर्माण झाला, तर जगांतील साऱ्या मानवजातीची स्थितिहि तो सुधारील असेंहि वाटलें.

नवीन रशियाचे स्वरूप समजून घेणें वडिलांना जरा कठिण गेलें. विशेषतः तेथील सामुदायिक प्रयोगाचे विचार त्यांच्या नीट ध्यानांत येत ना. ते निराळ्या वातावरणांत वाढलेले. त्यांना मिळलेलें शिक्षण निराळें, मनोबुद्धीवर झालेले संस्कार निराळे. नवीन विचार, विशेषतः क्रांतिकारक असे नवे विचार, त्यांच्याशीं स्वतःच्या

मनोबुद्धीला जुळवून घेणे त्यांना कठिण वाटले. परतु रशिया आपण पाहिला याचा त्यांनाहि आनद झाला. जे कांहीं त्यांनीं थोडेसे पाहिले, ते अवश्य पाहण्यासारखें होते. एक नवीनच देश तेथे निर्माण होत होता. आणि आम्हां सर्वांवर तेथील प्रयोगांचा विलक्षण परिणाम झाला. ती धांवती, ओझरती भेट. परतु ती अविस्मरणीय अशी झाली !

" ते धन्यतम दिवस आठवून आज का रडतच बसलें पाहिजे ? ते दिवस आठवून लाजेनें का खालीं मानच घालून राहिलें पाहिजे ? आपल्या पूर्वजांनीं आपलें रक्त सांडलें. ते धारातीर्थी पडले. हे भूमाते, त्या मृत स्पार्टन वीरांपैकीं मूठभर आम्हांला परत दे. त्या तीनशांपैकीं फक्त तीन दे. पुन्हां नवीन थर्मापिली करायला तीन पुरेत. "

— बायरन

मास्कोहून आम्ही बर्लिनला आलों. तेथून पॅरिसला. आणि थोड्या आठवड्यांनींच आम्हीं मार्सेलिसला जाऊन तेथें बोट घेतली. हिंदुस्थानांत परत यायला निघालों.

आईला भेटायला मी उतावीळ झाले होतें. आईपासून इतके दिवस दूर मी कधींच राहिलें नव्हतें. तरीहि पॅरिस सोडतांना जरा कसेंसेच वाटलें. मनाला वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. पॅरिसमध्यें मीं पुष्कळ सुखाचे दिवस दवडले होते. ते प्रसन्न, सुंदर शहर, ती आनंदी, रमणीय नगरी, तिच्यावर माझें प्रेम जडलें होतें. अगदीं निघायची वेळ येईपर्यंत पॅरिस नगराची प्रभावी मोहिनी माझ्या ध्यानांत आली नव्हती. पॅरिसचें आकर्षण कांहीं विलक्षण आहे. आम्हीं पॅरिस सोडलें. आणि तें मनाला ओढूं लागलें. आमची गाडी स्टेशनांतून हळूहळू बाहेर पडली. फ्रान्सच्या या

नयनमनोहर राजधानीला मी पुन्हां केव्हां बरें येईन, असे सारखें मनांत येत होते. मी ही नगरी पुन्हां पाहणार नाहीं, अशी एक चमत्कारिक भावना हृदयांत डोकावे. हें शेवटचेंच दर्शन. पहिलें नि शेवटचें असें मनांत कोणी तरी म्हणे. आणि समजा, पॅरिस पुन्हां पाहिले, तरी तें का असेच असेल ? किती तरी बदल त्याच्यांत झालेला असेल. असे विचार मनांत येत होते. परतु ही सुंदर नगरी नाझींच्या हातांत पडेल, तिच्यांतील आनद, हास्य, सगीत, कला सारें नष्ट झाले असेल, ज्यासाठीं ती जगद्विख्यात आहे ते कांहीं उरणार नाहीं, असें त्यावेळेस चुकूनहि मनांत आले नाहीं.

वडिलांनीं आणखी कांहीं महिने युरोपांत राहायचे निश्चित केले होते. जवाहर, कमला, त्यांची मुलगी इंदिरा नि मी, आम्ही चौघे १९२७ च्या डिसेबर महिन्यांत कोलंबो मार्गानें हिंदुस्थानांत परत यायला निघालो. त्यावर्षी हिंवाळ्यांत राष्ट्रीय सभेचें अधिवेशन मद्रासला भरणार होते. अधिवेशनाला हजर राहण्यासाठीं आम्ही मद्रासला थांबलों. दहा दिवस तेथें मुक्काम करून अलाहाबादला आम्ही घरीं आलो.

परिचित नि प्रिय अशा वातावरणांत मी परत आले खरी; परंतु एक प्रकारची मनाला रुखरुख वाटे, हुरहुर वाटे, मन अशान्त नि अस्वस्थ झालें. घरीं आल्यावर कांहीं महिने तरी मी सुखी नव्हते. समाधान दूरावले. युरोपांतील जीवन कर्ममय होते. तेथे किती उद्योग, किती कामें; परतु येथे घरीं काय करायचें ? पुष्कळसें वाचण्यापलीकडे येथें दुसरा कोणता उद्योग ? वेळ दवडायचा तरी कसा ? युरोपांत रिकामें बसायला सवड नव्हती, तर येथें त्याच्या उलट, करायला कांहीं नव्हते. मी अगदीं कटाळले. सारा उत्साह नष्ट झाला. काय करावें कांहीं सुचेना. त्या जुन्या सुखासीन जीवनाशीं मला जुळवून घेतां येईना. इतक्यांत असे ऐकलें, कीं आमच्या अलाहाबाद शहरांतच एक मॉन्टेसरी पद्धतीची शाळा निघायची आहे. लहान मुलांचा मला विलक्षण लळा होता. मॅाटेसरी पद्धतीचा मीं अभ्यास केला होता. ही पद्धति मला आवडे. या शाळेत काम मिळाले तर बघावें असें मीं ठरविलें. तेथें नोकरी मिळणे कठिण नव्हते. ती सोपी गोष्ट होती. परंतु वडील काय म्हणतील ते मी आतांपर्यंत विसरूनच गेलें होते. एवढयांत माझी बहीण स्वरूप नि तिचे यजमान पुन्हां युरोपमध्यें गेलीं. त्यांनीं आपल्या दोन मुली आईजवळ ठेवल्या होत्या. चंद्रलेखा नि नयनतारा अशीं त्यांचीं नांवे. आईची प्रकृति त्यावेळेस बरी नव्हती. तेव्हां या मुलींची काळजी घेण्याचे काम माझ्याकडेच आलें. या भाच्यांवर माझे प्रेम होते. परंतु त्यांची जबाबदारी घेणे सोपें काम नव्हते.

वडील नुकतेच युरोपांतून घरीं आले होते. एके दिवशीं ते जरा आनंदी वृत्तींत आहेत असे पाहून त्या शाळेंत काम करायला जायची गोष्ट मीं मोठ्या युक्तीनें हळूच काढली. मीं म्हटलें, " मला रिकामे बसून करमत नाहीं. कांहीं उद्योग नको का ?

माझ्यासमोर निश्चित असे कांहींच नाहीं. रोज पांच सहा तास तरी मला काम हवे, कुठे मिळाले तर. आणि काम पुन्हां असें हवें आहे, जें माझ्या स्वभावाला, मनोबुद्धीला मानवेल." वडील म्हणाले, " ठीक, तू जवाहरची सेक्रेटरीण कां नाहीं होत ? किंवा माझी हो. " तें काम चांगले झाले असते; परतु वाटले कीं ते नको. कारण निश्चित अमुक तास काम असें येथे कांहीं नाहीं. आणि तें कामहि पद्धतशीर थोडेच असायचें ? मीं वडिलांना म्हटले, " माझ्या मनांत होते ते हें काम नव्हे. " " तर मग तुझ्या मनांत काय आहे ?" मीं सांगितले, "त्या मॉटेसरी शाळेत जाऊन शिकवण्यांत मला आनद वाटेल." माझ्या शब्दांवर वडिलांचा प्रथम विश्वासच बसेना. परंतु मी खरोखरच सत्यार्थानें, गंभीरपणें बोलत आहें असें जेव्हां त्यानीं पाहिलें, तेव्हां ते म्हणाले, " मला पसत नाहीं. तुझ्या म्हणण्याचा मी विचारहि करणार नाहीं. त्या लहान मुलांत पांच सहा तास तू घालवणार? असें करून आपण सुखी होऊ असे तुला वाटतें; परंतु तो भ्रम आहे. दोन दिवसांत तू कंटाळशील तुला प्रयोगच करून पहायचा असेल, तर रोज तास दोन तास जात जा. वेळच ना घालवायचा आहे ? जा थोडा वेळ तेथे. " माझ्या मनाची तीव्रता त्यांना समजली नाहीं असे मला वाटले. परतु पुन्हां एकदां धैर्य करून ( कारण मला जें करायला हवे होते तें त्यांना सांगण्यासाठीं खरोखरच धैर्याची जरूर होती. ) मीं सौम्यपणें त्यांना सांगितले, " मीं अर्ज तर केला होता आणि त्याचें होकारार्थी उत्तरहि आले आहे. आतां फक्त तुमची अनुमति द्या आणि मी जें काम तेथे करणार आहे ते अवेतनिक केवळ सन्मान्य काम म्हणून करणार नसून सवेतन काम करणार आहें. " माझे बोलणे संपण्याचाच अवकाश आणि वडील वादळाप्रमाणे खवळले मला त्याची कल्पना होतीच. शेवटीं ते म्हणाले, " तेथे करायचेच असेल काम तर कर. परतु सन्मान्य म्हणून कर. वेतन नको घेऊ. " त्या मुद्दयावर आमची दोघांची पुष्कळच चर्चा झाली मी माझे म्हणणे सोडायला तयार नव्हते वडीलहि आपलाच हेका धरून होते. काम करणारी एक मुलगी होण्याचीं माझीं तीं स्वप्ने, त्या माझ्या आशा; सारें उयाला गेले. स्वप्ने विरून गेलीं. आशा अस्तास गेल्या. वडिलांवर माझे फार प्रेम होते. त्यांच्या इच्छेविरुद्ध कशी वागू, बड कसे करूं ? आयुष्यांत प्रथमच आज मला माझ्या वडिलांच्या या सत्ताप्रिय वर्तनाचा राग आला; खूप राग आला. परंतु मीं माझी शांति सोडली नाहीं. वडिलांचे मन वळवणे, त्यांना स्वतःचा विचार बदलायला लावणें सोपें काम नव्हते. तरीहि त्यांचें मन कस वळवतां येईल याच्या विचारांत मी होते. नाना उपाय, युक्त्या मनासमोर आणीत होते. मीं आईची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. परंतु तिनेहि नकार दिला. अर्थात् तिचीं कारणे मात्र निराळीं होतीं. मीं आतां लग्न करावे, कोठें तरी संसारांत स्थिर व्हावें, ही तिची इच्छा. आणि मी नोकरी करायला लागल्यावर लग्नाचें लांबणीवरच पडत जाणार, असे

तिला वाटलें. शेवटीं मी जवाहरकडे गेलें. आणि आनंदाची गोष्ट ही, कीं त्यानें माझ्या म्हणण्याला मान्यता दिली. नुसतें काम करायलाच नव्हे, तर पगारी शिक्षक म्हणूनहि काम करायला त्याची संमति मिळाली. मीं घेतलेल्या निर्णयानें तो खूष झाला आणि वडिलांचेंहि मन वळवून त्यांची अनुमति मिळवून देण्याचें त्यानें वचन दिलें. जवाहरच्या हातांत पुढचें सारें सोंपवून मीं एक सुस्कारा सोडला. ओझें कमी झाल्या-सारखे वाटलें. कांहीं तरी चांगला निकाल लागेल अशी आशा मी करीत होतें. किती तरी वादविवाद झाले. चर्चा झाल्या. शेवटीं एकदांचा वडिलांचा रुकार मिळाला. माझे घोडे गंगेत न्हाले. मी शाळेत शिक्षकीण झालें. जवळ जवळ दीड वर्ष त्या शाळेंत शिक-वण्याचें काम मीं केलें. मला पूर्ण समाधान होतें. पुढें मीं राजिनामा दिला. कारण मला राजकीय चळवळींत भाग घ्यायचा होता. आणि दोन्ही गोष्टी जमणें शक्य नव्हतें. कायदेभंगाची-सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू झाली होती. आणि मी माझा सारा वेळ त्या चळवळींसाठीं द्यायला अधीर झाले होतें.

१९२८ मध्यें कलकत्त्यास राष्ट्रीय सभेचें अधिवेशन भरलें. माझे वडील अध्यक्ष होते. आगगाडीला जोडलेल्या खास डब्यांतून आम्हीं सारी मंडळी अलाहाबादहून गेलों. आम्ही राष्ट्रीय सभेचे पाहुणे होतों. एका भव्य वाड्यांत आमची व्यवस्था होती. तें घर लतापल्लवांनीं, पुष्पमालांनीं, तोरणांनीं, पताकांनीं, राष्ट्रीय झेंड्यांनीं सजवण्यांत आलें होतें. राष्ट्राध्यक्षांचें तें निवासस्थान होतें. म्हणून ही शोभा. दरवाजाबाहेर गणवेश घालून घोड्यावर स्वार झालेले तरुण स्वयंसेवक पहारा करीत होते. ते स्वयंसेवक चपल नि उत्साही होते. सेवापरायण होते. जेव्हां जेव्हां वडिलांना निवासस्थानांतून बाहेर जावें लागे, तेव्हां तेव्हां एखाद्या राजाप्रमाणें त्यांना नेण्यांत येत असे. सर्वांच्या पुढें नीट ताठपणें घोड्यावर बसलेले ते घोडेस्वार असत. त्यांचें घोड्यावर बसणें सहजसुंदर नव्हतें. आपण घोड्यावर बसलों आहोत, नीट ताठ बसलो आहोत, कांहीं चूक नाहीं याची जणू त्यांना सारखी जाणीव होती. घोडेस्वारांच्या मागून मार्गदर्शक मोटरगाडी निघे. तिच्यांत स्वयंसेवकांचा सेनापति असे. त्यावेळेस श्री. सुभाषचंद्र बोस हे स्वयंसेवकांचे मुख्य होते. त्या मोटरींत ते उभे असत. गणवेशांत ते चमकत असत. त्या मोटरीमागून वडिलांची मोटर जाई. ते सारें दृश्य पाहण्यासारखें होतें. परंतु प्रत्येक वेळेस बाहेर पडतांना नि परत येतांना या अशा थाटांत येणें मोठें जिकीरीचें असे. वडील थकले. ही सारी व्यवस्था ज्यांच्याकडे होती, त्यांना वडील म्हणाले, " दर वेळेला कशाला ही मिरवणूक ? मला कितींदां तरी जावें-यावें लागणार. माझ्या जीविताला कांहीं येथें धोका नाहीं. मला मुकाट्यानें जाऊं-येऊं दे."

याच अधिवेशनांत वडील नि जवाहर यांचे मतभेद पराकोटीला गेले. त्यांच्या विचारांतील फरक स्पष्टपणें पुढें आला. ते पूर्वीं पुष्कळदा चर्चा करीत, मतभेद होत.

परंतु इतक्या थराला गोष्टी कधीं गेल्या नव्हत्या. सर्वपक्ष-परिषदेचा संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाला पाठिंबा मिळणें शक्य नव्हते. तेव्हां वसाहतीच्या स्वराज्याच्या मागणीला तरी त्यांचा पाठिंबा मिळावा म्हणून वडील खटपट करीत होते. सर्वपक्ष-परिषदेची संमति मिळवायला वडील उत्सुक असले, तरी जवाहरला ही तडजोड मान्य नव्हती. पिता-पुत्रांचा हा मानसिक झगडा चालू होता. घरचें नि बाहेरचें वातावरण गरम झालें होते. गोष्टी निकरावर आल्या होत्या. खुल्या अधिवेशनांत वसाहतीच्या स्वराज्याचा ठराव मजूर झाला. परतु जवाहरनें विरोध केला होता.

पुढील वर्षभर देशाच्या सर्वच भागांत कार्याला बरीच चालना मिळाली होती. सर्वत्र नवें वातावरण येत होते. लोक राजकीय दृष्टया अधिकाधिक जागृत होत चालले होते. एका नव्या धैर्यानें, नव्या निश्चयानें जनता पुढें जात आहे, असे वाटत होते. कोठेहि बघा, कांहीं तरी चळवळ दिसे. आणि ही चळवळ हळूहळू प्राणमय, चैतन्यमय होत चालली होती. तिच्यांत जीव येत होता. जोम येत होता. कांहीं तरी महान् लौकरच होणार, असे वाटत होते. नवयुगाचीं पावले कानांवर येत होतीं. पृथ्वीवरील कोणत्याहि शक्तीला जिचीं पावले रोखतां येणार नाहींत, अशी एक नवीन शक्ति जन्म घेत होती. संयुक्त प्रांतांतील शेतकऱ्यांना ही गोष्ट विशेषें करून दिसत होती. बऱ्याच दिवसांपासून तेथें अशान्ति होती, प्रक्षोभ होता. देशांतील युवकशक्तिहि संघटित होत होती. ठयीं ठयीं युवकसघ स्थापन झाले. ही युवक चळवळ झपाट्यानें पसरली. त्यांच्या सभा-परिषदा होऊं लागल्या. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं कार्य करण्याच्या शपथा ते घेऊं लागले. युवकपरिषदाच्या वतीनें तरुणतरुणी खेड्यापाड्यांत जाऊन प्रचार करूं लागल्या. ठराविक काळांत ही स्वयसेवक मंडळी खेड्यांत प्रत्यक्ष राहत, काम करीत. अलाहाबादच्या युवक समितीची मी चिटणीस होतें. एक तरुण बंगाली विद्यार्थीहि सहचिटणीस होता. जवाहर आमचा अध्यक्ष होता. तो बंगाली विद्यार्थी निर्भय होता. त्याच्यांत तेज होते, स्फूर्ति होती. हृदयांत देशभक्तीची ज्वाला होती. परंतु दोन वर्षांनंतर त्यानें कॉंग्रेसनिष्ठेचा त्याग केला. त्याचीं मतें बदललीं. त्यानें आपलें कार्यक्षेत्रहि बदलले. पुढें तो गेला कोठे, त्याचा पत्ताहि लागला नाहीं. माझ्याबरोबर त्यावेळेस जे तरुण काम करीत होते, ते आज निरनिराळ्या पक्षांत गेले आहेत. कांहीं कम्युनिस्ट झाले आहेत. त्यांची कधीं भेट झालीच, तर आपण अपरिचितांना भेटत आहो असें वाटतें. पुष्कळ दिवस ज्यांच्याबरोबर एकत्र काम केलें, ज्यांच्याबरोबर आपण लाठ्या खाल्ल्या, इतर अनेक आपत्ति भोगल्या तेच हे, असे नाहीं वाटत.

आणि १९२९ मधील ती लाहोरची राष्ट्रीय सभा ! जवाहर अध्यक्ष होता. राष्ट्रीय सभेच्या इतिहासांत ती अपूर्व गोष्ट होती. पिता अध्यक्षपद सोडून तें पुत्राच्या स्वाधीन करीत आहे असें दृश्य हिंदी राष्ट्रीय सभेच्या इतिहासांतच अपूर्व होतें असें नाहीं, तर

जगांतील इतर देशांतील राष्ट्रीय सभेसारख्या संस्थांच्या इतिहासांतहि अशी गोष्ट कधीं घडली नसेल. वडिलांना तर त्यावेळेस कृतार्थ वाटलें असेल! केवढा धन्यतेचा क्षण! वडिलांनीं मोठ्या अभिमानानें नि आनंदानें जवाहरच्या हातीं सूत्रें दिलीं. जवाहर त्यांच्या घरच्या इस्टेटीचाच वारसदार होता असें नव्हे, तर त्यांच्या राजकीय गादीचाहि वारसदार होता. राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद मिळणें याहून परमोच्च मान या देशांत दुसरा कोणता आहे? तें पद वडिलांना मिळालें होतें. त्यांनीं तें पुत्राच्या स्वाधीन केलें.

लाहोरची राष्ट्रीय सभा अनेक दृष्टींनीं अपूर्व झाली. ते ऐतिहासिक अधिवेशन होतें. डिसेंबर महिन्यांतील तो प्रातःकाल होता. कडाक्याची थंडी पडली होती. परंतु थंडीला न जमानतां हजारों लोक रात्री नदीच्या तीरावर जमले नि संपूर्ण स्वातंत्र्याची शपथ घेते झाले. त्या ठरावानें आपल्या देशाच्या इतिहासांत नूतन मंगल प्रभात उगवली. स्त्रिया, पुरुष, मुलें थंडी होती तरी हजारोंनीं आलीं. तेथे निर्मळ अशा निळ्या आकाशाच्या खालीं हजारों माणसें उभीं राहिलीं. गंभीरपणें, गंभीर भावनेनें स्वातत्र्याच्या प्रतिज्ञेचा त्यांनीं उच्चार केला. जवाहर प्रतिज्ञा वाचीत होता, ते हजारों श्रोते मागून उच्चार करीत होते.

अशा रीतीनें हिंदुस्थाननें स्वातत्र्याची घोषणा केली. नवभारतानें स्वातंत्र्याची दीक्षा घेतली. १९२९ च्या त्या हिंवाळ्यानंतर कांहीं थोडे पुत्र जरी सोडून गेले असले, तरी हजारोंनीं, लाखोंनीं आपला शब्द पाळला आहे. आणि ज्या स्वराज्याशिवाय हिंदुस्थानला सुख शांति लाभणार नाहींत, त्या स्वराज्यासाठीं ते अविरतपणे झडगत आहेत, अग्निदिव्यांतून जात आहेत.

अधिवेशन संपतांच आम्ही अलाहाबादला आलों. भविष्यांत निराळेंच ताट वाढून ठेवलेलें होतें. पुढें अंधार दिसत होता. झगडा, लढा, कष्ट, हाल, अपेष्टा या गोष्टी समोर दिसत होत्या. परंतु पुढें कठिण दिवस येणार होते, कसोटीचा समय येणार होता; म्हणून कांहीं वाईट नव्हतें वाटत. उलट उत्साहाला भरते येत होतें. भविष्यकाळाच्या पोटांत कांहींहि असो, त्याला न डगमगतां तोंड देण्याला सारे सिद्ध होते.

लाहोरचे ते अधिवेशन भरण्यापूर्वींच वडिलांनीं आपल्या जुन्या राहत्या घराची राष्ट्राला देणगी दिली होती. किती तरी दिवसांपासून त्यांच्या मनांत तो विचार होता. आणि त्याप्रमाणें एकदां केल्यावर त्यांना किती आनद वाटला! जवाहर नि त्याचें कुटुंब यासाठीं म्हणून जें दुसरें नवीन घर वडिलांनीं मुद्दाम बांधलें होतें, त्या घरांत आतां आम्ही सारीं राहायला आलों. हें घरहि सुदर होतें. वडिलांना या नवीन घराचाहि अभिमान वाटत असे. युरोपांत असतांना वडिलांबरोबर मी अनेक दुकानांत जात असें. या नव्या घरासाठीं नाना प्रकारचीं विद्युत्साधनें आणि इतरहि गोष्टी त्या वेळीं आम्हीं खरेदी केल्या होत्या. बाजारांत जाणें, निरनिराळ्या सुंदर वस्तु, नवीन नवीन प्रकार

विकत घेणें याचा वडिलांना फार नाद. ते अशा गोष्टींत फार रस घेत, रमून जात. त्यांचा तो आनंद पाहणें म्हणजेसुद्धां एक परम मधुर अनुभव घेण्याप्रमाणें होतें.

या नवीन घरालाहि आनंद-भवन हेंच नांव देण्यांत आलें. आनंद-भवनांतच वडील राहणार. आनंदभवनाशिवाय अन्यत्र राहण्याची कल्पना त्यांना सहनच झाली नसती. आणि जे आनद-भवन राष्ट्राला देण्यांत आलें होतें, त्याचें नांव स्वराज्यभवन असें ठेवण्यांत आलें. पुष्कळ वेळां स्वराज्यभवनाला सरकारी कुलुपच लागतें. परंतु जेव्हां तें मोकळे असतें, तेव्हां कांहीं भागांत कॉंग्रेसचें हॉस्पिटल असते; आणि कांहीं भागांत अखिल भारतीय कॉंग्रेस समितीच्या कचेऱ्या असतात.

१९३० च्या मार्चची १२ वी तारीख उजाडली. आपल्याबरोबर निवडक सत्याग्रही घेऊन मिठाचा कायदा मोडण्यासाठीं महात्माजी त्या दिवशीं बाहेर पडले. ती जग-विख्यात दांडी यात्रा सुरू झाली. उंचबळणारा मानव सागर महात्माजींच्या पाठोपाठ हेलावत येत होता. साऱ्या भारताचे डोळे त्या लहानशा वामन मूर्तीकडे होते. जो न्याय आजपर्यंत मिळत नव्हता, जें स्वातत्र्य आमच्यापासून दूर ठेवण्यांत आलें होतें, तो न्याय नि तें स्वातंत्र्य जनतेला मिळवून देण्यासाठीं एक नवीनच अहिंसक असा अभिनव स्वातन्त्र्यसग्राम हा लहान माणूस सुरू करणार होता. मिठाचे कायदे तोडण्यासाठीं शहरें सरसावलीं, खेडीं खडीं झालीं. मिठाचा सारा मक्ता सरकारकडे. तो घोर अन्याय होता. त्याच्याविरुद्ध, तो दुष्ट मिठाचा कायदा मोडण्यासाठीं राष्ट्र उभें राहिलें. अलाहा-बादमध्ये प्रचड मिरवणूक निघाली. आणि एक विराट सभा भरली. त्या सभेत प्रथम जवाहरनें बेकायदा मीठ तयार केलें.

वाटत होते, कीं गांधीजींना दांडीला अटक होईल. परंतु तसें कांहीं एक झालें नाही. दुसऱ्या एका गांवीं त्यांना जाऊ दिलें. आणि तेथें मध्यरात्रीं त्यांना कैद करण्यांत आले. सर्वसत्ताधीश अशा सरकारलाहि रात्रीच्या वेळेस चोर येतो त्याप्रमाणें करायला लागावें हे आश्चर्य नव्हे का ? जनतेच्या सुप्त भावना खवळतील अशी का सरकारला भीति वाटते ? परतु जनतेला तर सहज चिरडून टाकूं असे सरकार मानीत असतें. मग हे चोरासारखे मार्ग कां ?

लौकरच जवाहर पकडला गेला. आणि सारें रानच उठलें. प्रत्येक शहर पेटलें. प्रत्येक खेडेगांव उठलें. अनत्याचारी परतु वज्रसमान निश्चयी अशा लोकांवर सरकारनें जुलमाचा हल फिरविला. सर्वत्र धरपकडीचे सत्र सुरू होतें. लाठीमार होत होते. गोळीबार ऐकूं येत होते. सर्वत्र सोटेशाही अमल सुरू होता. जनतेनें निर्धारानें नि शौर्यानें त्या रानटी हल्ल्यांना तोंड दिलें. स्वतःची प्रतिष्ठा नि स्वाभिमान रक्षण्यासाठीं, आपल्या मूल्यवान नैसर्गिक हक्कांच्या रक्षणासाठीं जनता निकरानें, निर्भयपणें उभी

राहिली. मॉटेसरी शाळेतील जागेचा राजिनामा देऊन मी एक स्वयंसेविका झाले. परकी कापडाच्या दुकानावर मी निरोधन करूं लागलें. मी कवायती घेत असें. मिरवणुका आंखित असे. कॉंग्रेस अधिकारी जे जे सांगतील तें करीत असें. सारा दिवस या अशा कामांत पटकन निघून जाई. कमला, माझी बहीण, मी दिवसभर भर उन्हांतून जात असूं. परंतु वडिलांना ते पसंत नव्हतें. परंतु त्यांनीं विरोध केला नाहीं; हातीं घेतलेले काम आम्हीं सोडावें म्हणून त्यांनीं सक्तीहि केली नाहीं. त्यांची प्रकृति बरी नव्हती. आपलीं मुलें जवळ असावीं असें त्यांना वाटत होतें. जवाहर तुरुंगांत होता. आम्हीं कोणीं मुद्दाम तुरुगांत जाऊं नये असें वडिलांना वाटे. ते स्वतः आजारी होते. तरी काम करीतच होते. चळवळीला ते मार्गदर्शन करीत होते. सकाळपासून रात्रीपर्यंत ते सारखें काम करीत. विश्रांति म्हणून नसे. कामाचा हा ताण त्यांना सहन होत नव्हता. डॉक्टरांनीं विश्रांतीचा सल्ला दिला. परतु डॉक्टर काय सांगणार हें जणूं सरकारनें आधींच ओळखलें. १९३० च्या ३० जूनला सरकारनें वडिलांना अटक केली. अशा रीतीनें एखाद्या थंड हवेच्या ठिकाणीं जायच्या ऐवजीं गगा ओलांडून पलीकडच्या नैनी तुरुगांत त्यांनीं प्रवेश केला.

तुरुंगांत वडील दहा आठवडेच होते. तेथें त्यांची प्रकृति हळूहळू अधिकच बिघडली. ते आतां पूर्वीचे राहिले नव्हते. पूर्वीच्या आकृतीची जणू आतां छाया मात्र उरली. इथवर पाळी आली, तेव्हां सरकारला वाटलें, कीं यांना आतां सोडले तर ते योग्य होईल. वडील बाहेर येतांच आम्ही सारीं मसुरीला गेलों. पर्वतावरील थंड हवेनें आणि घरांतील सुखोपचारांनीं वडिलांना बरें वाटूं लागलें. त्यांच्या गळून गेलेल्या कृश शरीरांत थोडी शक्ति आली. दरम्यान जवाहरचीहि सुटका झाली होती. तो अलाहाबादलाच राही. मधूनमधून येऊन भेटे. त्यामुळे वडिलांना बरे वाटे. हुशारी वाटे. जवाहरची भेट म्हणजे अमृतरसायन असे.

परंतु जवाहर बरेच दिवस बाहेर राहणे शक्य नव्हते. लौकरच त्याला पुन्हां पकडणार अशा अफवा उठल्या. यामुळें वडिलांनीं अलाहाबादला जायचें निश्चित केलें. डॉक्टर नको म्हणत होते. ऑक्टोबर १८ ला आम्हीं मसूरी सोडली. अलाहाबादला आलों. स्टेशनवर जवाहर नि कमला आम्हांला घ्यायला आलीं होतीं. गाडीला उशीर झाला होता. तिकडे जाहीर सभा होती. जवाहरला हजर राहणें प्राप्त. त्याला फार वेळ आमच्याजवळ राहतां आले नाहीं. तो गेला. आजूबाजूच्या खेड्यांतून हजारों शेतकरी सभेला आले होते. सभा सपल्यावर मोटारींतून जवाहर नि कमला घरीं परत येत होतीं. पोलिसांनीं मोटर अडविली. घर जवळच होते. दिसत होते. परतु आजारी पित्याचा निरोप घ्यायला परवानगी मिळाली नाहीं. रस्त्यांत तेथेच अटक करून जवाहरला नेण्यांत

आलें. पुन्हां नैनी तुरुंगांत त्याची रवानगी करण्यांत आली. घरीं पिता पुत्राची वाट पाहत होता, सभा सपून आतां येईल, असें म्हणत होता.

जवाहरला अटक होणार याची कल्पना होतीच, तरीहि वडिलांना त्याचा मोठाच धक्का बसला. कांहीं राजकीय नि कांहीं घरगुती बाबतींत जवाहरजवळ त्यांना बोलायचें होतें. त्यासाठीं थोडा तरी वेळ मिळेल अशी त्यांना आशा वाटत होती. परंतु ते व्हायचे नव्हते. थोडा वेळ वडील दुःखानें खालीं मान घालून बसले. परंतु दुबळेपणाला अधिक वेळ जागा देणारे ते नव्हते. ते सिंहाच्या छातीचे होते. त्यांनीं आपले ते वृद्ध मस्तक उच केलें, नि निश्चित स्वरांत म्हटलें, " मीहि माझें काम सुरू करणार, यापुढें मला आजारी समजून डॉक्टरांनीं उपचार करण्याच्या भानगडींत पडूं नये. मी त्यांना तसें करूं देणार नाहीं." भयंकर रोगानें त्यांना घेरलें होतें. परंतु केवळ इच्छाशक्तीच्या जोरावर त्या प्रबळ रोगाला ते दडपूं पाहत होते. रोगाशीं चाललेली ती त्यांची झुज पाहून परम आश्चर्य वाटे. परंतु किती दिवस त्या रोगाशीं ते लढणार? परंतु वडील अडग राहिले. नवीन उत्साहानें ते काम करूं लागले. सविनय कायदेभंगाच्या चळवळींत त्यांनीं पुन्हां प्राण ओतला. अधिकच जोरानें चळवळ पेटली, भडकली. हळूहळू त्यांची प्रकृति अधिकाधिक क्षीण होत चालली; अधिकच बिघडत चालली. त्यांनीं थोडी विश्रांति घ्यावी, समुद्रकांठीं कोठें जाऊन राहावें म्हणून जवाहरनें त्यांचे मन वळवण्याची पराकाष्ठा केली. वडिलांनीं कबूल केलें. मीं त्यांच्याबरोबर जायचे असें ठरलें. आम्हीं कलकत्त्याला आलों. आणि तेथून लहानशी सागर-सफर आम्ही करणार होतों. परंतु वडिलांना अधिकच अशक्त वाटूं लागलें. सफरीचा बेत रद्द करावा लागला. कलकत्त्याच्या उपनगरांत कांहीं आठवडे वडिलांबरोबर मी राहिले. ते आठवडे आणीबाणीचे होते. हृदयाचें पाणी पाणी करणारे होते. आपण बरे होणार नाहीं याची वडिलांना कल्पना आली असावी, असें वाटले. आणि करायचें तरी काय? उपाय नव्हता. वडील दुःखी, निराश नव्हते. आतां थोडया दिवसांचेच आपण सोबती आहोंत याची स्पष्ट कल्पना असूनहि ते आपल्या आजाराची टिंगल करीत. त्यांचें धैर्य अनंत होतें, नि अतकाळपर्यंत ते तसे राहिले.

एके दिवशीं कमलासहि अटक झाल्याची बातमी आली. कमलाहि बरी नव्हती. तिच्या अटकेची वार्ता ऐकून वडील अधिकच दुःखी झाले. एकदम अलाहाबादला जायचें त्यांच्या मनांत आले परतु डॉक्टर म्हणाले, "घाई नका करूं. थोडे दिवस येथेंच थांबा." ते कबूल झाले. परंतु मला त्यांनीं तात्काळ अलाहाबादला पुढे पाठविलें. थोड्या दिवसांनीं तेहि इतर सर्व मंडळींसह आले. कलकत्त्याहून मी आल्यावर लौकरच एक गंमतीची गोष्ट घडली. बहुतेक दररोज माझ्या मित्रांना, सहकाऱ्यांना अटक होत होती, त्यांचे खटले तुरुंगांतच चालविण्यांत येत. खटल्यांच्या वेळेस ज्यांना हजर राहायचें असे,

त्यांना कलेक्टरची परवानगी घ्यावी लागे. कलेक्टर फार त्रासदायक होता हम करे सो कायदा असें म्हणणारा होता. त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं युवक संघांतील तरुणांच्या एका तुकडीचा खटला चालणार होता. तुकडींतील सर्वांचा एकदम खटला! त्या खटल्याला मी हजर राहू इच्छित होते. मी कलेक्टरकडे गेले. मला पाहतांच तो जणुं लाल झाला. "काय, पुन्हां कशाला आलांत? तुम्ही आपल्या कामाकडेच सारें लक्ष कां देत नाहीं, आणि मलाहि माझें काम कां करूं देत नाहीं?" मी शांतपणें उत्तर दिले, "युवक-संघांतील कांहींचा आज खटला चालायचा आहे. युवकसंघाची मी चिटणीस आहे. त्यामुळें खटल्याच्या वेळेस हजर राहणें हें माझें काम आहे." प्रथम तो मला परवानगी देईना. "मी सारा दिवस येथें बसून राहीन. परवानगी घेतल्याशिवाय मी जाणार नाहीं." असें त्याला मीं निक्षून सांगितले. शेवटीं त्रस्त होऊन त्यानें परवानगीचें चिटोरें दिलें. आणि म्हणाला, "कृपा करून, माझ्या आई, आतां पुन्हां येऊ नका; तुम्ही का मला वेड लावणार?"

मी खटल्यासाठीं गेले. कलेक्टरसाहेब कांहीं चावटपणा करतील अशी मला कल्पनाहि शिवली नव्हती परंतु अत्यंत क्षुद्र असा खोडसाळपणा त्यानें केला. मीं माझ्या मित्रांचा निरोप घेतला. मी बाहेर जाण्याच्या बेतांत होतें. बरोबर माझी एक चुलत बहीण होती. इतक्यांत आम्हां दोघींवर पकड वॉरंट बजावण्यांत आलें. एका आठवड्यापूर्वी एका बेकायदा सभेंत भाग घेतल्याच्या आरोपाखालीं ती अटक करण्यांत आली होती. आम्ही चकितच झालों. परंतु करणार काय? माझी चुलत बहीण श्यामकुमारी राजकारणांत प्रत्यक्ष भागहि घेत नसे. ती वकील होती. धंद्याच्या दृष्टीनें त्या खटल्याला ती हजर राहिली होती. परंतु तिचें आडनांव नेहरू होतें आणि कैद करायला तेवढा पुरावा बस्स होता. आम्हांला एक महिन्याची सजा किंवा १०० रुपये दंड अशी शिक्षा देण्यांत आली.

मला एका गोष्टीसाठीं वाईट वाटत होते. वडील अत्यवस्थ होते. "तूं तरी या वेळेस जेलमध्यें जाणार नाहींस" अशी आशा ते पुन्हां पुन्हां कितीदां तरी बोलून दाखवीत. वडिलांच्या इच्छेविरुद्ध मी मुद्दाम पुन्हां तुरुंगांत गेले असें त्यांना वाटूं नये, एवढीच माझी इच्छा होती. परंतु हें सारें मी त्यांना कसें सांगणार? थंडीचे दिवस होते. तुरुंगांतील आमची खोली थंडगार होती. तेथें घाण होती. किडे सर्वत्र वळवळत होते. श्यामाकुमारी नि मी एकमेकींची थोडा वेळ करमणुक करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो कृत्रिम प्रयत्न होता. लौकरच आम्हीं तो नाद सोडला. दोघीजणी मुकाट्यानें बसून राहिलों. मी अत्यन्त अस्वस्थ होते. वडिलांचा विचार मनांत येऊन वाईट वाटत होते. ते माझी परिस्थिति नीट समजतील अशी आशा मी करीत होते. शेवटीं मला झोंप लागली. आणि बऱ्याच वेळानें जागी झालें तों कानांवर नाना बोलणीं, कडी काढण्याचे आवाज, दारें

उघडण्याचे आवाज आले. बोलणीं जवळ जवळ ऐकूं येऊ लागलीं. उजेडहि आला. कोणी तरी आमच्याकडे येत होते. आमच्या खोलीचा दरवाजा उघडण्यांत आला. आमच्यावर देखरेख करणारी बाई, जेलर, दोन वॉर्डर आंत आले. ती बाई म्हणाली, " तुमचा दंड भरण्यांत आल्यामुळें तुम्हांला सोडून देण्यांत येत आहे. " माझा विश्वासच बसेना. कांहीं झाले तरी वडील दंड भरणार नाहींत अशी माझी खात्री होती. कांहीं असो. आमची सुटका झाली होती. आणि आम्हीं आमचे बिस्तरे गुंडाळले नि बाहेर आलों. तेथें कचेरींत एक वकील मित्र आढळले. आम्हांला नेण्यासाठीं ते आले होते. " आमचा दंड कोणीं भरला ?" आम्हीं त्यांना विचारले. ते म्हणाले, " ते मी नाहीं सांगूं शकत. " वडिलांनीं दंड भरला नव्हता. त्या चुलतबहिणीच्या वडिलांनींहि भरला नव्हता. मग कोणीं भरला ? ती व्यक्ति अज्ञात राहूं इच्छित होती. आम्हांला मुक्त करण्यांत आलें, तेव्हां मध्यरात्र होऊन गेली होती. तुरुंगांत जवळ जवळ बारा तास आम्हीं काढले.

मी घरीं आलें तों सारें सामसूम होतें. दिवाहि नव्हता. कारण मी सुटून येईन अशी कोणालाच कल्पना नव्हती. माझ्या सुटकेची बातमीहि त्यांना कळली नव्हती. फक्त आई जागी होती. ती रामायण वाचीत होती. उजाडलें नाहीं तोंच वडिलांच्या खोलींत मी गेले. मला पुन्हां पाहतांच आईच्यापेक्षांहि त्यांना अधिक आश्चर्य वाटलें. मला पाहून त्यांना बरें वाटले. परंतु दंड भरण्यांत आला म्हणून ते चिडले. मला अटक झाल्यावर वडिलांनीं एक पत्रक काढले होते. सकाळच्या वर्तमान-पत्रांत मला तें वाचायला मिळालें. तुम्हीं दंड भरत नसाल तर आम्हांला भरूं दे असे किती तरी स्नेही आदल्या दिवशीं त्यांना परोपरीनें विनवून म्हणाले. दंड भरण्याची कल्पनाहि त्यांना सहन होत नसे. ते खूप संतापले नि म्हणाले, " तुम्हीं कोणीं दंड भरलात तर मला फार दुःख होईल. हा तत्त्वाचा प्रश्न आहे. दंड भरायचा नाहीं असें आमचे तत्त्व आहे. तुम्हीं कोणी या तत्त्वाविरुद्ध वागून दंड भरलात तर ते मला मुळींच आवडणार नाहीं. आपल्या मैत्रीला न शोभेसे ते कर्म होईल. " वडिलांनीं असें निक्षून सांगितले होतें, तरीहि कोणीं तरी दंड भरला. वडिलांची प्रकृति चिंताजनक होती. यासाठीं कोणीं दोष दिला तरी तो स्वीकारायची तयारी ठेवून त्या अज्ञात मित्रानें सद्भावानें दंड भरला. किती तरी वर्षांनीं नंतर या मित्राचा आम्हांला शोध लागला. तुरुंगांतून बाहेर आल्यावर लौकरच युवक संघाच्या वतीनें जवळच्या खेड्यापाड्यांतून मीं दौरा काढला. दौऱ्यावरून परत आल्यावर वडिलांना पाठवलेल्या पत्रांत जवाहरनें माझ्यासाठींहि एक खास चिठी लिहिली होती, ती मला देण्यांत आली. काय होतें त्या चिठ्ठींत ?

" तुला मानपत्रे मिळत आहेत, करंडक मिळत आहेत, असें समजतें. असे कोणते पराक्रम तूं केलेस, कीं ज्यासाठीं हे समारंभ केले जात आहेत ? तुरुंगांत दहाबारा तास काढणें, त्याचें का कोणी महाकाव्य करावें ? कांहीं असो. परंतु या मानसन्मानांनीं

फुशारून जाऊ नकोस. नाहीं तर जाशील गर्वानें फुगून ! डोकें बेताल होऊं देऊं नकोस. बाकी मुळींच डोकें नसण्यापेक्षां बेताल डोकें असणेंहि बरें. ''

आपण आतां बरे आहोंत असें वडिलांना वाटत होतें. परंतु वास्तविक त्यांची प्रकृति अधिकाधिक खालावतच जात होती. वडील म्हणजे आरोग्य नि सामर्थ्य यांची प्रत्यक्ष मूर्ति असें आम्ही सदैव समजत आलों होतों. परंतु आजची त्यांची दशा पाहून असह्य दुःख होई. ते जरा वांकले होते. फारच अशक्त नि आजारी दिसत. तोंडावर थोडी सूज आली होती. शेवटीं ते आंथरुणालाच खिळले. तरीहि मरण अगदीं जवळ आलें आहे अशी कल्पना मला होईना. मनांत आपलें वाटे, कीं मृत्यु इतक्यांत त्यांना आमच्यामधून नेणार नाहीं. विरुद्ध बाजूला केवढीहि शक्ति असली, तरी तिच्याशीं लढून ते नेहमीं जयी व्हायचे. या वेळेस प्रत्यक्ष मृत्यूशींच झगडायचें होतें. तरीहि ते जिंकतील असें वाटे. परंतु तसें नव्हतें व्हायचें.

" महापुरुष हे उंच पर्वतशिखरांप्रमाणें असतात. वारे त्यांच्यावर प्रहार करितात; मेघ त्यांना झांकोळतात; परंतु तेथेंच अधिक मोकळेपणानें व जोरदार जोरदार रीतीनें आपण श्वासोच्छ्वास करतों. "

—रोमा रोलां

वडील फारच अत्यवस्थ होते, म्हणून जवाहर नि मेहुणे रणजित यांची १९३१ जानेवारी २६ या स्वातंत्र्यदिनाच्या दिवशीं मुक्तता करण्यांत आली. सुटका बिनशर्त होती. १२ वर्षे त्या गोष्टीला झालीं. तरीहि त्या दिवसाची आठवण अगदीं ताजी जणूं आहे. मनाच्या डोळ्यांसमोर तें सारें चित्र आहे. ती आठवण ताजी असली, तरी दु:खमय आहे. जवाहर आनंदभवनांत आला आणि सरळ वडिलांच्या खोलींत गेला. उबरठ्यांतच चरकून क्षणभर उभा राहिला. वडिलांच्या चेहऱ्यांत बराच फरक पडला होता. तोंड सुजलें होतें. ते सारें पाहून जवाहरला तीव्र धक्का बसला. क्षणभर घुटमळला. नि लगेच वडिलांना मिठी मारण्यासाठीं पुढें झेपावला. पितापुत्रांनीं एकमेकांना घट्ट धरून ठेवलें. कोणीहि बोलूं शकत नव्हता. वडिलांच्या क्षेमालिंगनांतून जवाहर मोकळा झाला. त्यांच्या बिछान्यावर तो बसला. अश्रु दाबण्याचा उगीच खटाटोप तो करीत होता. ते आलेच. जवाहरला पाहतांच, त्याला भेटतांच वडिलांच्या डोळ्यांत जें तेज चमकलें, त्यांच्या चेहऱ्यावर जी आनंदी वृत्ति फुलली, तें मी कधीं विसरेन असें मला

वाटत नाहीं. आणि ज्या पित्यावर जवाहरचें अपार प्रेम होते, जो केवळ पिताच नव्हता तर आम्हां सर्वांचा जो उत्कृष्ट मित्र होता, त्या पित्याच्या रुग्णशय्येजवळ जातांना जवाहरच्या डोळ्यांत जी करुणवेदना होती, तीहि मी कधीं विसरणे शक्य नाहीं.

वडिलांच्या आजारीपणाचे ते महिने आम्हां सर्वांनाच दुःखाचे नि चिंतेचे असे गेले. परंतु दुःखाचा असा माझा तो पहिलाच अनुभव. दररोज वडिलांची प्रकृति अधिक होत होती; परंतु मृत्यु इतका जवळ आला आहे यावर माझा विश्वासच बसेना. आतां-पर्यंत आमच्या लहान कुटुंबापासून मृत्यु दूर होता. आणि मला तर त्याचा मुळींच अनुभव नव्हता.

ज्या दिवशीं जवाहर सुटला, त्याच दिवशीं दुसरेहि पुष्कळ कॉंग्रेस कार्यकर्ते सुटले. या सुटणाऱ्यांत गांधीजी पहिले होते. वडील अत्यवस्थ आहेत असे कळतांच ते येरवड्याहून सुटले ते सरळ पुण्याहून अलहाबादला आले गांधीजींना पाहून वडिलांना फार समाधान वाटलें. थोडी शांति मिळाली असे दिसलें. दुसरेहि सुटलेले पुष्कळ मित्र आनंदभवनांत आले. वडिलांना पाहायला, कदाचित् शेवटचाच भक्तिप्रणाम करायला ते आले होते. घर पाहुण्यांनीं भरलें होते. तरीहि सर्वत्र एक प्रकारची उदासीन शान्ति होती. जेथें सदैव हास्यलहरी उसळायच्या, जेथे सदैव सुख दिसायचे, तेथे आज उद्विग्न अशी स्तब्धता होती. शांतपणे, निःस्तब्धपणे कोणी घरांत येरझारा करीत होते; कोणी काम करीत होते; कोणी हेतुहीन हिंडत होते सारे वातावरण जसे भारलेलें होते, दुःखमय होते.

आम्हीं सारींच वडिलांच्या बिछान्याभोंवतीं सारा वेळ घुटमळत होतों. आई, जवाहर, कमला, स्वरूप सारीं तेथे होतो. रात्रीच्या वेळी पाळीपाळीने आम्ही तेथें झोंपत असूं. एखादे वेळेस हांक मारायचे, कांहीं लागायचे, म्हणून कोणी तरी तेथें असेच. पुष्कळदां मी त्यांच्याजवळ असले म्हणजे ते पाणी मागायचे. परंतु म्हणायचे "तुला त्रास द्यायची इच्छा नाहीं, बाळ. परंतु तहान लागली आहे. काय करूं!" अशा क्षमायाचक शब्दांत पाणी मागायचे. ते शब्द ऐकून माझें हृदय जणू फाटे. आणि एका अर्थी मला माझा फार तिरस्कार वाटे. "वडील किती विवेकी; मृत्यु जवळ आला असतांहि ते स्वतःचा विचार नाहीं करीत, तर दुसऱ्याच्या सुखाचा." आणि मी? असे मनांत येई. त्यांची शक्ति उत्तरोत्तर क्षीण होत होती. सचिंत दृष्टीने आम्हीं पाहत होतों कांहीं उपाय नव्हता. शेवटपर्यंत त्यांची विनोदी वृत्ति कायम होती. पुष्कळ वेळां गांधीजींबरोबर ते थट्टाविनोद करीत. कधीं आईजवळ हसून म्हणायचे "मी जातों पुढें, तेथे तुझी वाट पाहत बसेन." अपरिहार्य असा मृत्यु समीप आला आहे हे त्यांना पक्के कळले होते. परंतु भीतीचा स्पर्शहि त्यांना नव्हता. दोन हात केल्याशिवाय, झगडल्याशिवाय मृत्यूपुढेंहि नमायला ते तयार नव्हते.

आपल्या क्षीण होणाऱ्या शक्तीनें किती तरी दिवसरात्र ते मृत्यूशीं सामना देत होते. थोडीं अधिक वर्षे जगण्यासाठीं त्यांची धडपड होती. कां बरें आणखी थोडें जगावें असें त्यांना वाटत होतें? ऐहिक सुखासाठीं का? नव्हे. तर ज्या कार्याला त्यांनीं तनमनधनें करून वाहून घेतलें होतें, त्या कार्याचे थोडेफार तरी सुपरिणाम पाहायला मिळावेत, असें त्यांना वाटत होतें. परंतु त्यांच्या त्या अलोट धैर्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं मृत्युच विजयी झाला.

एके दिवशीं बापूंजवळ बोलतांना वडील म्हणाले, "काँग्रेसच्या कार्यकारिणी समितीचे बहुतेक सारे सभासद येथें आहेत. येथें स्वराज्यभवनांत बैठक बोलवा ना." त्यांचे शेवटचे शब्द पुढीलप्रमाणें होते. "हिंदुस्थानचें भवितव्य या स्वराज्यभवनांत निश्चित करा; माझ्यासमक्ष तें ठरवा. माझ्या मातृभूमीच्या दैवाची ही जी शेवटची सन्मान्य तडजोड होणार आहे, तिच्यांत मलाहि भागीदार होऊं दे. मला मरायचेंच असेल, तर स्वतंत्र भारताच्या मांडीवर मरूं दे. स्वतंत्र हिंदुस्थानांत माझी शेवटची चिरनिद्रा मला घेऊं दे, परतंत्र हिंदुस्थानांत नको."

वडिलांची स्थिति फारच बिघडलेली पाहून डॉक्टर म्हणाले, "लखनौला क्ष-किरणांचे उपचार करतां येतील. तेथें नेले तर बरें." वडील जायला तयार नव्हते. त्यांची इच्छा नव्हती. डॉक्टरांपेक्षां त्यांना अधिक चांगलें कळत होतें, कीं मृत्यु अति समीप आलेला आहे. आणि आनंदभवनांतच मरायची त्यांना इच्छा होती. जें घर त्यांनीं स्वतः बांधलें होतें, ज्या घराचा त्यांना फार अभिमान वाटे, ज्या घरावर त्यांचें अपार प्रेम, त्या घरांतच देह ठेवण्याची त्यांची मनकामना होती. परंतु डॉक्टरांचा सारखा आग्रह होता. आणि गांधीजींनींहि डॉक्टरांच्या म्हणण्यास संमति दिली. प्रतिकार करायला वडिलांजवळ आज शक्ति नव्हती, शेवटीं मोटरनें त्यांना लखनौला नेण्यांत आलें. १९३१ फेब्रुवारीची चौथी तारीख होती ती. लांबचा प्रवास झाला होता. तरीहि दुसऱ्या दिवशीं ते जरा अधिक बरे वाटले. त्यांना थोडी हुशारी वाटली. परंतु संध्याकाळीं प्रकृति अधिकच बिघडली. त्यांना श्वासोच्छ्वास करतां येईना. प्राणवायु देण्यांत येत होता. अद्याप त्यांना शुद्ध होती. सभोवतीं जें काय होतें त्याची जाणीव होती. सायंकाळीं पांच वाजतां वडिलांच्या खोलींत मला बोलावण्यांत आलें. डॉ. विधानचंद्र रॉय, डॉ. अन्सारी, डॉक्टर जीवराज मेहता आणि इतरहि डॉक्टर तेथें होते. डॉ. विधानचंद्र रॉय इतरांच्या मदतीनें वडिलांची काळजी घेत होते. ते मला म्हणाले, "वडिलांच्या पाठीमागें बसून त्यांना आधार दे." मीं तसें केलें नि डॉक्टर आम्हांला सोडून गेले. मला बोलवून घेण्यासाठीं वडिलांनीं सांगितलें होतें, कीं डॉक्टरांनीं आपण होऊनच मला बोलावलें तें मला कधींहि समजलें नाहीं. थोड्या मिनिटांनीं वडील कांहीं तरी शोधीत आहेत असें वाटलें. मीं विचारलें, "काय

हवें ? " त्यांना बोलवत नव्हतें. परतु प्रयत्न करून आपल्या दुबळ्या सुजलेल्या दोन्ही हातांत त्यांनीं माझें तोंड घेतलें. आणि ओळखूं न येण्याइतक्या सुजलेल्या ओठांनीं त्यांनीं माझा मुका घेतला. माझ्या साऱ्या तोंडाचे त्यांनीं मुके घेतले. जणूं ते शेवटचा निरोप घेत होते. मीं दांत घट्ट धरले होते. पराकाष्ठेचा प्रयत्न करून मी माझे अश्रु आंवरीत होतें. ते आंतून भरभरून येत होते. परंतु हुंदका बाहेर फुटूं नये, अश्रु त्यांच्या हातावर पडूं नयेत म्हणून मी शर्थ करीत होतें; परंतु अधिक वेळ ताबा ठेवणें अशक्य आहे असें पाहून वडिलांच्या मिठींतून मोकळें होण्याचा मीं प्रयत्न केला. वडील चाणक्ष होते, भावना ओळखणारे होते. ती त्यांची शक्ति अद्यापहि होती. माझ्या मनःस्थितीची त्यांना कल्पना आली असावी. मला तशीच धरून ठेवून अस्फुट शब्दांत ते म्हणाले, " माझ्या लहान मुलीनें नेहमीं शूर असलें पाहिजे." यापुढे मला तें सहन होईना. आणि मी आंधळेपणानें खोलींतून बाहेर पळाले नि हृदय बाहेर पडेपर्यंत हुदके देऊन रडले. संध्याकाळ होत होती. इकडे प्रकृतिहि अधिक बिघडत होती. वडिलांच्या खोलींत पुन्हां जाण्याचें मला धैर्य नव्हतें. इतरांबरोबर त्यांच्या खोलीच्या बाहेर रात्रभर मी बसून होतें. दुःखानें नि श्रमानें मी गळून गेले होतें. पहांटे पहांटे मला झोंप लागली. स्वरूपचाहि डोळा लागला. कमलाहि झोपली. इतरहि नातलग जे तेथें होते, त्यांनाहि झोपेनें जवळ घेतलें. आम्हांला झोंप लागून एक तासहि झाला नसेल, तों मावशीनें येऊन आम्हांला उठविलें. आणि सांगितलें कीं वडील देवाघरीं गेले. वडिलांचे प्राण गेले, त्यावेळेस फक्त जवाहर, आई, नि डॉक्टर जवळ होते.

एकामागून एक आम्ही सारीं वडिलांच्या खोलींत गेलों. झोंपल्याप्रमाणें जणूं वडील दिसत होते. मुद्रा निर्विकार होती, शान्त होती. जिवत असतांहि ते मुखमंडळ इतकें भव्य कधीं दिसलें नाहीं. माझे प्रिय पूज्य वडील आम्हांला सोडून गेले, या गोष्टीवर माझ्या हृदयाचा विश्वास बसेना. वडिलांच्या मरणावर विश्वास ठेवायला हृदय तयार नव्हतें. जवाहर जवळ बसला होता त्याचा एक हात वडिलांच्या मस्तकावर होता. जणूं तो त्यांना थोपटीत होता. न घळघळलेले अश्रु त्याच्या डोळ्यांत उभे होते, थरथरत होते. माझे अश्रु बाहेर यायला तयार नव्हते. कारण घडलेल्या गोष्टीवर त्यांचा विश्वासच बसेना. नतर गांधीजी आले. वडिलांच्या बिछान्याजवळ ते गेले. डोळे मिटून, मान खालीं करून ते तेथें उभे होते. ते का प्रार्थना म्हणत होते ? जाणाऱ्या आत्म्याला ते का निरोप देत होते ! आम्ही सारीं सभोंवतीं उभीं होतों. नतर ते आईजवळ गेले. पहिल्या दुःखोद्गारानंतर तिनें आवाजहि काढला नव्हता. अपरंपार दुःखानें विव्हल होऊन ती एका कोपऱ्यांत बसली होती. गांधीजी तिच्याजवळ बसले. तिच्या खांद्यावर हात ठेऊन ते म्हणाले, " मोतीलालजी मेले नाहींत. ते चिरंजीव आहेत. " गांधीजींच्या त्या शब्दांनीं वस्तुस्थितीचें जणूं मला भान आलें. आणि माझे अश्रु मुक्तपणें वाहूं लागले.

वडिलांच्या मृत्यूची वार्ता हिंदुस्थानभर गेली. खुद्द लखनौंत तर वणव्याप्रमाणें बातमी पसरली. आणि लाखो लोक कालाकंकर राजवाड्यासमोर आले. या राजवाड्यांत आम्हीं राहत होतों. आपल्या पुढाऱ्याचें शेवटचें दर्शन घ्यायला जनता जमली होती.

पुष्पखचित असा तो देह तेथें होता. पहाटेपासून माणसांचा अखंड पूर सारखा येत होता. मित्र, आप्तेष्ट, सखे सोयरे, इतरहि दर्शनोत्सुक मडळी यांची रीघ लागली होती. त्या खोलींत शान्तपणे, निःस्तब्धपणे जात, शेवटचा प्रणाम करून येत. गांधीजी तेथें मुकाट्यानें बसले होते. बिछान्याजवळ ते मूक साक्षी होते. जवळच आईहि बसली होती. सुखदुःखांत, मानसन्मानांत जन्मभर ती ज्याची वांटेकरी होती, त्याच्याजवळ ती अगतिकपणे करुण करुण अशी बसली होती. हीनदीन होऊन बसली होती. जवळच थकलेला जवाहर उभा होता. एका रात्रींत एकदम तो म्हातारा झाल्याप्रमाणे दिसू लागला. पांढरा फटफटित असा त्याचा चेहरा दिसत होता. त्या महान् आपत्तींतहि त्यानें आपली मुद्रा शांतगंभीर राखली होती.

घराबाहेर गर्दी वाढतच होती. प्रत्येकाच्या तोंडावर दुःख होतें. सर्वांना वाईट वाटत होते. कोरडा डोळा क्वचितच् दिसे. सारें वातावरण गंभीर नि अत्यंत स्तब्ध होतें. जो ठेवा हरपला, त्याविषयींच्या आम्हां सर्वांच्या भावना शब्दातीत होत्या.

वडिलांचा देह मोटरींत घालून अलाहाबादला आणण्यांत आला. राष्ट्रीय ध्वजांत तो देह गुंडाळलेला होता. जवळ जवाहर होता. कमला, स्वरूप नि मी आधींच मोटरनें पुढे निघून आलो होतो. आम्ही आधी घरीं आलो. लखनौंतील त्या घराजवळ प्रचंड गर्दी जमली होती. आम्ही जसजशीं अलाहाबादच्या जवळ येऊं लागलो, तों रस्त्यांत कित्येक मैलपर्यंत हजारो लोक जमलेले दिसत होते. जसजसें घर जवळ येत चाललें, तसतसा मानवसागर अधिकच हेलावूं लागला. आनंदभवनापासून चार मैलांवर आम्ही आलो. आणि तो तुफान मानवसागर लोटला. गर्दी वाढतच होती. गर्दीतून आमची गाडी सावकाश रस्ता करीत जात होती. सहानुभूतिपर आवाज हलक्या आवाजात चारी बाजूंनी येत होते. कित्येक मैलांवरून वडिलांना शेवटचा प्रणाम करण्यासाठीं, वडिलांचें शेवटचें दर्शन घेण्यासाठीं आलेली ती असंख्य जनता पाहून आम्ही गहिंवरून गेलों. आमचा बांध फुटला. जनता-सागर पाहून हृदयांतील शोकसागरालाहि पूर लोटला. एकदांचीं आम्ही घरीं आलो. तें घर आतां पूर्वीप्रमाणें होणें कधींहि शक्य नव्हतें. त्या घरांतील प्राण कायमचा निघून गेला होता. घराभोंवतालचें विस्तृत आवार माणसांनीं गजबजून गेलें होतें. घरावर सदैव डौलानें फडकणारा तिरंगी झेंडा जरा खालीं घेण्यांत आला होता. अर्धा उंचावरून फडकत होता. शहरांतील इतर सारे झेंडेहि अर्धे फडकत होते. आणि लाखोंच्या कंठांतून एक प्रचंड हुंदका आला, एक महान् दुःखाचा सुस्कारा आला. त्या प्रचंड लोखंडी दरवाजांतून वडिलांचें शव आणणारी मोटर आंत आली. तें शेवटचेंच मोटरींतून येणें होतें.

लखनौहून सारी मंडळी झाली. शेवटच्या अंत्यविधीसाठीं सारी तयारी होती. परंतु ज्या मोटरींतून गांधीजी नि आई येत होतीं, ती मोटर कोठे आहे? ती मोटर अद्याप कां आली नाहीं? सर्वांना काळजी वाटूं लागली. काय हकीगत आहे त्याचा शोध घेण्यासाठीं आणखी मोटरी पाठविण्यांत आल्या. जवळ जवळ एक तास उशीराने ती मोटर आली. वाटेंत एक अपघात झाल्याचे कळलें. लखनौ, अलाहाबाद रस्ता फारसा चांगल्या स्थितींत नव्हता. आमचा मोटर हांकलणारा सारखा रडत होता. रस्त्याच्या मध्यभागीं असलेला एक खड्डा त्याला दिसला नाहीं. आमची मोटर ती मोठी 'डीलेज' मोटर होती. त्या खड्ड्यांत आदळतांच ती उलटली. आश्चर्य हें कीं मोटरचा दरवाजा ताडकन् उघडला आणि आई नि गांधीजी दोघें बाहेर फेकलीं गेलीं. त्यांना कांहीं लागलें नाहीं. मोटरवाल्याला थोडें लागले होते. मोटरहि सारी शाबूत होती.

आई घरीं येतांच घरचे सारे विधि उरकण्यांत आले. नंतर फुलांनीं सुंदर रीतीनें सजवलेल्या तिरडीवरून वडिलांचा तो पार्थिव देह गंगेच्या तीरावर नेण्यांत आला. ती प्रेतयात्रा अफाट होती. ती विराट् मिरवणूक होती. गंभीर नि शोकमय अशी जनतेचे वडिलांवरील ते अपार प्रेम पाहून आमच्या दुःखदग्ध हृदयाला त्यांतल्या त्यांत थोडें समाधान वाटत होतें: थोडी शान्ति मिळत होती. असंख्य लोकांचे डोळे ओले झाले होते. त्या पुरुषसिंहाच्या निधनानें प्रत्येक हृदय खरोखर रडत होतें. आणि वडिलांना उचललेले आम्हीं पाहिलें. पुन्हां ते आमच्यांत येणार नव्हते. ते पहा त्यांना नेत आहेत. आम्हीं शेवटचा प्रणाम केला. प्रेमळ पित्याला अखेरचा प्रणाम. त्या रात्रीं एकटीच बागेत मी फेऱ्या घालीत होतें. आजूबाजूच्या सृष्टींत कांहीं बदल नव्हता. रात्र प्रशान्त होती. आकाश निरभ्र होतें. तारे नेहमींप्रमाणेंच सुंदर सतेज चमचम करीत होते. परंतु माझ्या पायांजवळ सारें जग चुराडा होऊन पडलें आहे असें मला वाटत होतें.

अलाहाबादच्या इतिहासांत अशी प्रचंड नि स्मरणीय प्रेतयात्रा कधींहि निघालेली नव्हती. ते विराट् दृश्य होतें. टसा उमटवणारें महान् दृश्य. संगमावर एक लाख लोक तरी कमीत कमी जमले असावेत. नरनारींची, मुलांबाळांची सर्वांची गर्दी होती. जिकडे पाहावें तिकडे माणसेंच माणसें दिसत होतीं. सारे शिरोभूषणहीन होते, स्तब्ध होते. आसमंतातच्या खेड्यांतून हजारों शेतकरी आले होते. प्रेतयात्रेत ते मिसळले होते.

सारे विधि संपले. गांधीजी नि पंडित मदन मोहन मालवीय दोघांनीं त्या अफाट जनतेसमोर भाषणें केलीं बापू बोलायला उभे राहिले. हजारों कंठांतून विव्हळ आवाज उठला, परंतु क्षणांत सारे शान्त स्तब्ध झाले. बापू म्हणाले, " गंगा-यमुनांच्या

या तीरावर त्या वीर पुरुषाचे शेवटचे अवशेष समोर आहेत. त्या अवशेषांसमोर प्रत्येक स्त्रीने, प्रत्येक पुरुषानें शपथ घ्यावी, कीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळेपर्यंत स्वस्थ बसणार नाहीं हिंदुस्थानचें स्वातंत्र्य ही एकच गोष्ट मोतीलालजींच्या हृदयाला प्रिय होती, तोच एक त्यांना ध्यास होता. या ध्येयासाठींच त्यांनीं आपलें जीवन दिलें. " गांधीजी बराच वेळ बोलले. अति करुण अशी ती वाणी होती. सर्वांच्या डोळ्यांतून अश्रु अविरलपणें वाहत होते.

पंडित मदन मोहन मालवीय म्हणाले, " सारीं भांडणें नि मतभेद विसरा. या महान् नेत्याच्या त्यागानें एक होण्याची, हिंदुस्थानला स्वातन्त्र्य मिळवून देण्याची स्फूर्ति सर्वांना मिळो. "

दोन दिवस हिंदुस्थानभर शोकप्रदर्शन झाले. शहरांतून, खेडेगांवांतून स्वेच्छेनें हरताळ पाडण्यांत आले. शाळा, महाशाळा बंद होत्या. सारे बाजार बंद होते. साऱ्या जगांतून सहानुभूतीचे सांत्वनपर शेकडो संदेश आले.

वडिलांच्या मृत्यूनंतर दिलेल्या संदेशांत गांधीजी लिहितात, "विधवेपेक्षांहि माझी स्थिति दीन आहे. निरामय जीवनानें विधवा पतीच्या पुण्यांत वांटेकरी होऊं शकते, भाग घेऊं शकते. मला कांहींच घेतां येत नाहीं. मोतीलालजींच्या मरणाने माझी झालेली हानि कधींही भरून येणार नाहीं. "

वडील धिप्पाड दिसत. ते बरेच उंच असावेत असा भास होई. परंतु त्यांची उंची सर्वसाधारणच होती. त्यांची शरीरयष्टि बळकट होती. तोंडावर बुद्धिमत्तेचे तेज झळके. त्यांचे डोळे ठाव घेणारे अंतर्भेदी होते. त्यांचे डोकें भव्य होते. त्यांचे व्यक्तिमत्व आकर्षक होते, मुग्ध करणारे होते. मी जन्मलें तेव्हांच त्यांचे केस जरा पांढरे होऊं लागले होते. मी पंधरा वर्षांची झाले, तेव्हां तर सारेंच डोकें हिमधवल दिसूं लागलें. त्यांचे ते रुपेरी केस त्यांना फारच शोभून दिसत. दिसायला जरा ते कठोर वाटत. पुष्कळांना त्यांचा दरारा वाटे, जरा भीतिच वाटे. परंतु त्यांच्या कठोर मुद्रेखालीं प्रेमसिंधु असे हे पुष्कळांना ठाऊकहि नसेल. त्यांचें हृदय सोन्याचे होते. मऊ होते समजून घेणारे होते. आणि कसे जिंकून घ्यावे हे एकदां समजल्यावर त्यांचे हृदय सहज जिंकतां येत असे. त्यांना लहान मुलें फार आवडत. लहान मुलांनाहि ते आवडायचे. असे मूल सहसा मला दिसलें नाहीं जे त्यांना जाऊन चिकटलें नाहीं; एकदम प्रेमाने त्यांच्याजवळ गेले नाहीं. स्वतःच्या मुलांवरचें त्यांचे प्रेम शब्दातीत होते. त्याला तुलना नव्हती. परंतु इतके प्रेम असूनहि त्याचे प्रदर्शन त्यांनीं कधीं केले नाहीं. मी लहान होते, तेव्हां त्यांच्याविषयीं खूप प्रेम वाटत असूनहि भीतीनें मी दूरच राहायची. परंतु जसजशी मी वाढत गेलें आणि त्यांना अधिकाधिक ओळखूं लागलें, तसतशी त्यांच्याविषयीं वाटणारी भीति पार नाहींशी झाली. आणि कांहीं

वर्षें गेल्यावर तर आम्ही दोघें मित्र बनलों. माझे वडील हेच माझे सर्वोत्कृष्ट मित्र होते. माझ्या वडिलांचें व्यक्तिमत्त्व अत्यंत प्रभावी होतें. दुसरे त्यांच्यापुढें दिपूनच जायचे. कोठेहि गेले तरी ते उमटून पडत. एक प्रकारचें राजतेज त्यांच्या तोंडावर असे. कोणत्याहि सभापरिषदांत ते असोत. ते सर्वांहून निराळे दिसत, येथें कांहीं तरी विशेष आहे असे वाटल्यावांचून राहत नसे. आम्हाला त्यांच्या मुलांना, तसेंच त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या इतर पुष्कळांना, ते सामर्थ्याचे हिमालय वाटत. त्यामुळे आम्हीं निर्धास्त असूं. तो महान् आधार वाटे, आणि त्यांच्या त्या सामर्थ्याचा आम्हीं भरपूर फायदा घेतला, असें जरा भीत भीत म्हणावें लागतें.

कुटुंबांतील सारी मंडळी भोंवतीं आहे अशा वेळेस वडील जितके सुखी नि आनंदी असत, तसे अन्यत्र नसत. परंतु असे बसायला त्यांना फारसें मिळत नसे. येऊन जाऊन सध्याकाळीं जरा फुरसतीचा वेळ असायचा. परंतु त्यावेळेस आप्तेष्ट यायचे, मित्र यायचे. दिवसभर काम असेच. पुष्कळ वेळां किती तरी रात्र होईपर्यंत ते काम करीत असत. दिवसाच्या दमवून टाकणाऱ्या कामानतर जेव्हां रात्रीं ते जेवायला येत, त्या वेळची त्यांची मूर्ति मी कधींहि विसरणार नाहीं. ते प्रमुख ठिकाणीं जेवायला बसत. सारी प्रिय मंडळी भोंवतीं असत. पाळीपाळीनें आमच्यांतील प्रत्येकाकडे ते लक्ष द्यायचे. हसायचे, खिजवायचे, थट्टामस्करी करायचे. बाहेरच्यांना कठोर वाटणारे माझे वडील येथें अगदीं निराळे असत. आमच्या बारिकसारिक गोष्टींहि ते पाहायचे. त्यांना सर्व गोष्टींचा आनंद, सर्व गोष्टींचे कुतूहल. आम्हीं पोषाखाची निराळी ट्रम काढली, किंवा केसांची निराळी रचना केली, तरी त्यांचे लक्ष असायचें. दुसऱ्याच्या मनांत काय चाललें आहे, तें ओळखण्याची त्यांची विलक्षण शक्ति होती. ती हातोटी कांहीं और होती. आमच्यांतील एकाची ते कधीं स्तुति करीत; परतु असे क्वचितच् घडे. कारण स्तुतिस्तोत्रें गाण्याची, डोक्यावर चढवून ठेवायची त्यांना सवय नव्हती. एखादे वेळेस आईला जर त्यांनीं शाबासकी दिली, तर ती सुखानें, आनंदानें इतकी लाजे, कीं सांगून सोय नाहीं. मला आठवतात असे प्रसग. एखादे वेळेस ते जुन्या आठवणी सांगत. क्षणभर आपलीं मुलें जवळ आहेत हेंहि ते विसरत. आपल्या पत्नीबरोबरचे गत जीवन जणू ते पुन्हां अनुभवीत. ते दिवस जणूं पुन्हां जगत, अशा ह्या स्मृति अविस्मरणीय आहेत. माझ्या हृदयांत त्या सांठवलेल्या आहेत. तो अमोल ठेवा आहे. पतिपत्नी दोघे पिकलीं पानें झालीं आहेत; दोघांचे केस हिमधवल झाले आहेत; आयुष्यभर ज्यांनीं एकमेकांस सांथ दिली, परस्परांचे सांगाती राहिले, वाढत्या वयाबरोबर ज्यांचे प्रेमहि वाढलें, खोल झालें, ज्यांची समजूत घेण्याची वृत्ति अधिक वाढली, जीवनांतील सुख-दुःखांची चव ज्यांनीं बरोबर घेतली, अशीं तीं दोन पिकलीं पानें पाहणें, याहून अधिक सुंदर असें या जगांत माझ्या दृष्टीनें तरी अन्य कांहीं नाहीं.

दिवसाचे काम सपल्यावर सायंकाळ झाली असतांना वडिलांना पाहण्यांत मौज असे. त्यांचे सर्वोत्तम दर्शन त्यावेळेस घडे. रात्रीच्या जेवणाला अद्याप तास दोन तास अवकाश असे. जेवणानतर पुन्हां काम असे. हे मधले दोन तास विश्रान्तीचे, काव्य-शास्त्रविनोदाचे. साधारण साडेसहा वाजले, कीं हळूहळू वडिलांचे मित्र यायला लागत. एकामागून एक येत. थोड्याच वेळांत वीस पंचवीस तरी मंडळी तेथें जमे. घरासमोर हिरवळीवर खुर्च्या-टेबलें नीट मांडलेलीं असत. तेथें वडिलांचा तो नित्याचा सायंदरबार भरे. सभोंवतीं मित्र असत, चाहती मंडळी असे. आणि वडील त्या साऱ्यांची करमणुक करायचे. सुंदर कोटि करतील, हंसतील, हंसवतील, रमवतील. या सायंकालीन समेल-नांतहि नेतृत्व वडिलांकडेच असायचे. ते कधीं जुन्या गोष्टी सांगून, कधीं नुकत्याच झालेल्या घडामोडी वर्णून सर्वांना मंत्रमुग्ध करायचे. दुसरेहि मधून मधून भाग घेत. परंतु वडिलांचा मुख्य भाग; त्यांचा नायकूचा खेळ. इतरांचें ठिकुटिकु खेळणे.

फारच थोड्या लोकांनीं माझ्या वडिलांना ओळखलें असेल. जे त्यांना प्रथमच भेटत, त्यांची समजूत होई कीं हे कठोर आहेत. हे कधीं वांकायचे नाहींत, माघार घ्यायचे नाहींत. कधीं कधीं वडील असे असत हें खरें; परतु जे त्यांना नीट ओळखीत त्यांना ते किती प्रेमळ आहेत, प्रेम करण्यासारखे आहेत, हें माहित असे. त्यांच्याजवळ अति प्रभावी असे व्यक्तिमत्त्व होतें; महान् आकर्षक शक्ति होती; कुठल्याहि प्रकारच्या मडळींत ते असोत. आकर्षणाचे मुख्य केंद्र तेच व्हायचे. सारे डोळे त्यांच्याकडेच वळायचे; तेथेच खिळायचे. संमेलनांतून वगैरे मुद्दां तेच सर्वांना आवडायचे. पुष्कळशा तरुणांची यामुळे निराशा होई. त्यांना आश्चर्य वाटे. त्यांच्यांत थोडी हुकुमशाही वृत्ति होती. जणूं सम्राट् होते. एक प्रकारची धीरोद्धता वृत्ति त्यांच्यांत होती. त्यांना पाहतांच कांहीं तरी भव्य, उदात्त असें आपण पाहत आहोत असें वाटे. आणि साहजिकच हात जोडले जात. या पुरुषाला वदावें, प्रणाम करावा, असेंच पाहणाऱ्याला वाटे. यांना मान दिलाच पाहिजे असे वाटल्यावांचून राहत नसे. त्यांच्याजवळ क्षुद्रता नव्हती. दुर्बलतेला त्यांच्याजवळ थारा नसे. मनाने नि शरीरानें ते खबीर होते. मला तरी ते अपूर्व वाटत, निस्तुल वाटत, अद्वितीय वाटत. मीं पुष्कळ प्रवास केला आहे. किती तरी थोर माणसे मीं पाहिलीं आहेत. त्या महान् स्त्री-पुरुषांत निरनिराळ्या प्रकारचा मोठेपणा मीं पाहिला आहे. त्यांच्याबद्दल मला आदर आहे. त्यांचीं स्तुतिस्तोत्रें मीं गायिलीं आहेत. परतु वडिलांसारखी सद्गुणसपन्न मूर्ति मीं अद्याप पाहिली नाहीं. मला त्यांच्याविषयीं फार प्रेम वाटत असल्यामुळें, त्यांच्याबद्दल नितान्त आदर असल्यामुळें मी त्यांच्या बाबतींत पक्षपातहि कदाचित् करीत असेन. तसें होणे अशक्य नाहीं.

त्यांच्या गुणसिंधूंत एकच दोष होता. ते फार रागवायचे. एकदम उसळायचे; परतु हा परंपरागत आलेला दोष आहे. पिढयान् पिढयांचा हा वारसा आहे. आमच्यांतील

कोणीहि त्यापासून सर्वस्वीं मुक्त नाहीं. त्यांच्याजवळ एकच दुबळेपणा होता. आपल्या मुलांवर त्यांचे आश्चर्य वाटण्याइतके प्रेम होतें. पुष्कळांची समजूत असे कीं हे अति कठोर व कडक शिस्तीचे वडील असतील. परतु बाहेरून कठोर वाटणाऱ्या त्यांच्या स्वभावाखालीं हृदयांत कुटुंबाविषयींचे अपार प्रेम भरलेले होतें. जवाहर घरच्या गोष्टींकडे कधीं लक्ष देत नसे. त्यामुळें घरगुती कामांचा सारा भार वडिलांच्या शिरावर असे. त्यांना काय काय त्रास होई हें आम्हांला कळतच नसे. कारण आमच्यावर थोडाहि बोजा टाकायची त्यांची इच्छा नसे. ते जिवंत होते तोंपर्यंत आम्हांला कशाची काळजी नव्हती. स्वच्छदपणें, सुखानें निर्धास्तपणे आम्ही दिवस नेत होतों. पाठीशीं वडील आहेत, मग कशाची फिकीर, असें सदैव वाटे. ते आम्हां सर्वांचे आधार, आमचे पाठीराखे. त्यांच्या प्रेमानें सुरक्षित असल्यामुळें चिंता, काळजी म्हणजे काय हें आम्हांला समजलेंहि नाहीं. त्यांचा नुसता विचार मनांत येतांच समाधान वाटे, आधार वाटे; सर्व सकटांपासून, सर्व [illegible] आम्हांला सांभाळणारा तो एक महान् बळकट दुर्ग होता. त्यांच्या निधनानें आम्हांला पोरके वाटले. समुद्रांत बुडतों असें वाटलें. त्यांच्याशिवाय कसें जगायचे हे समजेना. त्यांच्याविना जीवन नीट जुळवून घेतां येईना.

त्यांचें मरण म्हणजे मातृभूमीवरहि मोठी आपत्ति होती. देशाच्या इतिहासांतील आणीबाणीच्याच वेळीं एक अति महान् योद्धा, एक थोर मुत्सद्दी निघून गेला. वडिलांची निरनिराळ्या गोष्टी सुचवणारी बुद्धि आश्चर्यकारक होती. आणि देशाच्या त्या आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांचे मार्गदर्शन फार मोलाचें ठरलें असते. आमच्या पुढाऱ्यांपैकीं एकजण वडिलांना श्रद्धांजलि वाहतांना म्हणाले, " सामान्य माणसाच्या ठिकाणीं जी त्यागबुद्धि, त्याच्यापेक्षां किती तरी थोर अशी त्यागबुद्धि त्यांच्यांत होती. आमच्या स्वातन्त्र्ययुद्धांत त्यागावर त्यागांच्या राशि रचतांना त्यांना आनंद होत असे. त्याग किती करायचा याचे मोजमाप त्यांच्याजवळ नसे. त्यांचा त्याग अनत होता. आणि त्यांत त्यांना आनद असे. हिंदुस्थानच्या स्वातन्त्र्याच्या ध्येयाशीं ते एकरूप झाले होते. त्या स्वातंत्र्यासाठींच ते जगले. दुसऱ्या कशासाठीं नाहीं. स्वतत्र हिंदुस्थानांत जेव्हां स्वातंत्र्यमंदिर उभारलें जाईल, तेव्हां त्यांत नवभारत निर्माण करणाऱ्या महात्मा गांधींच्याच जवळ मोतीलालजींचेहि मानाचें स्थान असेल. "

" बाहेरच्या जगाला प्रेम नि सौंदर्य यांची मेजवानी आहे. परंतु येथें आम्हांला
फांस नि शृंखला फक्त आहेत. "

गालिब

वडिलांच्या मृत्यूनंतर जवाहरला दिल्लीला जाणें प्राप्त होतें. तेथें गांधीजींजवळ चर्चा करायची होती. व्हाइसरॉय लॉर्ड अर्विन नि गांधीजी यांच्या मुलाखती होत होत्या. घरच्या पुष्कळ बाबतींत जवाहरनें पाहणें जरूर होतें. परंतु त्याच्या गैरहजेरींत तें सारें तसेंच ठेवण्यांत आलें. दिल्लींत जरी तो महत्त्वाच्या कामांत गढलेला होता, तरी आपल्या लहानशा कुटुंबाचे आपणच आतां मुख्य ही गोष्ट तो विसरला नाहीं. त्या वेळेस तो जवळ असण्याची आम्हां सर्वांनाच आवश्यकता होती. विशेषतः आईला त्याची अधिकच जरूरी होती. कारण ती अगदीं हताश होऊन गेली होती. कसे तरी दिवस जात होते. अजून तो घरीं येऊं शकत नव्हता. त्यानें मला लिहिलें.

" येथे मी लोंबकळत पडलों आहें. किती दिवस येथें राहावें लागणार तें कांहीं समजत नाहीं. कुटुंबांतील मंडळींच्या सल्ल्यानें घरगुती कामांची नीट व्यवस्था लावण्यासाठीं एक आठवडाभर तरी निवांत वेळ मिळेल अशी मी आशा करीत होतों. इतके दिवस वडिलांच्या शिरावर सारा बोजा होता. आपण मोकळीं होतों. पुढें येणाऱ्या अडचणींची त्यांना आधींच कल्पना असे. त्यांचें दुरदर्शी शहाणपण, आपल्याबद्दलची त्यांची

प्रेमळ चिंता यांमुळें आपण सुखी होतों, निश्चिंत होतों. जीवनांतील कठोर वस्तुस्थिति जेव्हां समोर येई, तेव्हां वडील आहेत या विचारानेंच धीर येई. किती त्यांचें आपणांवर प्रेम! त्या प्रेमाचें पांघरुण आपणांवर होतें. इतरांना ज्या चिंता नि काळज्यांना तोंड द्यावें लागतें, त्या आपणांस कधींच अनुभवाव्या लागल्या नाहींत. परंतु आतां त्यांच्याशिवायच आपणांस राहणें भाग आहे. जसजसा एकेक दिवस जात आहे, तसतसा त्यांचा अभाव अधिकच तीव्रतेनें जाणवत आहे. मला अगदीं एकाकी वाटूं लागतें. परतु किती झालें तरी आपल्या प्रतापी पित्याचीं आपण मुलें आहोंत. त्यांच्या सामर्थ्याचा नि धैर्याचा कांहीं अंश आपल्यांतहि आहे; कितीहि संकटें आपल्या मार्गात येवोत, कसोटीचे प्रसंग येवोत, यांतून आपण पार पडूं अशा निर्धारानें नि निश्चयानें त्यांना आपण तोंड देऊं."

वडील गेल्यामुळें जवाहरला झालेलें दुःख किती खोल होतें, तें या पत्रावरून सहजच स्पष्ट होत होतें. त्या दुःखाच्या तीव्रतेंत आम्ही सारींच सहभागी होतों. वडिलांशिवाय जगणें म्हणजे कर्णधाराशिवाय नाव चालवण्याप्रमाणें होतें. आम्हीं केवळ अगतिक होऊन गेलों. त्यांच्या मार्गदर्शनाशिवाय सारी घडी कशी नीट बसवायची हें आम्हांला कळेना. आमच्या लहानशा कुटुंबाची सारी जबाबदारी जवाहरच्या खांद्यावर आतां पडली होती. ती जबाबदारी धीरानें आणि क्षमतेनें त्यानें चालवली. वडिलांची जागा लगेच त्यानें घेतली. आणि प्रत्येक लहानसान गोष्टीसाठींहि आम्ही अधिकाधिक त्याच्यावर विसंबून राहूं लागलों. आणि अजूनहि आम्ही तसेंच करतों.

जवाहरचें पत्र मला अमृतांजनाप्रमाणें वाटलें. माझें दुःख दुसऱ्या कशानेंहि कमी झालें नसतें. परतु त्याच्या त्या चार ओळींनीं माझ्या हृदयाची जखम भरून आली. जवाहरच्या त्या पत्रानें त्या वेळीं मला धीर दिला असें नव्हे, तर गेल्या बारा वर्षांत जेव्हां जेव्हां निराशा मला घेरी, जेव्हां जेव्हां धीर खचे, मला निरुत्साही वाटे, तेव्हां तेव्हां या पत्रानें जीवनांतील समस्यांना तोंड देण्याचें धैर्य मला दिलें आहे. परतु जवाहरला ही गोष्ट माहीत नाहीं

त्या वर्षींचें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन कराचीला भरलें होतें. जवाहर नि कमला यांच्याबरोबर आई नि मीहि गेलों. जवाहरचीहि प्रकृति ठीक नव्हती सुटण्यापूर्वी तो तुरुंगांत जरा आजारी होता. माझी प्रकृति म्हणजे पोलादी असें तो नेहमीं म्हणत असतो. परंतु त्याच्या त्या पोलादी प्रकृतीवरहि वडिलांच्या आजारीपणाचा नि मृत्यूचा अतिशय ताण पडला होता; तिला चांगलाच धक्का बसला होता. डॉक्टरांनीं पूर्ण विश्रांतीचा सल्ला दिला. कांहीं दिवस रजा घ्या, असें ते म्हणाले. म्हणून जवाहर, कमला नि इंदिरा सीलोनला गेलीं. तेथें तीं तीन आठवडे राहणार होतीं.

जवाहर सीलोनवर बेहद्द खूष होता. तेथील जनतेनें दाखविलेल्या कृपाळु प्रेमानें त्याचें हृदय भरून आलें. सीलोनहून परत येत असतांना बोटीवरून लिहिलेल्या पत्रांत तो मला लिहितो, "सर्वत्र आमचें टोलेजंग नि थाटाचें स्वागत झालें. आश्चर्यकारक स्वागत. एका ठिकाणीं जमलेल्या जनसमुदायाचा निरोप घेऊन जों मी दुसरीकडे जायला निघावें, तों वाटेत दुतर्फा असंख्य लोक तासान् तास वाट पाहत बसलेले दिसायचे. तो चमत्कार पाहून मी विस्मित होत असें. याचा अर्थ काय ते समजून घ्यायचा मीं प्रयत्न केला. या चमत्काराच्या पाठीमागें कांहीं तरी निश्चित्-पणें असलें पाहिजे असें मला स्पष्टपणें वाटलें. विभूतिपूजेपेक्षां, एखाद्या व्यक्तीविष-यींच्या पसंतीपेक्षां कांहीं तरी अधिक महत्त्वाचें त्या चमत्काराच्या मागें असलेंच पाहिजे. आणि एकदम माझ्या ध्यानांत आलें की ते लोक हिंदी स्वातंत्र्याच्या लढाईची पूजा करीत होते. भारताच्या पराक्रमाची पूजा करीत होते स्वातंत्र्यार्थ लढणाऱ्या भारताच्या नवप्रभेचा ते गौरव करीत होते. भारताच्या नवतेजाचीं आम्ही क्षुद्र प्रतीकें होतों, मूर्त रूपें होतों. असा एक काळ होता, कीं ज्या वेळेस हिंदी माणसाला परदेशांत लाजेनें खालीं मान घालावी लागे. आणि आतां-आतांपर्यंत अशी स्थिति होती. परंतु कांहीं तरी आतां असें घडलें आहे, कीं ज्यामुळे ती लज्जा आतां भूतकालीन वस्तु झाली आहे. तें दुःखदायी स्वप्न आतां नष्ट झालें आहे. आज हिंदी असणें ही मोठ्या अभिमानाची गोष्ट झाली आहे; विशेषतः असा हिंदी असणें-ज्यानें स्वातंत्र्याच्या लढ्याच्या टिप्परघाईत आपला वांटा उचलला आहे, असा हिंदी मनुष्य-मग ती स्त्री असो वा पुरुष असो-कोठेंहि गेला तर तो आपल्याबरोबर नवभारताच्या दिव्य यशाचा अंश घेऊन जात असतो, नवभारताच्या कीर्तीचा सुगंध घेऊन जात असतो. जवाहरला पूर्वी वाटे आणि आजहि असेंच वाटतें, कीं आपला करण्यांत येणारा सत्कार, आपल्याला देण्यांत येणारा मान, दाखविण्यांत येणारें प्रेम, यांच्यावर आपला वैयक्तिक हक्क नाहीं. तर भारताच्या स्वातंत्र्यार्थ झुंजणाऱ्या पुत्रांपैकीं आपण एक असल्यामुळे, ज्यानें देशाला स्वतःचें सारें दिलें आहे, आणि देशानें मागणी केली तर स्वतःचे प्राणहि जो अर्पण करील असे एक असल्यामुळे, आपणाला मिळालेली ती देणगी आहे.

गांधी-अर्विन करार झाला, तरी देशांतील परिस्थितींत बदल झाला नाहीं. ती जशीची तशीच होती. त्य करारांतील सद्भावाप्रमाणें वागण्याची सरकारला इच्छा नव्हती. आणि जागृत झालेली जनताहि आपल्या लढ्याला लागणारीं फळें भिरकावून द्यायला तयार नव्हती.

संयुक्त प्रांतांतील शेतकऱ्यांत असंतोष नि प्रक्षोभ सारखा धुमसतच होता. आणि शेतकऱ्यांची गडबड गाडून टाकण्यासाठीं सरकारनें वटहुकुमी कारभार सुरू केला. सयुक्त प्रांतांत प्रांतिक परिषद भरायची होती. सरकारनें तिच्यावर बंदीहुकुम काढला.

शेतकऱ्यांच्या प्रश्नांच्या बाबतींत प्र काढणार नाहीं असें अभिवचन देत असाल, तर परिषदेला परवानगी मिळेल असे सरकारने कळविलें. परंतु ज्या गोष्टीसाठीं विशेषत: ही परिषद भरणार होती, त्याच गोष्टीच्या बाबतींतच माघार घेणें म्हणजे हास्यास्पद झालें असतें. परंतु गोलमेज परिषदेहून गांधीजी लौकरच येणार होते. जवाहरला व तसेंच इतर कार्यकर्त्यांना त्यांना भेटण्याची इच्छा होती. म्हणून परिषद पुढें ढकलण्याचा सल्ला घेण्यांत आला. इतकें केलें, तरीहि गांधीजींना ते भेटूं शकले नाहींत.

जवाहर अलाहाबादहून मुंबईला जात होता. अलाहाबादपासून थोड्याच मैलांवर असलेल्या बाजूच्या एका स्टेशनवर त्याला अटक करण्यांत आली. आणि दोनच दिवसांनीं इग्लंडमधील वर्तुळ परिषदेला हजर राहून गांधीजी मुबईला आले. धक्क्यावरच जवाहर भेटेल अशी त्यांना अपेक्षा होती. परंतु जवाहर नि आणखी इतर पुष्कळ कार्यकर्त्यांच्या अटकेच्या बातमीनेच त्यांचें स्वागत केलें! निरनिराळ्या प्रांतांतून अनेक वटहुकुम काढण्यांत आल्याची वार्ता उतरतांच त्यांना मिळाली. फांसा टाकला गेला. पुन्हा लढा सुरू झाला. १९३२ च्या जानेवारी चारला गांधीजी नि वल्लभभाई यांना अटक करून स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें. आणि थोड्याच दिवसांत चळवळ शिगेला पोंचली. आमच्यापैकीं पुष्कळांनीं मागच्या चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतला नव्हता. परंतु या वेळीं आमच्याजवळ असलेल्या सर्व शक्तीसह, सर्व उत्साहासह आम्हीं चळवळींत उडी घेतली. आणि माझी आई, ती जरी वृद्ध नि सुकुमार होती, तरी तीहि मागे राहिली नाहीं; शहरांतून, खेड्यांतून, सभांतून भाषणें करीत ती निघाली. तिचा उत्साह नि स्फूर्ति पाहून आम्हांला सारखें आश्चर्य वाटे. सर्व जन्मभर ती जवळ जवळ कमीअधिक प्रमाणांत आजारी होती; सर्वसामान्य जीवनहि नीट जगणें तिला शक्य होत नसे. घरांतले साधे चार धंदेहि करतां येत नसत. परंतु कोठून तरी अकस्मात् तिला दिव्य शक्ति आली. कोठल्या तरी उच्चतर ठिकाणाहून तिला अचल अशी संकल्प शक्ति एकदम मिळाली. आमच्याप्रमाणेच तीहि उत्साहमूर्ति बनली. कधीं कधीं तिचा उत्साह आमच्याहूनहि अधिक दिसे.

लौकरच मी, माझी बहीण, नि इतर कांहीं सहकारी यांच्यावर नोटिसा बजावण्यांत आल्या. एक महिनाभर सभांतून भाग घ्यायचा नाहीं, मिरवणुकींत सामील व्हायचें नाहीं, हरताळ वगैरे पाडण्याची खटपट करायची नाहीं, अशा प्रकारची ती ताकीद होती. दोन आठवड्यांनींच स्वातंत्र्यदिन येणार होता. त्या दिवसापर्यंत जरा माघार घ्यायची असें आम्हीं ठरविलें. आणि २६ जानेवारीचा स्वातंत्र्यदिन आला. अलाहाबाद शहरांत आजपर्यंत कधींहि भरली नसेल अशी विराट् सभा आम्हीं भरवली. आई अध्यक्ष होती. तिने जळजळित भाषण केलें. परंतु सभा संपण्यापूर्वीच लाठी-हल्ला आला. सभा उधळली. आम्हींच ती बरखास्त केली. जागच्या

जागीं अनेकांना बद्ध करण्यांत आलें. किती तरी जखमी झाले. आमच्यावर बजावलेली नोटिस आम्हीं मोडली असल्यामुळें आम्हांसहि अटक होईल असे वाटत होतें. परंतु तसें कांहीं एक झालें नाहीं. निराश व खट्टू होऊन आम्ही घरीं आलों. परतु दुसऱ्या दिवशीं सकाळीं ९॥ वाजतां पोलिस इन्स्पेक्टर आला. तुम्हांला अटक करण्यांत आलेली आहे असें मला नि माझ्या बहिणीला सांगण्यांत आले. आम्ही आमचें सामान घेऊन निघालों. आईचा व इतर मंडळीचा निरोप घेऊन तुरुंगांतील आमच्या घराकडे आम्ही गेलों. तुरुंगांतील हाच खराखुरा असा पहिला अनुभव. पूर्वी एकदां फक्त १२ तास जेलमध्यें काढले होते. आमच्या मनांत स्वतःविषयींचा किंवा उद्यांचा विचार नव्हता. आम्ही आईला मागें ठेवून आलों होतों. ती अशक्त होती. ज्या घरांत पूर्वी नेहमीं आनंद नि सुख यांचे साम्राज्य असे, परंतु आतां जेथें दुःख नी एकान्तच होता, अशा त्या आमच्या मोठ्या घरांत ती एकटी होती. त्या माउलीचा विचार सारखा मनांत येई. एका पाठीमागून एक आम्ही सारीं मुलें तरुगांत जात होतों. आतां आईला तिचें स्वतःचें आणि आमचेहि काम चालवायचे होते. ती एकटी बाहेर होती. तिला तें सारें कठिण गेलें असेल. परतु तिचें शरीर कृश नि दुबळें असलें, तरी तिचें हृदय दुबळें नव्हतें. हृदय स्वाभिमान नि सामर्थ्य यांनीं भरलेलें होतें. ती जणू सिंहीण होती. आतां घरांत तिची एक बहीण काय ती होती, जी तिच्याप्रमाणेंच शूर होती, आईला आतां अगदीं सुने सुने वाटत असले पाहिजे. तो एकाकीपणा तिला भीषण वाटला असेल. परंतु लढा पुढे चालविण्याच्या कृतनिश्चयापासून ती लेशमात्रहि ढळली नाहीं.

आमचे बाहेरचे आवडतें घर सोडून मोटरींत बसून आम्ही डिस्ट्रिक्ट जेलमध्ये तर आलों. तेथें गेल्यावर आणखी सहकारी भगिनी भेटल्या. त्यांना आधींच आणण्यांत आले होतें. त्या साऱ्या आनंदी होत्या, उत्साही होत्या. त्यांच्या तोंडावर हास्य होतें. वाटेल ते होवो. त्याला तोंड देण्याची त्यांची तयारी होती. एकत्रच राहायचे असल्यामुळे आम्हांला बरें वाटलें. वजन घेणे वगैरे ठरींव गोष्टी संपल्यावर आम्हांला आंत नेण्यांत आले. त्या तुरुगांत स्त्रियांसाठीं खास जागा नव्हती. नियमाप्रमाणे ज्यांचे खटले चालायचे असत, त्यांनाच तेथें ठेवीत. सजा लागल्यावर दुसऱ्या तुरुगांत त्यांना पाठवीत. अशा स्त्रियांसाठी एक कोठा होता. त्या औरत कोठ्यांत अत्यंत वाईट प्रकारच्या बाया होत्या. सारे रोग त्यांच्याजवळ होते. अशा त्या बायांतच आम्हांलाहि तीन आठवडे ठेवण्यांत आले. तीन आठवड्यांनीं खटला सुरू झाला. खटला संपल्यावरहि चार दिवस आम्हीं तेथेंच होतों. आम्हांला निरनिराळ्या कोठड्यांतून ठेवण्यांत आलें होतें. एकेका कोठडींत चौघी चौघी होतों. प्रत्यहीं सकाळीं सुपरिंटेडेंट येई. तो इंग्रज होता. मागील महायुद्धांत स्फोटाच्या आघाताचा एक चांगलाच धक्का त्याला बसला होता. त्या आघाताचा त्याच्यावर बराच वाईट परिणाम

झालेला होता. सुपरिंटेंडेंट येई, त्या वेळीं आम्हांला त्याच्यासमोर येऊन उभें राहावें लागे. कोणी कमी नाहीं ना हे तो आपल्या डोळ्यांनीं बघे. एके दिवशीं मला नि माझ्या मैत्रिणीला खोलीच्या बाहेर यायला थोडा उशीर झाला. आम्हांला बघतांच साहेब ओरडून म्हणाले, "पाय उचला, लौकर या. येथें का सबंध दिवस तुमची वाट पाहत बसूं ? तिकडे मला टेनिसचे सामने पाहायला जायची घाई आहे; आणि या गलिच्छ जागेत तुमची वाट पाहत मी उभा आहें. किती खोळंबा करायचा !" ती वटवट ऐकून मीहि चिडलें. मीहि त्याला एक टोला दिला. म्हटलें, "तुम्हांला या जागेत जरा उभें राहायला इतका त्रास होतो. तुमच्यापेक्षां शतपट आम्हांला होतो. या गलिच्छ जागेत आम्हांला रात्रंदिवस राहावें लागतें. टेनिसचे सामने एक दिवस नाहीं पाहायला मिळाले म्हणून काय झालें ? म्हणे टेनिसचा सामना चुकेल ! आम्ही तर रोज चुकत आहोंत." साहेब संतापानें हिरवे निळे झाले. परंतु सुदैवानें आणखी कांहीं बोलले नाहींत.

पहिले कांहीं दिवस म्हणजे एक अभिनव अनुभव होता. आमच्यापैकीं कोणीहि तो विसरणें शक्य नाहीं. आमच्या कोठड्यांतून सर्व प्रकारचे जीवजंतु होते. इकडेतिकडे ते वळवळत असत, रांगत असत. रात्रीं भीतीमुळें आम्हांला झोपहि येत नसे. वाटायचें कीं हे किडे अंथरुणांत येतील. किती तरी रात्री अशा गेल्या. पदोपदीं एखादा किडा, एखादा जीव हळूच वळवळत आपल्या हातावर चढेल, किंवा पायावर चढेल असें सारखें वाटत राहणें किती भयप्रद ती भावना ! एकदोन वेळां प्रत्येकीला तो प्रत्यक्ष अनुभव आला. पुढे पुढें आम्ही निजण्यापूर्वी सारें झाडून, झटकून मगच निजायच्या. त्यामुळें तसले विचित्र अनुभव पुढें आले नाहींत. कांहीं बरेंवाईट घडलें नाहीं. आमचा खटला सुरू होण्यापूर्वी आम्हांला दररोज पाहुण्यांना भेटायची परवानगी होती. आई रोज येत असे. शेवटीं खटला चालण्याचा दिवस एकदांचा उजाडला. उद्दीप्त भावनांनीं ठरलेल्या घटकेची आम्हीं वाट पाहत होतों. फार तर प्रत्येकीला सहासहा महिन्यांची सजा होईल असें आम्हांला वाटत होतें. आम्ही त्यासाठीं तयार होतों. तुरुंगांतच खटला चालायचा होता. आम्ही साऱ्याजणीं एका रांगेंत बसलों होतों. एकेकीचें नांव घेत नि तिचा खटला सुरू होई. खटला चालविण्यांत भाग घ्यायचें आम्हीं नाकारलें. प्रथम माझ्या बहिणीचा पुकारा झाला. तिचा खटला सुरू झाला. मॅजिस्ट्रेटनें धीरेसे एक वर्ष सक्त मजुरी, शिवाय दंड, अशी शिक्षा वाचून दाखविली. नंतर माझी पाळी आली. तीच शिक्षा मलाहि, परंतु दंड नव्हता. एकीपाठीमागून एकीला, सगळ्याजणींना शिक्षा देण्यांत आल्या. फक्त आणखी दोघींनाच वर्षाची सजा होती. बाकीच्यांना निरनिराळ्या मुदतीच्या होत्या. कोणाला तीन महिने, कोणाला नऊ, अशा होत्या. चार दिवसांनीं आम्हांला लखनौला पाठविण्यांत आलें. रात्रीं ११ वाजतां आम्ही निघालों. त्या तुरुंगांत आम्ही तब्बल साडेअकरा महिने होतों. चांगल्या वर्तनाबद्दल पंधरा दिवसांची माफी मिळाली !

लखनौच्या तुरुंगाच्या दाराशीं आम्हीं उजाडत आलों. थंडी मी म्हणत होती. त्या कठोर व भीषण अशा तुरुंगाच्या उंच भिंती पाहून थोडी भीति वाटली. तुरुंगांतील जीवन कसें असणार याची पहिल्या प्रथमच जरा कल्पना आली. सबंध वर्षभर बाहेरच्या जगापासून आम्हांला कोंडून ठेवणार ! परंतु गलितधैर्य व्हायचें नाहीं असा प्रत्येकीनें निर्धार केला होता. पुष्कळ हालअपेष्टा भोगाव्या लागल्या; मनालाहि खूप त्रास व्हायचा. परंतु आमच्या महान् पुढाऱ्यावरची आमची निष्ठा, त्याच्या माहात्म्यावरची आमची श्रद्धा, आमच्या ध्येयावरची आमची भक्ति हीं अढळच राहिलीं.

तुरुगांतील कचेरींत आम्ही शिरलों. आमच्या सामानाची तपासणी झाली. नंतर तुरुगाच्या आंतील भागांत आम्हांला नेण्यांत आलें. पोलिस बाईनें आम्हांला आमची बरॅक दाखविली. आम्हांला काय काम करावें लागेल, आम्हीं कसें वागलें पाहिजे वगैरे गोष्टी तिनें आम्हांला सुनविल्या. "तुम्हांला तुमच्या अंगणांत फिरायची मोकळीक आहे. परंतु सायकाळीं पांच वाजतां बंद व्हावें लागेल." असें सांगून ती गेली. इतक्या लौकरच बंद व्हावें लागणार असें ऐकून जरा वाईट वाटलें. आम्हीं आमच्या पथाऱ्या व्यवस्थित ठेवल्या. त्या कांहीं फार चांगल्या नव्हत्या. नंतर आम्हीं स्नानें उरकलीं. आमच्यांतील कांहीं जणी मग जरा इकडे तिकडे पाहूं लागल्या.

सकाळची वेळ होती. इतर गुन्हेगार बाया आपापल्या कोठड्यांतून बाहेर आल्या होत्या. कोणी कपडे धूत होत्या. कोणी दुसरीं कांहीं कामें करीत होत्या. आम्ही रमत गमत त्यांच्या बाजूनें गेलों. कांहीं जणींनीं कुतूहलानें आमच्याकडे पाहिलें. कांहींनीं स्नेहदर्शक स्मित केलें; परंतु कांहीं ज्या वयानें जरा पोक्त होत्या, तुरुंगाला वटघटलेल्या होत्या, त्यांनीं मात्र दुर्मुखलेले चेहरे केले. त्यांनीं जरा रागानेंच पाहिलें. एक गुन्हेगार बाई तेथें वॉर्डर होती. तिनें आम्हांला वरपासून खालपर्यंत मोठ्या तिरस्कारानें न्याहाळलें. आम्हांला मागून कळलें, कीं ती वॉर्डर बाई मोठी खुनशी होती; दुष्ट हडळ होती. ती वृद्ध झालेली होती.

तुरुंगांत सोमवारीं परेड असते. त्या दिवशीं सुपरिंटेंडेंट सर्वत्र पाहणी करायला येत असतो. पहांटे पांच वाजल्यापासून झाडलोट सुरू व्हायची. बरॅकी, अंगणें सारीं स्वच्छ करायचीं. आठाच्या सुमारास साऱ्या कैद्यांना रांगेत उभें करण्यांत येई. त्या दिवशीं सर्वांचे गणवेष स्वच्छ असत. आणि प्रत्येकाची लखलखीत ताटवाटी त्याच्या-समोर असे.

परेडचा तो आमचा पहिला दिवस होता. आमची पोलिस बाई जरा भीत होती. आम्ही परेडच्या वेळीं साहेब येईल तेव्हां नीट वागूं कीं नाहीं याची तिला चिंता होती. साहेबाच्या आगमनाच्या वेळीं सर्वांनीं उभें राहायचें असे. परंतु कांहीं कांहीं

तुरुंगांतून राजकीय कैद्यांनीं तसें करण्याचें नाकारलें होतें; म्हणून आमच्या पोलिस बाईला भीति वाटत होती.

तथापि पहिली परेड तर फार सुंदर रीतीनें पार पडली. सुपरिंटेंडेंट अति सभ्य होता. त्यानें आम्हांला कांहीं तक्रारी आहेत का विचारलें: हवें-नको विचारलें. कांहीं मैत्रिणींनीं पुस्तकांविषयीं सांगितलें. कांहींनीं आणखी कांहीं मागितलें. जेलमध्ये कसला तरी अभ्यास करायची माझी इच्छा होती. मीं विचारलें, " मला कांहीं फ्रेंच नि इटॅलियन पुस्तकें ठेवतां येतील का? तसेंच कांहीं लघुलेखन-पद्धतीवरचीं पुस्तकें नि तीन कोश यांचीहि मला आवश्यकता आहे. " मी पुन्हां असेंहि सांगितलें, कीं " हीं सारीं झालीं अभ्यासाची पुस्तकें. थोड्या कादंबऱ्याहि मला हव्या आहेत. "

मी गंमत म्हणून इतकीं पुस्तकें नव्हतें मागत. खऱ्या अर्थानेंच तीं मी मागत होतें. परंतु तुरुंगांत सहा पुस्तकांहून अधिक पुस्तकें एकाच वेळीं मिळत नसतात, हें माझ्या ध्यानांतच आलें नाहीं त्या सहांतच कोश वगैरे पुस्तकेंहि धरायचीं.

क्षणभर सुपरिंटेंडेंटची जरा चलबिचल झाली. नंतर तो प्रामाणिकपणें म्हणाला, " हें पाहा, तुरुंगांतच तुमच्यासाठीं एखादें ग्रंथालय सुरू करण्याची मी वरिष्ठ अधिकाऱ्यांजवळ परवानगी विचारतों. तें बरें नाहीं का होणार ? तुम्हांला त्यांतून पुस्तकें निवडतां येतील, विविधताहि असेल. " आपण उत्तर द्यावें कीं न द्यावें अशा विचारांत मी होतें. परंतु त्याच्या डोळ्यांतील चोरटें हास्य पाहून मी म्हणालें, " असें केलेत तर फारच छान होईल. परंतु तुम्हांला फार त्रास पडूं नये एवढीच इच्छा. मला एवढेंच सांगायचें आहे, कीं केवळ सुताला पीळ देण्यांतच माझा सारा दिवस फुकट जाऊं नये. तुम्ही मला पुस्तकें लौकर द्याल, अशी मला आशा आहे." दोन महिन्यांनीं वरिष्ठ अधिकाऱ्यांजवळ ब याच वाटाघाटी होऊन मला माझीं मोलवान पुस्तकें एकदांचीं मिळालीं.

आम्हांला प्रत्येकीं सहा साड्यांची परवानगी होती. इतरहि कांहीं कपडे होते. दररोज आम्हांलाच सारें धुणें करावें लागे, आणि तें काम कांहीं सोपें नव्हतें. कारण खादी आधींच जाड, वजनदार होती. पाण्यांत भिजविल्यावर ती अधिकच जड होई; आणि हातांत धरणेंहि कठीण जाई. परंतु तुरुंगांत ज्याप्रमाणें इतर अनेक गोष्टींची सवय झाली. त्याप्रमाणें हीहि सवय झाली. अन्न मात्र भयंकर होतें. तें अन्न घशाखालीं दवडण्याचे भगीरथ प्रयत्न आम्हीं केले. परंतु तें खालीं उतरेचना. केवळ अन्न वाईट होतें एवढ्याचमुळें आम्हांला वीट आला, असें नाहीं. तर तें अन्न वाढण्याची पद्धतहि इतकी घाणेरडी असे कीं शिसारी येई. " आम्हींच आमचा स्वयंपाक करीत जाऊं, परवानगी द्या. " असें आम्हीं सांगितलें. परवानगी मिळाली. आम्ही चौघी-चौघींच्या, सहा-सहाजणींच्या अशा निरनिराळ्या तुकड्या केल्या. त्या त्या तुकड्यांतील

प्रत्येकीनें नेमलेलें काम करायचें. एकानें स्वयंपाक करावा, एकीनें भाजी चिरावी, एकीनें ताटे वगैरे धुवावीं, असें ठरले. या योजनेनंतर आम्हांला जरा बरें वाटलें.

एका बरॅकींत साधारणपणे आम्ही दहा जणी राहत असूं. कधीं कधीं बाराहि असत. दिवसभर आमच्या अंगणांत भटकायची आम्हांला परवानगी होती. परंतु पांचांचे ठोके पडतांच बंद करण्यांत येई. सकाळीं सहाला मग कुलपें उघडण्यांत येत. हे बंदीचे १३ तास दवडणें मोठे जिवावर येई. प्रत्येकीला कांहीं तरी निराळें करण्याची इच्छा असे. कांहींना गप्पा मारायच्या असत, कांहीं जणींना वाचींत बसावेंसें वाटे, कोणी चर्चाप्रिय होत्या; त्यांना वादविवादांत रस वाटे, तर कांहींना येथील सर्व दुःखक्लेश विसरण्यासाठीं गाणीं वगैरे गाऊन मजा करावी, करमणूक करून घ्यावी असे वाटे. या सर्वांचा एकाच बरॅकींत मेळ कसा बसायचा ? कधीं कधीं भांडणे होत. चांगलीच हमरीतुमरी होई. परंतु एकदरींत आम्हीं एकत्र नांदण्याचा हा प्रयोग बऱ्याच शांततेने, सहनशीलतेने चांगल्या रीतीने पार पाडला.

बाहेरची वार्ता पुष्कळ वेळां अस्वस्थ करीत असे. आणि नवीन कांहीं ऐकले, कीं त्याचा परिणाम बरेच दिवस राही. कशांत मग लक्ष लागत नसे. सारें वेळापत्रक कांहीं दिवस तसेच पडत असे. एकदां तर अशी बातमी आम्हीं ऐकली कीं लाठीमारांत आई जखमी झाली म्हणून. सविस्तर अशी नीट साद्यंत माहिती तर मिळेना. आम्ही दोघी बहिणी कावऱ्याबावऱ्या झालो. मन चिंताग्रस्त झालें. दर पंधरवड्याचीं पत्रें आम्ही आधींच लिहून टाकलीं होतीं. नवीन पत्र लिहायला किंवा तार करायला परवानगी मिळेना. तुरुगांत अशा प्रसंगीं मात्र अगतिक, निराश असें वाटते. एक प्रकारची विमनस्कता येते.

तुरुगांत भेटीचे दिवस म्हणजे महत्त्वाचे दिवस; परंतु आम्हांला भेटायला तरी कोण येणार? कुटुंबांतील बहुतेक मंडळी तुरुंगांत. येऊन जाऊन बाहेर एकटी आई होती. ती कोणकोणाला भेटायला जाणार? भाऊ, मेहुणे, आम्ही दोघी बहिणी, सर्वांना भेटायला तीच यायची. यामुळे पुष्कळ वेळां आमचे भेटीचे दिवस फुकटच जात. कधीं ती आजारीहि असे. कधीं तिला महत्त्वाचें काम असे. आणि भेटी बुडत. भेट आली नाहीं, कीं निराश वाटे.

दर पंधरवड्यास आमचें वजन करण्यांत येई. एखादीचें पौंड दोन पौंड वजन वाढलेलें क्वचित् जर आढळलें, तर तें आश्चर्य वाटे. कांहीं तरी विपरीतच झालें असें वाटे. कांटाच नीट नसेल, असलें भिकार अन्न खाऊन का कोठें वजन वाढेल, वगैरे चर्पटपंजरी आमची सुरू होई. वजनें करणाऱ्या डॉक्टरला आमचे सारें भाषण ऐकायला वेळ कोठें असे? तो बिचारा आमच्याकडे आला, कीं भेदरून जाई. आमचें

वजन वाढले की घटले कोणास ठाऊक? परतु डॉक्टरचें वजन मात्र आमच्या बरॅकींत येण्यानें दर वेळेस कमी होत गेलें असेल. सुपरिंटेंडेंट नि डॉक्टर या दोघांनाच स्त्रियांच्या तुरुंगांत यायला परवानगी असे. आमच्यांतील कांहीं जणी स्त्रियांच्या अभिमानी होत्या. कोणी जर म्हटलें, कीं असें मधून पुरुषांचें दर्शन झालेलें बरें, तर त्या म्हणत, "अडलांय खेटर. मुळींच नाहीं दिसले म्हणून कांहीं बिघडायचें नाहीं." परतु गंमत ही, कीं सुपरिंटेंडेंट आला, म्हणजे सारा वेळ याच स्त्रियांच्या अभिमानी बायका त्याच्याजवळ बोलण्यांत घालवीत. तुरुंगांत जें कांहीं कोठें बिघडलें असेल, त्याचें खापर, त्याचा सारा दोष त्याच्या माथ्यावर लादीत.

अशा रीतीनें जीवन चाललें होतें. दिवसापाठीमागून दिवस जात होते. महिन्यामागून महिने जात होते. कधीं कधीं बाहेरच्या जगांत ज्यांना सोडून आम्ही गेलो होतों त्यांची आठवण येऊन उदास वाटे: आपण कोठे इकडे एकट्या येऊन पडलो असें वाटे. कधीं कधीं आमचे दिवस फार सुखासमाधानांत जात. कामांत, वाचनांत, एकमेकींजवळ चर्चा करण्यांत पटकन निघून जात.

तेथें ज्या गुन्हेगार तरुण मुली होत्या, त्यांच्यांतील बऱ्याचशा प्रेमळ होत्या. त्या सखीभावानें वागत, बोलत चालत. कांहींजणीं मोठ्या विनोदी होत्या, हुशारहि होत्या. कांहींना गाणें-नाचणें येत होतें. एक ॲंग्लो-इंडियन तरुणी तर नृत्य-गायनांत फारच निष्णात होती. ती तरुणी जरा विचित्र होती. तऱ्हेवाइक होती. परतु अधिक तरुण असतांना ती खात्रीनें अधिक सुन्दर दिसत असावी. तिचें खरें नांव सांगणें बरें नव्हे. मी मेरी या नांवानेंच तिला संबोधीन. तिला एकटीलाच एका खोलींत कोंडून ठेवीत. कारण ती नेहमीं खोड्या करायची. ती फार धूर्त होती आणि फार हट्टी होती. एके दिवशीं ती आपल्या खोलीच्या बाहेर थोडा वेळ होती. ती माझ्याकडे आली नि म्हणाली, "एका प्रसिद्ध इंग्रज नटीशी माझें नातें आहे तुम्हांला माहित आहे का? तुमचा विश्वास बसणार नाहीं; परंतु खरेंच तसें माझें नातें आहे."

"मेरी, तू तुरुंगांत कशाला आलीस? बरें, आलीस तर आलीस. येथें तरी जरा नीट वागायचें; माफी भरपूर मिळवून घरीं जायचें. तर तेंहि तू करीत नाहींस!"

"काय सांगू सखी तुला? परतु कैदी कैद्याजवळ साऱ्या सत्यकथा सांगतो. मीहि तुला सांगते, ऐक; तुरुंगांत माझ्या आजवर अनेक खेपा झाल्या. बाहेर जातें, पुन्हां आंत येतें. मी बाहेर जाण्याचा अवकाश कीं फुलपांखरें माझ्या पाठीस लागतात. भुंगे गुंगू करूं लागतात. त्यांना वाटतें कीं मी फार सुंदर आहें. माझी ती प्रसिद्ध चुलतबहीण, ती प्रख्यात नटी, ती मीच असें यांना चुकीनें वाटतें. ते मला इतकें सतावतात कीं कांहीं तरी करून मी पुन्हां तुरुंगांत येऊन बसतें. येथें त्यांच्या लघळपणापासून मी बचावतें."

एके दिवशीं रात्रीं सर्वत्र भीषण शांतता होती. सारीं झोंपलीं होतीं. माझ्या शेजारीं निजलेल्या मुलीनें मला जागें केलें. ती मला हळू म्हणाली, " ऐक; तुला कांहीं ऐकू येतें? " मीं कान देऊन ऐकलें. मला पायांतल्या पैंजणांचा जसा आवाज यावा तसा ऐकूं आला. कोठून तरी दुरून तो आवाज येत आहे असें वाटलें. घागऱ्यांचा, घुंगुरांचा जसा नाद असावा, तसा तो होता म्हटलेंत तरी चालेल.

" काय आहे हें? " मीं विचारलें.

" मलाहि माहित नाहीं. परंतु माझ्या अंगावर भीतीनें कांटा उभा राहिला आहे बघ. येथें एक नर्तकी होती. तिला देहान्त शिक्षा सांगण्यांत आली होती. येथें तिला फांशीं देण्यांत आलें. हें कदाचित् तिचें भूत असावें. या तुरुंगांत वावरत असावें."

मीहि भ्यालें. माझेंहि अंग थरारलें. तुरुंगांत किंवा बाहेर कुठेंच भुतें पाहण्याची मला इच्छा नव्हती. मीं माझ्या मैत्रिणीला म्हटलें, " वेडी आहेस तू. उगीच कांहीं तरी वेड्यावांकड्या कल्पना करून घेऊ नकोस. तुरुंगांत का कुठे भुतें फिरत असतात? कांहीं तरीच. तुरुंगांत यायला भुतें सुद्धां राजी होणार नाहींत म्हणतील, बाकी सर्वत्र जाऊं. परंतु तुरुंग नको." परंतु माझ्या मैत्रिणीला ती गंमत वाटत नव्हती. तिनें मला गप्प बसविलें. " पुरे तुझें तत्त्वज्ञान!" ती म्हणाली. तो आवाज आतां दूर दूर जात चालला असें वाटलें. आणि शेवटीं मुळींच ऐकूं येईनासा झाला.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं आम्ही पुन्हां जाग्या झालों पुन्हां तो आवाज कानांवर आला. तो आवाज ऐकायला उत्सुक असलों, तरी भीतिहि वाटत होती. हे काय बरें असेल, याचा विचार करीत आम्ही अंथरुणांत जाग्याच असूं. परंतु आम्हांला उलगडा झाला नाहीं. तीन रात्री हा प्रकार झाला. चौथ्या रात्रीं आवाज अधिक जवळ वाटला, अधिक मोठ्यानें येत आहे असें वाटलें. निःस्तब्धपणें आम्ही कशाची तरी अपेक्षा करीत होतों. अंगावर कांटा उभा होता. इतक्यांत आम्हांला एक आकृति दिसली. काळ्या पोषाखांतील आकृति. एका बरॅकीच्या कोपऱ्याजवळ ती वळली. आणि तेथून तो घणघण झणझण आवाज ऐकूं आला. ते काय आहे याचा उलगडा होईना दोनचार क्षण गेले असतील. आणि एकदम लख्ख प्रकाश पडला डोक्यांत. ती आकृति म्हणजे ती बुढ्ढी वॉर्डर बाई होती. आम्हांला हायसें वाटलें. शिरावरचा प्रचंड बोजा दूर झाला असें वाटलें. आम्हांला खूप आनंद झाला होता. आनंदानें ओरडावें, टाळ्या पिटाव्या असें वाटत होते. दररोज रात्रीं स्त्रियांच्या सर्व तुरुंगाला वॉर्डर बाईनें फेरी घालायची असा नियम होता. परंतु ही बुढ्ढी हडळ आळशी होती. आणि राजकीय स्त्रीकैद्यांच्या बाजूला फिरकण्याची काय जरूरी असें वाटून ती आम्हांला वगळून दुसरीकडे चक्कर मारायला निघून गेली. तो घणघण झणझण आवाज तिच्या हातांतील किल्ल्यांच्या झुबक्याचा असे. तो किल्ल्यांचा लठ्ठ जुडगा तिच्या कमरेला खोंवलेला असे.

उजाडल्यावर इतर मैत्रिणींना आपली भीति नि फजिती सांगायची असें आम्हीं ठरविलें. बावळट समजून आपल्याला साऱ्या हसतील तर हंसोत. गोष्ट तर सांगायचीच. आम्हीं आमच्या गोष्टीला आरंभ केला. त्याबरोबर इतर मैत्रिणीहि एकमेकींकडे सूचक अर्थानें पाहू लागल्या. "कसल्या खुणा एकमेकींना करीत आहांत? आम्हांला खरें काय ते सांगा!" असा आम्हीं हट्ट धरला. तेव्हां त्या म्हणाल्या, " आम्हीं सर्वांनींच तो घुगुरनाद ऐकला होता. आणि भूत असावें अशाच निर्णयावर आम्हीहि आलों होतों. तुम्हांला भीति वाटेल म्हणून आम्ही तुमच्याजवळ बोललों नव्हतों."

✓ परंतु तुरुगांतील साऱ्याच गोष्टी अशा नसतात कीं ज्यांच्यावर आम्हीं हसावें. कांहीं तरुण गुन्हेगार स्त्री-कैद्यांना इतके निर्दयपणे वागविण्यांत येई, कीं आमचे रक्त तापे. तथापि आम्ही त्यांच्या बाबतींत कांहीं करू शकत नव्हतों. आम्ही असमर्थ होतों, अगतिक होतों. ती वार्डर बाई अत्यंत दुष्ट होती. साऱ्याच वॉर्डर बाया अति दुष्ट बुद्धीच्या होत्या. त्या उद्धट होत्या. राजकीय स्त्री-कैद्यांचाहि त्या अपमान करीत आमच्या-जवळ जेव्हां त्या उर्मटपणे बोलत, तेव्हा मनावर ताबा ठेवणें माठें कठिण जात असे. परंतु साध्या गोष्टीसाठीं त्या गुन्हेगार बायांना जेव्हां त्या वाटेल तशा शिव्या देत, तेव्हां तर फारच असह्य होत असे.

हळूहळू दिवस रेंगाळत चालले होते. हिंवाळ्यांतून आम्ही पार पडलों. तो हिंवाळा किती कडक असेल, तीव्र असेल, तें उत्तरेकडच्या लोकांनाच माहित. थंडगार चावरा वारा दूर ठेवायला दारें थोडींच होतीं तेथें? सारे गज. त्या गजांतून सारखा तो येई नि झोंबे. थंडीपासून ते गज कसें संरक्षण करणार? नंतर थोडे प्रसन्न दिवस आले; वासंतिक दिवसः परंतु ते पटकन् संपले. आणि प्रखर उन्हाळा सुरू झाला. कढत कढत वारे. धुळींचीं वादळें. हिंवाळा पुरवला, परंतु हा उन्हाळा नको असे वाटले. हिंवाळ्यापेक्षां उन्हाळा असह्य होता. आम्ही यांतूनहि पार पडलों. नंतर तो स्वागतार्ह पर्जन्य आला! आणि मग पुन्हां तो हिंवाळा जवळ येऊ लागला. डिसेंबरच्या शेवटीं शेवटीं मला नि माझ्या बहिणीला मुक्त करण्यांत आले. कांहीं मैत्रिणी आधींच गेल्या होत्या आणि आमच्या मागून ज्या आल्या होत्या, त्यांना सोडून आम्ही जाणार होतों. घरीं पुन्हां जाण्यांत आनंद असला, तरी यांना मागे ठेऊन जातांना, त्यांचा वियोग होतांना दुःखहि झाले.

तुरुगांतील जीवन आनंददायी नव्हते. परंतु तो एक मोलाचा अनुभव होता. समाजाला ज्यांच्यापासून धोका आहे असे मानण्यांत येते, अशा पुष्कळ गुन्हेगार स्त्री-कैद्यांशीं मीं मैत्री जोडली. त्यांच्याशीं मला मैत्री जोडतां आली याचा मला आनंद वाटे. त्या गुन्हेगार बाया समाजांत रोजच्या जीवनांत आपणांला जीं माणसें भेटतात, त्यांच्याहून श्रेष्ठतर होत्या. मानवजातीचे अधिक चांगले नमुने म्हणून त्यांच्याकडे मीं

बोट दाखविलें असते. घरीं जाणार म्हणून मला आनंद होता. परंतु हे दुर्दैवी जीव येथेंच कित्येक वर्षे खितपत राहणार; आणि सुटल्यावरहि त्यांना नसेल घरदार, नसेल आधार; नवीन जीवनाकडे त्यांना कोण घेऊन जाणार, कोण मदतीचा हात देणार? असे मनांत येऊन हृदयाला वेदना होत. तुरुंगांत जर कांहीं एखादा हस्तकौशल्याचा धंदा शिकल्या असतील, तर तोच केवळ एक बाहेर आधार. परंतु बाहेर समाज त्यांच्याकडे तिरस्कारानें बघतो. त्यांना कोणी कामावर घेत नाहीं. दोन दिडक्यांचें थोडें भांडवलहि मिळत नाहीं. इकडून तिकडे हांकलले जावें, तिकडून इकडे, सर्वत्र त्यांना थपडा बसतात. आणि वतागून, निराश होऊन त्या पुन्हा एखादा गुन्हा करितात. पोटांतील पेटलेली भूक त्यांना हे गुन्हे करायला चागते. परिस्थितिच त्यांना चोरी वगैरे करायला प्रवृत्त करते. नतर पुन्हां तुरुंग. तुरुग अशा रीतीने जन्माचाच त्यांचा सोबती होतो.

वर्तमानपत्रांतून तरुण मुलींना भयकर गुन्ह्यांबद्दल शिक्षा झाल्याचें आपण पुष्कळ वेळां वाचतों; कांहींना खुनाबद्दल शिक्षा झालेली असते; कांहींना पुनःपुन्हां दुसऱ्या कांहीं गुन्ह्यांबद्दल शिक्षा झालेली असते अशा गोष्टी होतात कशा, कशा शक्य होतात, असे मनांत येऊन आपला थरकांप होतो. परतु आपण सुखाच्या, स्वास्थ्याच्या जीवनांत सुरक्षित असतों. काळजीकथा नसते. आपल्याप्रमाणे ज्या सुखांत राहूं शकत नाहींत, ज्या दुर्दैवी असतात, अशा आपल्या दुसऱ्या भगिनींना कसकशा मोहपाशांना तोंड द्यावें लागते, त्याची आपणांस कल्पनाहि नसते. एखादा भयप्रद, अघोर गुन्हा त्या भगिनींनीं केलेला ऐकून आपण शिवशिव म्हणतो. परतु आपणहि जर तशा परिस्थितींत असतों, तर काय केले असतें? ज्या भगिनींना तशा गोष्टी करणें भाग पडले, त्या भगिनींप्रमाणे आपणहि कदाचित् केलें असते. आमचा स्त्रियांचा तुरुग हा अद्याप तरुण असणाऱ्या मुलींसाठी होता. साऱ्या गुन्हेगार स्त्रिया २१ वर्षांच्या आंतील होत्या. परतु समाजाने ज्यांना धोकेबाज म्हटले, अशा त्या मुली खरोखर का तशा होत्या! तुम्हांला ऐकून आश्चर्य वाटेल कीं त्या मुलींपैकीं बहुतेक जणी प्रेमळ, समजुतदार, भावनाक्षम अशा होत्या. करुणेने, स्नेहाने जर त्यांना आपण वागविलें, तर त्या मनमोकळेपणाने वागत, स्वतःचे हृदय उघडे करीत आणि अशा या मुलींना लांबलांब मुदतीच्या सजा देण्यांत आल्या होत्या! त्यांचा एकच अपराध कीं जें जीवन त्यांच्या नशिबीं बाहेरच्या जगांत होते, ते अनुदार होते, निर्दय होतें; आणि संतापाच्या भरांत खुनी वृत्तीच्या आहारीं त्या गेल्या अशा खुनी वृत्ति आपल्याहि रक्तांत असतात. त्या कधीं उसळतातहि; परतु सुसंस्कार झालेले असल्या मुळें त्या वृत्ति आपण दाबू शकतों. माझ्या त्या नवीन मिळालेल्या मैत्रिणी! त्यांना सोडून बाहेर जातांना मला दुःख झाले. त्यांना जीवनांतील कोणत्याच सुखाच्या गोष्टी नाहींत. आणि माझ्याजवळ त्या भरपूर होत्या. त्यांच्याजवळ जें मुळींच नाहीं, ते आपल्याजवळ भरपूर आहे असें मनांत येऊन लाज वाटली.

त्यांच्यांतील एका मुलीचा तर मला फारच लळा लागला होता. तिचे नांव बचुलि. उजळ रंगाची, भुऱ्या डोळ्यांची होती. उंची पांच फूट जेमतेम असेल. दिसायला बरी होती. तिचे केस दोन्हीं खांद्यांवर पडलेले असत. केस जरा रांकट दिसत. पुष्कळ वेळां त्यांच्या वेण्या घालून त्या सोडलेल्या असत. तिचे कपडे जाडेभरडे होते. दिसायला ती तितकी स्वच्छ नसे दिसत. परतु तिला मीं प्रथमच जेव्हां पाहिले, तेव्हां ती सुरेख दिसली. तुरुगाच्या भेसुर भिंतींजवळ बसून हातांत लांब सुया घेऊन ती विणकाम शिकत होती. किती रमणीय दिसलें ते दृश्य ! ती फार मोठी नव्हती. अगदीं तरुण होती. तिची मुद्रा निरपराध, निष्पाप दिसत होती. ही सांवळी मुलगी कां आली तुरुगांत ? काय अक्षम्य गुन्हा हिनें केला असेल बरें ? या लहान मुलीनें का कांहीं भयंकर केले ? मी आश्चर्यचकित होऊन विचार करूं लागले. शेवटीं मी तिच्याजवळ गेलें. ती एक गाणें गुणगुणत होती. उत्तर हिंदुस्थानांतील पहाडांतून ऐकूं येणाऱ्या गाण्यांप्रमाणें तें होतें ! हुरहुर लावणारें, अविस्मरणीय असें गान.

" तुझें नांव काय ? " मीं विचारलें. साशंक होऊन तिनें माझ्याकडे पाहिलें. आणि जरा भीत भीत हळूच तिनेंहि मला विचारलें, " तुम्ही कोण ! आणि तुम्हीं कशा येथें आंत आल्यात ? " " मीहि एक कैदी आहें " मीं उत्तर दिलें. ती मोठ्यानें हसली. "परतु कैदी कां ? काय केलेत ? " तिनें पुन्हां विचारलें. मी तिला सांगितलें कीं मी एक राजकीय कैदी आहे. तिनें शहाणपणें समजलें असें दाखवण्यासाठीं डोकें हलवलें. परंतु तिला का राजकीय कैदी म्हणजे काय, तें सारें नीट समजलें असेल ? कांहीं अस्पष्ट कल्पना तिला आली असेल. परतु या बाई आपल्याजवळ प्रेमानें विचारपूस करीत आहे एवढे ती नक्की समजली. तिचा संशय गेला. मी कोणी तुरुगांतील अधिकार असलेली अमलदार नाहीं, हे तिनें ओळखलें. तिनें आपलें नांव सांगितलें. लाजेनें तिनें माझ्याकडे वर पाहिलें. किती गोड हास्य होतें तिच्या मुखावर. एक सुसकारा सोडून तिनें आपलें काम पुन्हां सुरू केलें. " बचुली, तू कां येथें तुरुगांत ? " मीं विचारलें. तिच्या त्या मोठ्या अकपट डोळ्यांनीं माझ्या डोळ्यांकडे सरळ वर पाहिलें. आणि ती एवढेंच म्हणाली " खुनासाठीं. "

" खुनासाठीं ? " मीं आश्चर्यानें विचारलें. तिच्या शब्दांवर जणूं माझा विश्वास बसत नव्हता. होकारार्थीं तिनें मान हलवली. माझ्या डोळ्यांवर, माझ्या कानांवर माझा विश्वास बसेना. ही अल्लड कोवळी मुलगी कोणाचा खून कसा करूं शकेल असें मनांत येई. कांहीं तरी चूक असली पाहिजे.

" बचुली, तुला कोणाचा कां बरें खून करावा लागला ? " मीं विचारलें. पुन्हां म्हटलें, " तूं अजून कोंवळी मुलगी आहेस. आपण काय करीत आहोंत याची तुला

कल्पना आली नसेल. आणि न घडावे ते चुकून घडलें. होय ना ?" तिने सावकाश आपलें डोकें वर करून माझ्याकडे पुन्हां पाहिलें. तिच्या डोळ्यांतील ते हास्य गेले. तिच्या डोळ्यांत भीति, तिरस्कार, द्वेष यांची गर्दी झाली. तिची ती सौम्य मुद्रा क्षणांत कठोर बनली.

" अशी आहे तिची कहाणीः-- "

तिने हलक्या आवाजांत आरंभ केला. हळूच ती म्हणाली, " माझ्या नवऱ्याचा मीं खून केला. तो मला निर्दयपणें वागवी. मारमार मारी, कुलुप लावून कोंडून ठेवी. घरांत भरपूर खायला असूनहि तो मला उपाशीं ठेवी. माझा हिस्साहि आपणच खाई. एखादे वेळेस दोन घांस ठेवी. नाहीं तर स्वतः खा खा खाऊन उरलेलें बाहेर फेकी. पण मला देत नसे. त्याला संतुष्ट राखण्याची, खूष ठेवण्याची मीं पराकाष्टा करीत असे. परतु त्याचे ते खरें. मला छळायचे नवीन नवीन प्रकार तो शोधून काढी. दिसायला तो सुंदर होता. लग्नांत मी फक्त चौदा वर्षांची होतें. परंतु मला तो आवडला. देव-देवतांसमोर मीं शपथ घेतली कीं मी याची चांगली बायको होईन. त्याची सेवा करीन, त्याची आज्ञा पाळीन, त्याला जेवण करून वाढीन. आईनें मला सांगितलें होतें कीं तो सांगेल तशी वाग. त्याचे ऐकत जा. मीं तशी शपथ घेतली. परंतु लग्न होऊन दोनचार महिनेहि झाले नसतील. तो मारू लागला. दुष्ट व निर्दय बनूं लागला. आपल्याला ही भिते असे पाहण्यांत त्याल एक प्रकारचें सुख वाटे, आनंद वाटे. तो उघड म्हणेहि कीं तुला सतावण्यांत मला मजा वाटते. तुला छळतांना मला आनंद होतो. मला त्याची फार भीति वाटूं लागली. जवळ जवळ एक वर्षभर या यातना मीं सोसल्या. मल माहेरीं जाऊं दे, माझ्या आईबापांकडे जाऊ दे, म्हणून मीं परोपरीनें सांगितलें. त्याची किती मन-धरणी केली. पदर पसरला. परंतु तो पाठवीना. मी अधिकाधिक दुःखीकष्टी होऊं लागले. तो मला गांजीत होता, तरीहि त्यानें माझ्यावर प्रेम करावे, मीं त्याला आवडूं लागावे, म्हणून मी प्रयत्नांची शिकस्त करीत होते; परंतु मी कांहीं केलें तरी तो खूप होत नसे, प्रसन्न होत नसेः माझे सारे उपाय व्यर्थ झाले. कुत्र्याचें शेपूट वांकडेंच राहिलें. एके दिवशीं सकाळीं जो एक कोट अंगांत घालण्याची त्याला लहर आली, तो मीं धुवून ठेवला नव्हता. म्हणून त्यानें मला मारून मारून रक्तबंबाळ केलें. आणि मला विव्हळत टाकून स्वारी बाहेर निघून गेली. कांहीं तासांनंतर तो घरीं परत आला. नवीन पोषाखांत तो नटून आला होता. गळ्याभोंवतीं एक लांब रेशमी रुमाल चमकत होता. मीं कांहीं तरी काम करीत होतें. तो आला तेव्हां मीं मागें वळूनहि पाहिलें नाहीं. म्हणून त्यानें मला हांक मारली. तो म्हणाला, "अग, बावळट, इकडे ये. हे बघ नवीन कपडे. म्हण कीं छान आहेत म्हणनः वाचा कां बसली ? या कपड्यांत मी सुंदर नाहीं दिसत ?" मीं

उत्तर दिलें नाहीं. मी माझ्या वस्त्रांकडे पाहिले, माझ्या अंगावर चिंध्या होत्या; घाणेरडीं लक्तरें होतीं. "बोल कीं सटवे! बोलायला नाहीं का येत?" तो अंगावर ओरडला. "का माझ्या कपड्यांचा तुला हेवा वाटतो?" तो म्हणाला. तरीहि मी शांतच राहिले; मुकीच राहिले. तो माझ्याजवळ आला. माझे मनगट घट्ट धरून त्यानें माझ्या दोन थोबाटींत दिल्या. मनगट दुखलें. मीं ओरडून म्हटलें, "सोड मला, चांडाळा! काय म्हणून तुझ्या कपड्यांना मी नांवाजू? तूं दिवसभर खातोस नि मला उपाशीं ठेवतोस म्हणून! सोड; नाहीं तर अशाच एखाद्या दिवशीं मीं तुझा मुडदा पाडीन बघ. काय म्हणून तुझी स्तुति करू, काय म्हणून........?" मी आणखी पुढे बोलणार तोंच त्याने आपली काठी आणली. मला शिव्याशाप देत त्याने मला सारखे झोडप झोडप झोडपले. मी जवळजवळ बेशुद्ध होऊन पडलें. त्यानें मला दूर फेकलें. शेवटीं म्हणाला, "ये; आतां कर मला ठार करण्याचा प्रयत्न." काठी फेकून तो शांतपणें पडला. लौकरच तो घोरू लागला. कांहीं तास गेले. मीं उठण्याचा, हलण्याचा प्रयत्न केला. माझे सारें अंग गळवासारखे ठणकत होतें. मी पुन्हां पडून राहिले. एकाएकीं कोपऱ्यांत डाराडूर झोपलेला नवरा माझ्या दृष्टीस पडला. त्यानें नवीन कपडे काढून वर टांगून ठेवले होते. परतु तो रेशमी रुमाल तसाच गळ्याभोवतीं होता. मीं त्याच्याकडे पाहिलें नि मला तिटकारा आला. मनांत द्वेष भरला. एकदम मनांत आलें कीं याला ठार केलें तर सुटेन एकदांची. परतु कसे ठार करायचे? मी सभोंवतीं पाहिलें. त्याला तडाका हाणण्यासारखें कांहीं दिसेना. आणि एकाएकीं त्याच्या त्या झळकणाऱ्या लाल रेशमी रुमालाकडे डोळे गेले. कसे काय सारे झाले मला माहित नाही. परतु एका क्षणांत मी उठले आणि त्याच्या गळ्याभोवतीं असणारा तो रुमाल मी जास्तजास्त आंवळीत चालले. पहिल्या दाबासरशी तो जागा झाला; धडपड करून ओरडण्याचीहि खटपट केली. परंतु मी खांचांतून डोळे बाहेर येईपर्यंत मी रुमाल घट्ट आंवळीतच गेलें. आणि त्याची मान मोडली. तो लोळागोळा होऊन पडला. रुमालाचीं टोकें मी सोडलीं. मी दूर झाले. मीहि अगदीं गळून गेले होतें. मला ग्लानि आली. भयभीत होऊन मी मागे पडले. नवरा पुन्हां उठेल नि पुन्हां झोडपील अशा अर्धवट विचारांत मी पडले. परतु तो पुन्हां उठला नाहीं. त्याच्या शेजारीं मीहि पडून राहिले. मलाहि उठवत नव्हते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या स्थितींत आम्ही कोणाला तरी सांपडलो. माझा नवरा गतप्राण झालेला पाहून त्याने पोलिसांना वर्दी दिली. साऱ्या शेजाऱ्यांना तो इकडे तिकडे सांगत पळत होता. मी अद्याप भयमूढ होतें. मी माझ्या नवऱ्याला ठार केलें, त्याचा खून केला, यावर माझा विश्वास बसेना.

पोलिस येईपर्यंत कोणीहि माझ्याजवळ आले नाहीं. मला तुरुंगांत नेण्यांत आलें. खटला चालला नि मला या तुरुंगांत पाठवण्यांत आलें. म्हणून मी येथें आहे. फांशीं देण्या-

इतपत मी मोठी नव्हतें. आणि बायकांना होतां होईतो फांशीची शिक्षा देत नाहींत. मला जन्मठेप झाली. ही माझी हकीगत. संपलें. "

माझे डोळे सारखे बचुलीकडे होते. निःस्तब्धपणे ती अघटित घटना मीं ऐकली. तिनें जें सांगितलें, त्यावर अजूनहि माझा विश्वास बसेना. परंतु ज्या अर्थी ती तुरुंगांत होती, त्या अर्थी तें सारें खरें असलें पाहिजे.

जणूं एखादी गोष्ट सांगितल्याप्रमाणें बचुली पुन्हां आपलें काम करूं लागली, विणूं लागली. आपल्या सांगण्याचा यांच्यावर काय परिणाम होतो तें जाणून घेण्याची तिला जिज्ञासा नव्हती. ती साधीभोळी अकपट मुलगी होती. दैवानें असें लिहूनच ठेवलें होतें, त्याला कोण काय करणार, या दृष्टीनेंच ती त्या घटनेकडे पाहत होती. तुरुंग नशिबीं मग यायचाच, तो कसा टाळतां येईल? उगीच कां मनाला लावून घ्यायचें, अशा वृत्तीनें ती त्या साऱ्या गोष्टींकडे पाहत होती. तुरुंगांतील जीवनाचा मुकाट्यानें शांतपणें तिनें स्वीकार केला होता. शांतपणें त्या जीवनाला ती शरण गेली होती.

खालीं मान घालून बसलेल्या बचुलीकडे मीं पाहिलें नि माझें हृदय तिच्यासाठीं तळमळलें. ती लहान होती; अद्याप अपरिपक्व होती; गुन्हेगार अशी ती दिसेचना. दैवानें इतक्या निर्दयतेनें तिला कां बरें वागवलें? इतकें निष्ठुर कसें तें नशीब? आणि या बचुलीचें पुढें काय होणार? तिचें जीवन कसें होणार? तिच्या नशिबांत आणखी काय काय आहे? असे खटले निराळ्या दृष्टीनें नकोत का चालवायला? अशा गुन्ह्यांना निराळ्या प्रकारची शिक्षा नको का? जन्मठेप म्हणजे थट्टा नव्हे. त्या तुरुंगाच्या भिंतीं-आड अधिक नाहीं, तरी वीस वर्षें काढायचीं! बाहेरच्या जगाचें कांहीं कळायचें नाहीं; सभोवतीं ते इतर गुन्हेगार कैदी; कानांवर सदैव शिव्याशाप, अभद्र, गलिच्छ बोलणीं; ईश्वराच्या सृष्टींतील अति नीच अशा माणसांचें नित्य दर्शन; आणि बाहेर बारा वर्षांतही जी लबाडी आपण शिकणार नाहीं, तिचें येथें नित्य शिक्षण! बचुली केवळ पंधरा वर्षांची पोर होती. तुरुंगांतून बाहेर पडेल, तेव्हां ती पस्तीस वर्षांची असेल. सारें तारुण्य तुरुंगांत दडवल्यावर, ती जशी आज गोड आहे, पवित्र आहे, तशीच राहू शकेल का? का ती सराईत गुन्हेगार बनेल? सर्वांनीं परित्यक्त अशी काळा कैदी बनेल? कोठें आधार नाहीं, सहानुभूति नाहीं, असें पाहून ती का पापाकडे वळेल? वाईट गोष्टी करील? आणि तिचीं पाउलें पुन्हा निश्चितपणें अपरिहार्य म्हणून का तुरुंगाकडेच वळतील?

माझ्या विचारांचा गोंधळ उडाला. मीं बचुलीच्या डोक्यावर प्रेमानें थोपटलें आणि म्हटलें, " बचुली, मी आशा करतें, कीं मी तुला पुन्हां भेटेन. तूं येथें नीट काम केलें पाहिजे. भरपूर माफी मिळव हो. म्हणजे तुरुंगांतून लौकर बाहेर येशील. खरें ना! " तिच्या तोंडावर प्रसन्न हास्य चमकलें. ती म्हणाली, " हो, ते सारे सांगतात, कीं

मीं जर त्रास दिला नाहीं, नीट काम केलें, तर पुरीं वीस वर्षे कांहीं काढावीं लागणार नाहींत, मी लौकर सुटेन. मी आईबापांकडे माहेरीं जाईन. किती छान होईल ! माझें घर तिकडे उंच पहाडांत आहे. ते पहाड मला किती आवडतात ! " खिन्नपणें मी निघालें. तिचें धैर्य, तिचा आशावाद कायम राहावा म्हणून मी किती इच्छित होते. तुरुंगांत जीं कित्येक कंटाळवाणीं वर्षे तिला काढायचीं होतीं, त्या दीर्घ मुदतींत तिचे हे धैर्य कधीं न सरो, तिचा आशावाद कधींहि न भंगो, अशी आशा करीत अति दुःखानें मी निघालें. ही कोंवळी अल्लड बचुली, ती गिरिबाला होती. पहाडांतील वृक्षराजी, फुलें, पाखरें, ताजी स्वतंत्र हवा यांची तिला संवय; खालच्या मैदानांतील हा तुरुंग, येथला कडक उन्हाळा, हें सारें तिला कसें सहन होईल ? राहून राहून या शंका, हे विचार माझ्या मनाला त्रास देत. परंतु ती समाधानी होती. ' ठेविलें अनन्ते तैसेंचि रहावें ' या श्रद्धेनें ती जगत होती. तिच्या त्या वृत्तीचें मला कौतुक केल्याशिवाय राहवत नाहीं.

मीं पुन्हां एकदां वळून पाहिलें. आपल्या कामांत ती पूर्णपणें गढून गेली होती. बचुलीबरोबर त्या तुरुंगांत मीं एक वर्ष दवडलें. बाहेरच्या जगासाठीं मी वारंवार अधीर होत असे. परंतु जायचा दिवस आला नि मला वाईट वाटलें. आतां बाहेर बचुली कोठली ? तेजस्वी, पाणीदार डोळ्यांची, आपल्या बोलण्यानें, पहाडी गीतांनीं माझें मन रिझवणारी, वेळ कसा गेला ते समजूं न देणारी प्रेमळ बचुली ! बाहेर बचुली नसेल माझा वेळ दवडायला: तिला सोडून जाण्याच्या कल्पनेनें माझें हृदय भरून आले. मला कांहीं सुचेना, तुरुंगांतील घरामधला माझा शेवटचा दिवस उजाडला; मी माझ्या सहकारी मैत्रिणींना जाऊन भेटलें: सर्वांचा निरोप घेतला. इतक्यांत कोणी तरी धांवत येऊन माझ्या गळ्यांत गळा घालून मिठी मारली. ती बचुली होती. ती मुकेपणानें माझ्याजवळ उभी राहिली. तिचे ते टपोरे डोळे ! त्यांतून टपटप पाणी गळत होते. मीं तिला पोटाशीं धरलें. तिचे डोळे माझ्या डोळ्यांकडे करून मीं तिला म्हटलें, " हे काय, अशी रडूं नको. बचुली, धीर धर. शूर झालें पाहिजे. प्रयत्न कर. सुखी रहा. तूं जेव्हां बाहेर येशील, तेव्हां मला अवश्य लिही. तुला माझ्याकडे यायचे असेल, तर बेशक ये. संकोच नको करूस. " बचुली म्हणाली, " त्या बाहेरच्या मोठ्या जगांत तुम्ही मला विसरणार नाहीं ना ? कारण येथलीं सारींजणें सांगतात कीं बाहेरच्या मोठ्या जगांत गेल्यावर आम्हां कैद्यांची-गुन्हेगार कैद्यांची आठवण करणे तुम्हांला आवडत नाहीं. मी तिचे डोकें थोपटले नि तिला आश्वासन दिले, कीं असें होणार नाहीं. आणि जरी त्या गोष्टीला इतकीं वर्षे झाली असलीं, तरी बचुलीची आठवण अगदी ताजी आहे. तिची स्मृति अशीच निरंतर राहील.

माझ्याबरोबर आणखीहि कांही राजकीय बायका सुटल्या होत्या. त्यांच्याबरोबर मी निघाले. तुरुगांतील अंगण ओलांडून तुरुगाच्या दारांतून मी बाहेर पडलें. बचुली नि

तिच्यासारख्या दुसऱ्याहि तरुण मुली यांना सारें जीवन तुरुगांत काढावे लागू नये, कोणाच्या तरी कृपेनें त्या साऱ्या आपापल्या घरीं पुन्हां जाव्यात, सुखाचे, शांतीचें जीवन त्यांना पुन्हां लाभावे, म्हणून मीं प्रार्थना केली.

तो तुरुग तेथें उभा होता. त्या भीषण भयसूचक भिंती निष्ठुरपणें उभ्या होत्या. एक वर्षभर तेथें माझें घर होतें. त्या भिंतींनीं किती तरी लहान मुलींना तेथें कोंडून ठेवलें होतें. मी त्या तुरुंगाकडे शेवटचा दृष्टिक्षेप करण्यासाठीं पुन्हां एकदां वळले. ते मोठें फाटक आस्ते बद होत होतें. आम्हांला निरोप देण्यासाठीं अंगणांत आलेल्या त्या बाया अद्याप मला दिसत होत्या; बद होणाऱ्या दरवाजाच्या फटींतून दिसत होत्या. मीं हात हलवला नि पटकन् तोंड वळवलें. माझ्याबरोबरच्या राजद्वारी मैत्रिणींना माझ्या डोळ्यांतील अश्रु दिसू नयेत, म्हणून मीं तोंड फिरवलें. परंतु त्यांनीं माझ्या डोळ्यांतील पाणी शेवटीं पाहिलेंच. " तुरुग सोडतांना हृदयभग होत आहे कीं काय ?" त्यांनीं हसून विचारलें. माझे अश्रु कोणासाठीं होते याची त्यांना काय कल्पना ? मी नि माझी बहीण, आम्हीं दोघींनीं त्या गुन्हेगार मुलींच्या जीवनांत शिरण्याची जशी खटपट केली, त्यांचीं जीवनें समजून घ्यायला जशा शिकलों, तसें त्यांनीं थोडेंच केलें होतें ? त्यांच्यापासून त्या दूर राहिल्या होत्या, अलग रहिल्या होत्या. आणि म्हणून त्यांच्यासाठीं आमच्या ज्या भावना होत्या, त्या त्या समजू शकत नव्हत्या. मी तुरुग सोडून निघाले म्हणून ते अश्रु नव्हते. कारण आमच्यापैकीं कुणालाहि तुरुग म्हणजे कांहीं पुष्पशय्या, गुलाबांची गादी वाटत नव्हती. कांहीं कोवळ्या असहाय मुलींना मी सोडून जात होतें, म्हणून ते अश्रु होते. अज्ञानामुळे, अति दुःखानें वेड्यावल्यामुळें जे गुन्हे हातून झाले, त्यांच्यासाठीं त्यांना त्या लांब लांब मुदतीच्या शिक्षा देण्यांत आल्या होत्या. जर त्या मुलींच्या नशिबीं दारिद्र्य, उपेक्षा, निर्दयता, क्रौर्य हीं आलीं नसतीं, तर जे गुन्हे केवळ गैरसमजुतीमुळें, सभोंवतालच्या क्रूरतेमुळं त्यांच्या हातून घडले, परिस्थितीनें जे गुन्हे त्यांच्याकडून करवले, ते त्यांच्या हातून घडते ना. अशा त्या लहान जीवांसाठीं माझे अश्रु होते. त्या मुली किती अकपट ! त्यांची वृत्ति मुलासारखी ! त्यांचें हृदय सहृदय नि प्रेमळ ! त्या अभागी मुलींसाठीं माझें हृदय तडफडत होते, त्यांना सोडून जायला तें तयार नव्हतें. प्रिय मडळींकडे माझ्या घरीं मी जात होतें. माझ्या स्वागतासाठीं सारीं उभीं होतीं. परतु यांचे काय होणार ? मला विचारच करवेना.

" सकाळचें पक्ष्यांचें गाणें, रात्रीच्या ताऱ्यांचा प्रकाश, यांचीं तुला आनंद व्हावा म्हणून मी भूषणें करीन, खेळणीं करीन, वनांतील हिरवे दिवस नि सागरावरील निळे दिवस यांचा मी तुला भला शोभेसा बंगला बांधीन."

—आर्. एल्. स्टिव्हन्सन

आम्हांला लखनौ येथे नाहीं सोडण्यांत आलें. जेलमधील पोलिस बाई आम्हांला अलाहाबादला घेऊन आली. तेथें आम्हांला मुक्त करण्यांत आलें. वर्षानें आम्ही घरीं आलों होतों. घरांत कोणी नव्हतें. कमला कलकत्त्यास आजारी होती. आई तिच्या जवळच होती. आमच्या सुटकेची बातमी कोणालाच नव्हती. आनंदभवनला कुलुप होतें. परंतु विजेप्रमाणें बातमी पसरली. स्टेशनवरून आम्ही येत असतां कोणी तरी आम्हांला पाहिलें असावें. एकदोन तासांतच आप्तेष्ट-मित्रांनीं घर भरून गेलें. तुरुंगातील जीवनाविषयीं अनेक प्रश्न विचारीत होते. तुरुंगांतील त्या शांत जीवनानंतर एकदम बाहेरचें हें विशाल जीवन पाहून आम्हीं थोड्या दिपून गेलों होतों. एकदम इतक्या लोकांची गर्दी, ते कुशल प्रश्न! आम्हांला दडपून गेल्यासारखें, गुदमरल्यासारखें झालें.

अलाहाबादला थोडे दिवस राहून स्वरूप नि मी कलकत्त्याला गेलों. कमला बहुतेक बरी झाली होती. घरी परत जायची तिला इच्छा होती. तेथें एक आठवडाभर राहून आम्हीं सारीं पुन्हां घरीं आलों. अटक होण्यापूर्वी स्वरूपनें आपल्या तीन मुलींना

पुण्याच्या एका वसतिगृहात्मक शाळेंत ठेवले होते. सर्वांत लहान मुलगी तर केवळ तीन वर्षांची होती. बरेच दिवसांत मुलांना न पाहिल्यामुळें स्वरूप पुण्याला जायला उत्सुक होती. कांहीं मित्रांची ती शाळा होती. इंदिराहि त्याच वसतिगृहांत राहत होती. तुरुंगांत असतांना मला हिंवताप लागला होता. माझी प्रकृतिहि बरीच खालावली होती. जरा थारेपालट, हवाफेर झाला तर हिला बरें वाटेल, असें आईच्या मनांत आलें. म्हणून ती मला म्हणाली, "तूहि जा स्वरूपबरोबर पुण्यामुंबईला." आईची सूचना मीं आनंदानें मंजूर केली. आम्ही आधीं सरळ पुण्याला गेलों. तेथें थोडे दिवस राहिल्यावर मुलांना बरोबर घेऊन आम्ही मुंबईला आलों. पुण्यांत असतांना येरवड्याला गांधीजींना बरेच वेळां आम्ही भेटलों. गांधीजी मोठ्या प्रेमानें आमचें स्वागत करीत. कधीं उदास वाटलें, निराश वाटलें, तर गांधीजींच्या जवळ जरा जाऊन बसलें, म्हणजे बरें वाटे.

मी, माझी बहीण, तिचीं मुलें—सारींजणं मुंबईंत एक आठवडाभर होतों. राजाला मी प्रथम भेटलें ती या आठवड्यांत. कोठे तरी मेजवानी होती. त्या खोलींत मी शिरतांच तेथें राजा दिसला. तेथें जमलेल्या सर्वांपेक्षां तो निराळा दिसत होता. तो उमटून पडत होता. तो त्यांच्यांत तितकासा मिसळला नाहीं. इतरांपेक्षां आपण जरा श्रेष्ठ आहोंत, असें का त्याला वाटत होतें? त्या अलग राहण्यांत अनासक्ति होती, कीं थोडा अहंकार होता? ते कांहीं असो. माझी जिज्ञासा जागी झाली; मला कुतूहल वाटलें. तेथे जमलेल्या मित्र-मंडळींपैकीं एक असूनहि तो त्यांच्यापैकीं जणुं नव्हता. तो दूर बसला होता कोणाशीं बोलत नव्हता. एक सुंदर चिलीम त्याच्या तोंडांत होती. आम्हां दोघांची ओळख करून देण्यांत आली. परंतु आम्ही एकमेकांशीं एक शब्दहि बोललो नाहीं. जेव्हां मी प्रथमच कधीं कुणाला भेटत असतें, तेव्हां त्यांचे हात मी पाहत असतें. त्यांच्या हातांकडे माझे डोळे जातात. जणुं ते हात माझ्याजवळ बोलतात; त्या माणसाच्या स्वभावाची ओळख करून देतात, स्वभावाचें अचुक दर्शन घडवतात; थोडी कल्पना देतात. म्हणून राजाच्या हातांकडे माझे डोळे गेले. ते हात सुंदर होते, भावग्राही होते. अति शान्त बसणाऱ्या त्या व्यक्तीचे ते हात माझ्याजवळ अपार बोलले. जणुं रामायण महाभारत त्यानीं मला सांगितलें दुसरी भेट एका वनभोजनाच्या वेळीं झाली. राजा नि जुहूचा एक मित्र यांनीं ते वनभोजन ठरविलें होतें. या वेळेस मात्र आम्हीं पुष्कळ बोललों. बोलणें पुस्तकांविषयीं होतें. कम्युनिझमवरहि बोललों. माझ्या भावाच्या ग्रंथालयांतून कांहीं पुस्तकें पाठवण्याचें मीं राजाला कबूल केलें. आमच्या मैत्रीचा हा असा आरंभ झाला. एकमेकांशीं आम्हीं पत्रव्यवहार करूं लागलो.

मे महिन्यांत स्वरूपबरोबर मी मसुरीला गेलें. तेथे एकदोन महिने राहून ऑगस्ट महिन्यांत मीं अहमदाबादला जायचें नक्की केलें. तेथे भारती साराभाई म्हणून माझी मैत्रीण होती. ती लौकरच ऑक्सफर्डला जायची होती. तिच्याबरोबर थोडे दिवस

राहण्यासाठीं म्हणून मी अहमदाबादला जाणार होतें. मीं माझे बेत राजाला कळविले. अहमदाबाद किंवा मुबई येथें आपली भेट होईल अशी आशा मीं पत्रांत व्यक्त केली होती. त्यानें लिहिलें, "अहमदाबादला दिल्लीकडून न जातां मुंबईला येऊन इकडून गेलेलें बरें." मीं तसें करण्याचें कबूल केलें. आमच्या कुटुंबाचा एक जुना स्नेही मुंबईत त्या वेळेस होता. कर्मधर्मसंयोगानें माझ्या येण्याची वार्ता त्याला कळली. दैवाची लीला अगम्य असते. स्टेशनवर मला भेटण्यासाठीं राजाहि आला होता: आणि ते स्नेहीहि आले होते. परंतु आपण दोघे एकाच गोष्टीसाठीं आलों आहोत, याची त्यांना जाणीव नव्हती. त्या मधुर अज्ञानांत दोघे होते. मी दोघांना भेटलें. ते स्नेही राजाला तेथे पाहून प्रसन्न दिसले नाहींत. मला चमत्कारिक वाटलें. मी जरा गोंधळलें. मीं त्या दोघांचा एकमेकांशीं परिचय करून दिला. जरी तो मित्र साशंकतेनें पाहत होता, तरी त्यांची ओळख करून दिली. त्या स्नेह्यानें प्रश्न विचारले नाहींत.

त्या दिवसापासून मी माझा बराचसा वेळ राजाबरोबर दवडूं लागलें. आम्ही सिनेमाला जात असूं. मोटरींत बसून लांब फिरायला जात असूं. परंतु राजा अद्याप दूरीभावानें, पृथक् भावानेंच वागत होता. हा ज्या अर्थी रोज माझ्याबरोबर इतका वेळ दवडतो, त्या अर्थी मी त्याला आवडत असले पाहिजे, हे मीं ओळखलें होतें. परंतु त्यानें आपल्या भावनांचा यत्किंचितहि सुगावा लागूं दिला नाहीं. त्यानें कांहींच भावनिदर्शन न केल्यामुळें त्याला माझ्याविषयीं कांहीं वाटतें कीं नाहीं, हे मी तरी नक्की कशावरून समजणार ? परंतु मला तो आवडला याचें हेंहि एक कारण होतें. तो कांहींच कळूं देईना आणि म्हणून तो आवडला.

माझ्या बाबतींत सर्वत्र दाक्षिण्य दाखविलें जात असे. आपल्या बाबतींत दाखविलें जाणारें हें दाक्षिण्य अनुभवण्याची मला आतां सवय झाली होती. लोकांना मी आवडणारच असें जणूं मी गृहीत धरून चालत असे. माझा तो हक्क आहे म्हणून नव्हे, तर न आवडण्यासारखें माझ्यांत कांहीं नाहीं असें मला वाटे. राजाच्या उदासीनतेनें, त्यानें दाखविलेल्या या उपेक्षेने आरंभीं तरी मला दुखावल्यासारखें वाटलें. माझा अहंकार जणूं दुखवला गेला. आणि स्वतःभोंवतीं ज्या भिंती राजा बांधूं पाहत होता, त्या जमीनदोस्त करण्याचें मीं ठरविलें. प्रतिदिवशीं किती तरी तास आम्ही एकत्र असूं. आम्हीं सारखीं बोलत असूं. त्या बोलण्याला अंत नसे. आणि तरीहि त्या बोलण्याचा कटाळा येत नसे.

एके दिवशीं सायंकाळीं अहमदाबादला जायला मी निघणार होतें. राजा सहज म्हणाला "आपण लग्न कधीं लावायचें ?" साधेपणाने एक साधा प्रश्न विचारण्यांत आला. ज्यानें हा प्रश्न विचारला, त्याचें हृदयहि बालकाच्या हृदयाप्रमाणें साधें सरळ होतें; निर्मळ निष्पाप होतें. पवित्र होतें, विशुद्ध होतें.

तो प्रश्न ऐकून मी जरा गोंधळले. परंतु लग्न ठरविण्याची ती अपूर्व रीति पाहून माझ्या अंगावर आनंदाचे रोमांच फुलले. आठवडाभर आम्ही एकमेकांस पाहत होतों. खंडीभर बोलत होतों. तासन् तास एकमेकांच्या संगतींत दवडीत होतों. परंतु कोणीहि प्रेमाचा शब्द उच्चारला नव्हता. मला माहित होतें, कीं मी त्याला आवडतें. परंतु त्याचें माझ्यावर प्रेम असेल, ही मला कल्पना नव्हती; तसा तर्क मीं केला नाहीं. माझ्या बाबतींत म्हणायचें, म्हणजे जसजसें मी त्याला अधिक पाहीं, तसतसा तो मला अधिक आवडे. मला माहित असणाऱ्या माणसांहून राजा अगदीं निराळा होता. परंतु माझें त्याच्यावर प्रेम होतें कीं नाहीं, याची मला खात्री नव्हती. त्याला मी तसें सांगितलेंहि, परंतु शान्त नि निर्विकार अशा रीतीनें तो मला म्हणाला "तुला माहित नसलें, तरी तुझें माझ्यावर प्रेम आहे. होय म्हण." मीं 'हो' म्हटलें नाहीं. "अहमदाबादला गेल्यावर मी सारें कळवीन." असें मीं त्याला सांगितलें.

एक आठवडाभर राजापासून मी दूर होतें. त्याचें रोज पत्र येई. तीं पत्रें अति सुंदर होतीं. तो सारखा तगादा लावीत होता. होय म्हण, म्हणत होता. त्याच्यापासून दूर गेल्यावर मला कळलें, कीं तो किती हृदयाजवळ आहे. त्याचें मला किती वेड लागलें आहे, तें तेव्हां ध्यानांत आलें. त्याच्याकडे जायला मी अधीर झालें होतें. अहमदाबादची मुदत कमी करावी लागणार अशी भीति वाटली. येथला मुक्काम आंखडता घ्यावा लागणार असें वाटलें आणि तसेंच झालें. मुंबईला गेलेंच पाहिजे असें वाटलें.

मी मुंबईला परत आलें. राजाजवळ लग्नाचें कबूल केलें. मी स्वप्नसृष्टींत होतें. परंतु एके दिवशीं सकाळीं प्रत्यक्ष जगांत मी पुन्हां आलें. कोणी तरी धक्का मारून, आरोळी ठोकून जणूं मला स्वप्नसृष्टींतून खालीं आणलें. वर्तमानपत्रांत वाचलें कीं आई आजारी आहे. एकाएकी ती आजारी पडली. मीं राजाला फोनवरून कळवलें कीं "आजच्या रात्रीनें अलाहाबादला जायचें मीं नक्की केलें आहे." जड हृदयानें, दुःखी हृदयानें मीं त्याचा निरोप घेतला. केव्हां कोठें पुन्हां भेटूं त्याची कल्पना नव्हती.

मी अलाहाबादला पोंचलें. उपचारासाठीं आईला लखनौला नेण्यांत आलें होतें. म्हणून मी तिकडे गेलें.

राजाविषयीं माझ्या बहिणीजवळ फक्त मीं बोललें होतें. आतां परत आल्यावर मीं सारें सांगितलें. त्याच्याजवळ लग्न लावायचें मीं वचन दिलें आहे म्हणूनहि सांगितलें. आई आजारी होती. जवाहर तुरुंगांत होता. म्हणून त्याविषयीं बोलूं नकोस असें मीं बहिणीला म्हटलें. तें रहस्य आम्हां दोघींतच आम्हीं ठेवलें.

आईची प्रकृति चिंताजनक होती, दिवसरात्र आम्ही तिच्याजवळ बसून होतों. आम्हांला कांहीं सुचत नव्हतें. जवाहरची दोन वर्षांची सजा लौकरच संपणार होती.

परंतु आईची स्थिति अव्यवस्थ असल्यामुळें शिक्षा संपण्यापूर्वी दोन तीन दिवस आधींच त्याची सुटका झाली. कांहीं दिवसांनीं आईची प्रकृतिही हळुहळू सुधारली.

तेव्हां मग मीं स्वरूपाला राजाविषयीं जवाहरला सारें सांगून टाक असे सुचविलें. आजपर्यंत स्वेच्छेप्रमाणे वागण्याचें स्वातंत्र्य मला मिळाले होते. त्यामुळें घरच्या मंडळीचा विचार घेण्यापूर्वींच मीं माझ्या भावि पतीची निवड केली, यांत मला अस्वाभाविक असें कांहीं वाटले नाहीं. आई, भाऊ, बहीण यांच्या इच्छेच्या विरुद्ध जावें, त्यांच्याविरुद्ध बंड करावें, असें स्वप्नांतही माझ्या मनांत कधीं आले नाहीं. परंतु कांहीं सबळ कारण असल्याशिवाय ते माझ्या विरुद्ध जाणार नाहींत, असमजुतदारपणानें वागणार नाहींत, हे मला ठाऊक होतें. राजाविषयीं त्यांना कांहींच माहित नव्हते. परंतु त्यांची संमति मिळाल्याशिवाय राहणार नाहीं; कारण माझे सुखच त्यांच्या मनांत प्रथम असणार, आणि राजाहि खात्रीनें त्यांना आवडेल अशी मला खात्री होती एकाच गोष्टीची मला भीति वाटत होती. तुमचा थोड्या दिवसांचा तर परिचय, एवढ्यांत काय कोणाचा स्वभाव कळणार, असे जर त्यांनी म्हटले तर ? परिचय थोड्या दिवसांचा असला, म्हणून काय झालें ? बऱ्याच दिवसांच्या प्रेमाराधनेनें एकमेकांचा स्वभाव एकमेकांना अधिक चांगला कळतो, असें माझे मत नव्हते. मला तसें वाटले नाहीं.

जेव्हां जवाहर राजाविषयीं माझ्याजवळ बोलला, तेव्हां जरा विशेष रीतीनें तो बोलला. त्याच्या डोळ्यांत जरा हास्य होतें. डोळे मिचकावित तो मला म्हणाला, "तुझ्या मनांत लग्नाचे विचार चालले आहेत असें एकलें. होय ना ? चांगले आहे. परंतु हा तरुण कोण ? थोडा प्रकाश तर पाडशील ? थोडी माहिती देशील मला ?" मी गोंधळले. परंतु म्हटले, "हो; न द्यायला काय झाले ?" त्यानें पहिला प्रश्न केला, कीं राजा करतो काय ? मीं सांगितलें कीं तो बॅरिस्टर आहे. नुकताच त्यानें धंदा सुरू केला आहे. नंतर जवाहरने विचारलें, की राजाच्या घरी कोण कोण मंडळी आहे ? मीं सांगितले कीं मला कांहींच माहिती नाहीं. त्यानें पुन्हां विचारलें त्याला भाऊ, बहिणी किती ? मीं नकारच दिला. जवाहर संतापू लागला, चिडणार असं दिसू लागलें. मीहि कांपू लागलें. हे साधे प्रश्न आपण राजाला कसे विचारले नाहींत असें मनांत येऊन मीं स्वतःलाच शिव्याशाप दिले जवाहरने प्रश्नांची सरबत्ती सुरू केली. आक्स्फर्ड येथे तो कोणत्या कॉलेजांत होता ? तेथें तो आणखी काय काय करी ? असे दहावीस प्रश्न विचारण्यांत आले. परंतु एकाहि प्रश्नाचे उत्तर मी देऊं शकत नव्हते. मला कांहीं माहितीच नव्हती. शेवटीं जवाहरने विचारले, "तूं राजाला 'राजा' म्हणून कां संबोधितेस ? जी. पी. अशी तो सही करतो. जी. पी. म्हणजे काय ?" राजानें जी. पी. म्हणजे काय ते सांगितले होतें. परंतु मला कांहींच आठवेना. भीतभीत मीं भावाला म्हटले "मला कांहीं आठवत नाहीं." चिडून जवाहर म्हणाला, "सारा

मूर्खपणा आहे." असे म्हणून ल्लींतून तो निघून गेला. खोलींत मी एकटीच होतें. फजित होऊन दुःखी अशी तेथे बसल होते.

या साऱ्या गोष्टींची माहिती असणें जरूर होतें हें माझ्या ध्यानांत आले. माझा सारा बावळटपणा, धांद्रटपणा असें वाटलें. परंतु मी तरी काय करणार? राजाजवळ जितके दिवस मी होतें, तितके दिवस त्यानेंच माझें जीवन भरलें होतें. मी त्याच्यांतच इतकी मिळून गेले होते कीं कुटुंबाविषयीं किंवा स्वतः त्याच्याविषयीं कांहीं विचारण्याचें मला सुचलेंच नाहीं. किती तरी गोष्टींविषयीं आम्ही बोललों, चर्चा केल्या. परंतु आम्ही स्वतःविषयींचें एकमेकांना कांहीं विचारलें नाहीं. आम्हीं आमच्याविषयीं अवाक्षर काढलें नाहीं. मला राजा आवडला. इतर गोष्टींची काय जरूरी?

त्या रात्रीं राजाला मीं पत्र लिहिलें. आवश्यक ती माहिती मीं विचारली होती. माझें पत्र वाचून तोहि जरा चिडला असावा. परंतु त्याने पुढील पत्र पाठविलें:

## माझीं प्रशस्तिपत्रें

नांव : गुणोत्तम हाथीसिंग

शाळा : राष्ट्रीय-शाळा नि गुजरात विद्यापीठ

कॉलेज : सेंट कॅथेराइन, ऑक्स्फर्ड

बॅरिस्टरीची खाणावळ : लिंकन

पदवी : राज्यशास्त्र, अर्थशास्त्र नि तत्त्वज्ञान यांतील बी. ए.

क्लब : कोणत्याहि क्लबांत गेलों नाहीं, जाण्याची इच्छा नाहीं.

धंदा : बॅरिस्टर–ॲट–लॉ. धंदा नीट करायची इच्छा आहे. त्यांत सारें लक्ष घालण्याची इच्छा आहे. मी जें जें करतों, तें असेच करतों. त्यांत सारा आत्मा ओततों. परंतु दुसऱ्या एखाद्या गोष्टीसाठीं मी धंदा सोडणार नाहीं. कदाचित् एक दोन वर्षांतच राजकारणासाठीं सोडीनही.

खेळ : कित्येक वर्षांपूर्वी क्रिकेट खेळलों होतों. हल्लीं कोणताच खेळ खेळत नाहीं.

स्वभावः अहंकारी नि स्वार्थी समजला जातो.

लग्नाविषयींचीं मतें: जिला स्वातंत्र्य आहे, जी तें राखूं इच्छिते, तिला पूर्ण स्वातंत्र्य द्यावें असें मानणारा.

ओळखीः नाहींत.

उज्ज्वल भावितव्याच्या अपेक्षाः नाहींत.

आर्थिक सुस्थिति : बरी आहे; बेताच्या सुखी जीवनांत राहूं शकेन; परंतु फार ऐषआरामांत, नबाबी थाटांत मुळींच राहतां येणार नाहीं. शक्य नाहीं.

शेवटीं: असा हा अर्ज आहे; कदाचित् तो धिटाईचा वाटेल.
कुमारी कृष्णा नेहरू यांनीं वरील गृहस्थाशीं १९३३ च्या ऑक्टोबर-मध्यें लग्न लावायला संमति द्यावी, म्हणून हा अर्ज आहे. "

अशी ही राजाची चिठी आली. मला मोठी मौज वाटली. गमत वाटली. परतु " स्वतःविषयींची सविस्तर माहिती" लिहून पाठवण्याविषयीं राजाला मीं जें पत्र पाठवलें होतें, त्यामुळें तो किती चिडला होता, रागावला होता तें यावरून दिसतें.

आईला जरा बरें वाटल्यावर जवाहर मुंबईला गेला नि राजाला भेटला. तो गांधीजींनाहि भेटला. राजाशीं लग्न लावण्याची माझी इच्छा आहे असें त्यानें त्यांना सांगितलें. गांधीजींना राजाच्या कुटुंबाची माहिती होती; चांगलीच माहिती होती. ते म्हणाले, "राजा मला भेटला तर बरें होईल." राजाच्या घराण्याची जरी गांधीजींना चांगली माहिती होती, तरी राजाविषयीं तितकीशी माहिती नव्हती. म्हणून राजा गांधीजींना भेटायला गेला. गांधीजींनीं जी उलटतपासणी केली, तीमुळें राजाला तितकेंसे बरें वाटलें नाहीं; तरीहि राजानें त्या तपासणीला तोंड दिलें. तो डगमगला नाहीं. ( मी मी म्हणणारे शूरहि गांधीजींच्या त्या उलट तपासणीसमोर टिकले नसते, असें मला खात्रीनें वाटतें. ) जवाहरनें राजाला लखनौला यायचें आमंत्रण दिलें. आईला, कुटुंबांतील इतर मंडळींना राजानें भेटावें म्हणून तें आमंत्रण होतें. त्यानें तें स्वीकारलें. सुमारें एका पंधरवड्यानंतर तो आला. आई अद्याप दवाखान्यांतच होती. ती फारच अशक्त झाली होती. अद्याप धोका होता. राजाला पाहतांक्षणींच तिला तो आवडला. आणि राजालाहि आई आवडली. आम्ही शक्य तितक्या लौकर विवाहबद्ध व्हावें अशी आतां आईची इच्छा होती. परंतु आई चांगली बरी झाल्याशिवाय लग्न लावायला मी तयार नव्हतें. परतु ती ऐकेना. " आतां मुळींच नको उशीर. शुभस्य शीघ्रम् " असें तिचें पुनःपुन्हा सांगणें आपण आतां फार दिवस वांचणार नाहीं असें तिला वाटत होतें. आणि तसें कांहीं होण्यापूर्वीच आपल्या मुलीचा सुखाचा संसार सुरू झालेला पाहण्याची तिला इच्छा असणें स्वाभाविक होतें.

आनंदभवनांत १९३३ च्या ऑक्टोबरच्या २० तारखेस राजा नि मी विवाहबद्ध झालों. वैदिक पद्धतीनें विवाह झाला. तो साधा वैदिक विधि अर्ध्या तासांत संपला. स्वरूपच्या नि माझ्या लग्नांत केवढा फरक ! तिचा लग्नसोहळा आठ दिवस, अधिकच चालला होता. परंतु माझ्या लग्नाच्या वेळेस सारा सुटसुटीत प्रकार होता. आमचे कांहीं आप्तेष्ट-मित्र, राजाचे भाऊ, त्याची बहीण, नि चुलते कस्तुरभाई लालभाई, अशी मंडळी उपस्थित होती. माझी आई अंथरुणावरच होती. नि राजाची आईहि तिकडे अत्यवस्थ होती. म्हणून अगदीं साध्या रीतीनें, गाजावाजा फारसा न करतां लग्नसमारंभ उरकण्याचें आम्हीं ठरविलें होतें.

बापू विवाहासाठीं अलाहाबादला येऊ शकत नव्हते. माझें लग्न वर्ध्यालाच व्हावें असें त्यांनीं सुचविलें होतें. बापूंचे आशीर्वाद मिळावे म्हणून मी अधीर होतें; परंतु वर्ध्याला जायला तितकीशी मी तयार नव्हतें. माझ्या घराशिवाय इतर कुठें माझें लग्न लावण्याचा विचार मला सहन होत नव्हता. ज्या घरांत मी लहानाची मोठी झालें, जें घर बालपणीच्या शेंकडो आठवणींनीं भरलेलें, ज्या घरांत आमच्यांत आज नसलेल्या वडिलांच्या आठवणी, तें घर सोडून दुसरीकडे मला जाववेना. माझ्या लग्नांतील एक उणीव म्हणजे बापू नव्हते. त्यांची मला सारखी आठवण येत होती. परंतु बापूंनी मला आशीर्वादपर पत्र पाठविलें होतें. राजाला नि मला स्वतः कातलेल्या सुताचे दोन हार त्यांनीं लग्नभेट म्हणून, अहेर म्हणून पाठविले होते. त्यांनी हिंदींत पुढीलप्रमाणें लिहिलें होतें :

" प्रिय कृष्णा,

आज तुझा पुन्हां जन्म होत आहे. कारण विवाह म्हणजे एक प्रकारें पुनर्जन्मच असें नाहीं का ! तुझी बहीण स्वरूप काठेवाडमध्यें नववधू होऊन आली; परंतु आपल्या माहेरच्या प्रांतांतच तिनें पतीला नेलें ! तिकडेच राहण्यासाठीं त्याचें मन तिनें वळविलें. परंतु स्वरूपमध्यें नि तुझ्यामध्यें बरेंच अंतर आहे. तूं राजाला घेऊन जाण्याचा प्रयत्न करशील असें मला वाटत नाहीं. शिवाय राजा पडला गुजराती. तो सहजासहजीं आपली मातृभूमि सोडणार नाहीं. म्हणून तूं गुजरातमध्यें किंवा कदाचित् मुंबईला घर करशील अशी आशा आहे. माझी एकच इच्छा कीं तूं कुठेंही असलीस, तरी सुखी रहा. आणि आपल्या विख्यात आईबापांच्या आधींच तेजस्वी असणाऱ्या नांवाला आणखी तेज जोड.

तुझ्या लग्नाला मी उपस्थित राहूं शकलों नाहीं म्हणून वाईट वाटतें. तेव्हां आशीर्वाद पाठवूनच मीं माझें समाधान करून घेतलें पाहिजे.

तुझा
**बापू** "

आमचें लग्न ठरल्याची गोष्ट वल्लभभाईंना नाशिकच्या तुरुंगांत कळली. त्यांनींही अभिनंदनपर नि आशीर्वादपर पत्र पाठविलें होतें. बापूंप्रमाणें सरदारांनींही लिहिलें कीं, " तुझे मेहुणे रणजित पंडित यांनीं काठेवाड सोडून संयुक्त प्रांतांत घर केलें. परंतु या वेळेस गुजरातमधील लोक तुला तिकडे माहेरीं संयुक्त प्रांतांत घर करायला जाऊं देणार नाहींत. राजाला बरोबर नेऊं देणार नाहींत." माझ्या मनांत तसें करायचें नसल्यामुळें वल्लभभाईंची भीति अनाठायीं होती, निराधार होती. परंतु माझ्या नवीन घरीं माझें स्वागत करायला इतके लोक आनंदानें तयार आहेत, हें पाहून मी सुखावलें होतें.

देवी सरोजिनी नायडू या आमच्या कुटुंबाच्या जुन्या मैत्रिणी. त्यांनींही अभिनंदनाचें पत्र पाठवलें. सरोजिनीदेवीच तसे पत्र लिहूं शकतील. तशी धाटणी दुसऱ्या कोणाला साधणार? ते पत्र काव्यानें, संगीतानें भरलेलें होतें. त्यांनीं लिहिलें:

" प्रिय बेटी, ( बेटी हें माझे लाडकें नांव होतें. तें दुर्दैवी नांव जन्मभर मला चिकटून राहिलें आहे. )

आजचें राष्ट्रीय जीवन उदास, भगभगीत वाटत आहे. परंतु यांतूनच अनपेक्षित असें प्रेमपुष्प एकदम संपूर्णपणें फुललेले, तेजाने नटलेले असें अकस्मात् दिसले, ही किती आनंदाची गोष्ट! आणि माझ्या मणिकमोत्यांनो! तुम्ही दोघ किती लबाड! इतके दिवस सारें लपवून ठेवलेंत ना? कोणाला दाद लागूं दिली नाहींत. प्रिय बाळे, तुला मिळालेल्या नवीन सुखामुळे मी किती सुखी झालें आहे! मी एकपट नव्हे, तर दुप्पट तिप्पट सुखी झालें आहें. कारण ममाजींना, तुझ्या आईला आज परम धन्यता वाटेल. मम्माजी तर अंथरुणाला खिळलेल्या आहेत. परंतु आपली आवडती बेटी आज नववधू झालेली पाहून हृदयाची शेवटची इच्छा पूर्ण झालेली पाहून त्यांना किती समाधान वाटेल! आज पापाजी–तुझे वडील–हयात असते, तर स्वतःच्या खोल भावना थट्टामस्करीच्या खालीं लपवून त्यांनींहि तुला किती आशीर्वाद दिले असते, तुझ्या निवडीला संमति दिली असती. तुझे लग्न व्हावें ही इच्छा त्यांच्याहि राजशाली हृदयांत होती. मधून मधून ते ती बोलूनहि दाखवीत.

तुझा राजाशीं परिचय आहे त्याच्याहून कितो तरी अधिक काळचा माझा आहे. निरनिराळ्या स्थितींतील त्याचीं किती तरी नख-चित्रें मी तुला काढून देऊ शकेन. मे महिन्यांतील आठवडा असावा, ऑक्स्फर्डजवळच्या नदींतील नावेंत राजा बसलेला किंवा लवंडलेला असावा! आणि भटांभिक्षुकांवर, धर्मोपदेशकांवर, प्रेषितांवर विनोदगर्भ अशी त्याची टीका सुरू असावी! कधीं लांब नेकटॉय लावून, तोंडांत पाइप धरून कॅफे रॉयलजवळ एखाद्या भटक्या बोहिमियनप्रमाणें तुझा हा राजा हिंडत असावा! परंतु त्याचें शेवटचे स्मरणीय दर्शन घडवूं? बोरीबदरवरचा तो प्रसंग आहे. खादीधारी मंडळीचा जमाव जवाहरला निरोप देत होता. त्यांच्याकडेला राजा उभा होता. त्याला स्वतःचें भान होते. तो त्यांच्यांतील असूनहि त्यांच्यांत नसल्याप्रमाणें दिसे. त्या मेळाव्यांतील ही व्यक्ति कोण असे प्रत्येकजण आश्चर्यानें म्हणे. मलाहि थोडें आश्चर्य वाटले. माझ्याबरोबर तोहि प्लॅटफॉर्मवर चालत होता. परंतु जिला त्याने पत्नी म्हणून पसत केलें होते, तिच्या भावाशीं आपला निकट सबध आहे किंवा उद्यां निकटचे नातें जडायचे आहे, हें थोडेहि त्याने दाखविले नाहीं. डोळ्याच्या पापणीचा केंसहि त्यानें हलवला नाहीं. न जाणों, कदाचित् आपली ओळख आहे असें कोणाला वाटायचें!

कमला नि स्वरूप यांची धांदल उडालेली मला दिसत आहे. घाईघाईने तुझ्या विवाहाचीं मंगल वस्त्रें त्या तयार करीत आहेत. शुद्ध खादीचाच पोषाख करायचा असल्यामुळें पसंती-नापसंतीला फार वावच उरत नाहीं; निरनिराळी निवड करायला मिळत नाहीं, म्हणून त्या तक्रार करीत आहेत. नववधूला सजविण्यासाठीं खादींत फार वाव नाहीं असें त्यांचें म्हणणें, होय ना ? करूं दे त्यांना कुरकुर. परंतु तूं कशाला वेडेपे तिकडे लक्ष देतेस. सुखाच्या नि सुखस्वप्नांच्या अमोल वस्त्रांनीं तूं नटलेली आहेस ! स्वतःचें यौवन, प्रेम, नि साहस यांच्या माणिकमोत्यांनीं तूं अलंकृत आहेस !

माझी एकच प्रार्थना कीं तुम्ही दोघे आपल्या विवाहाला परममंगल सहकाराचे स्वरूप द्याल ! अति सुंदर नि शाश्वत मैत्रीचे रूप द्याल ! केवळ परस्पर प्रेमच नव्हे, तर परस्पर विश्वास, एकमेकांना समजून घेण्याची वृत्ति, जीवनाच्या रोजच्या कामांत, योजनांत, प्रश्नांत समान हितसंबध, समान आनंद अशांच्या आधारावर आदर्श संसार, सहकाराचा रमणीय संसार तुम्ही उभारा.

तुमचें जें हे सहकार्य, त्यांत तुझाहि महत्त्वाचा भाग असेल. तूं आपल्या स्वतःच्या आश्चर्यकारक दैवी देणग्या तेथें आणशील. तुझ्यांतील गुणांचा तुझ्या कुळांतील संपन्नतेमुळें, उदात्त परंपरेमुळें अधिकच विकास झालेला आहे. आणि तुझ्या कुळांतील ती थोर परंपरा म्हणजे देशाला सदैव स्फूर्ति देणाऱ्या, आदर्श वाटणाऱ्या अशा परंपरांचा, ध्येयांचा, पराक्रमांचा, पुरुषार्थांचाच एक अविभाज्य असा भाग होय. हे सारे तूं घेऊन येशील...... आणि म्हणून तुझे लग्न तुझ्या कुटुंबाशीं नि मित्रांशींच संबद्ध आहे, मर्यादित आहे, असें नको समजूं ; ती एक घरगुती बाब नको समजूं राष्ट्राचाहि त्यांत भाग आहे. राष्ट्राचेंहि नशीब त्यांत गुंतलेलें आहे. कारण तूं मोतीलाल नेहरूंची कन्या आहेस, प्रिय जवाहरची भगिनी आहेस.

" परंतु तूं माझीहि लहान बहीण आहेस. म्हणून प्रिय बेटी, मी माझे अत्यंत प्रेममय आशीर्वाद तुला पाठवीत आहें. तुला तुझ्या जीवनाचा सांगाती मिळाला, तुझ्या तारुण्याचा मित्र नि गडी मिळाला म्हणून तुझ्याबरोबर मीहि आनंद मानीत आहे "

हें पत्र त्याप्रमाणेंच सुखाची, सौभाग्याची आशा प्रकट करणारीं दुसरीं अनंत पत्रे पाहून माझें हृदय उंचबळून आलें. माझा भावि संसार मी सुखाचा करीन, उद्यांचे नवीन जीवन मी यशस्वी करीन, अशी मीं मनांत आशा धरली.

लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं मीं माझे जुनें घर सोडलें. नव्या घरीं जाण्यासाठीं माहेर सोडलें. मनाला वेदना झाल्याशिवाय राहिल्या नाहींत. अद्यापहि अंथरुणांतच असलेल्या आईला, तसेंच कुटुंबांतील इतर सर्वांना सोडून जाणे जिवावर आलें. सर्वांना सोडून जाण्याची कल्पना सहन होईना. अणि जें नवीन जीवन सुरू व्हायचें होते,

त्याचीहि थोडी भीति वाटत होती. उद्यां कसें होईल कोणाला ठाऊक असें थोडें मनांत येई. परतु मी ज्या ज्या वेळीं राजाकडे बघे, तेव्हां सारें गोड होईल अशी खात्री वाटे; मनाला धीर येई. राजा किती निष्ठावान्, किती प्रेमळ !

ज्या दिवशीं अहमदाबादला जाण्यासाठीं आम्ही निघालों, त्या दिवशीं सायंकाळीं आम्हांला निरोप द्यायला सारें अलाहाबाद जणु लोटले. माझे सारे नातलग, मित्र, आमच्या गांवची सारी मंडळी स्टेशनवर आली होती. त्या वेळेस मात्र पूर्वी कधींहि वाटले नव्हतें इतकें वाईट वाटलें. अश्रुपूर्ण नयनांनीं सर्वांनीं मला जवळ घेतलें. परतु मीं अद्याप धीर धरला होता. आणि गाडीची शिटी झाली. मी जवाहरला चिकटलें; त्यानें मला पोटाशीं धरलें. " सुखी अस बाळ " तो हळूच म्हणाला. तीनच शब्द, परंतु त्यांत त्रिभुवन होतें. ज्या अश्रूंना रोखून ठेवण्यासाठीं इतका वेळ मी धडपडलें, ते सारे अश्रु ते तीन शब्द ऐकतांच घळघळून धांवून आले. आईचा निरोप घेतांना असेच हृदय दुभंग झाल्याप्रमाणे झालें होतें. परंतु तिच्यासाठीं म्हणून मोठ्या कष्टाने मीं स्वतःला आवरले होतें. परतु आतां जशी हळुहळू गाडी स्टेशनांतून बाहेर जाऊं लागली, तसतसें वाटे कीं उडी टाकावी आणि माझ्या घरीं माझ्या लोकांत पुन्हां जावें. परंतु फांसा टाकला गेला होता आणि आतां मागे जाणे नव्हते.

अहमदाबाद जवळ येत होतें. राजाचे घर जवळ येत होते. कुटुंबांतील प्रत्येकाविषयीं आज राजानें मला सांगितलें. निःपक्षपातीपणानें त्या सर्वांविषयीं त्यानें सांगितलें. माझ्यासमोर सर्वांचें चांगलेंच चित्र त्यानें काढलें. माझ्यासमोर जे जीवन होतें, त्याची त्यानें चांगली कल्पना दिली. मला कोणत्या कोणत्या अडचणींना तोंड द्यावें लागेल त्याचीहि त्यानें कल्पना दिली. आणि म्हणाला, " तुला तुझे जुनें घर सोडावें लागलें ! मलाहि वाईट वाटलें. माहेर सोडावें लागण्याची कल्पना मलाहि आवडली नाहीं. एखाद्या ठिकाणीं लहान रोपटें लावावें, तेथे तें वाढावें, फुलावें आणि त्याला उपटून कोणी नेण्याची खटपट करावी तसे हें आहे एका विवक्षित हवेंत, जमिनींत वाढलेलें तें झाड. तें झाड दुसऱ्या जागेत, दुसऱ्या वातावरणांत नेऊन लावावयाचें. कसें काय होईल देव जाणे. माझ्याहि मनांत शंका येते, भीति वाटते. या उत्पाटनानें झाडाचा फायदा होईल का ? ते अधिक सुंदर, तेजेलदार, फलपुष्पांनीं संपन्न होईल, कीं त्या निराळ्या वातावरणांत ते सुकून जाईल ? "

असें म्हणून तो स्तब्ध राहिला. जसजसे आम्ही घराच्या जवळ, अधिक जवळ जात होतों, तसतसे वरील प्रश्न राजाला अधिकच व्यथित नि दुःखी करूं लागले. उगीच हें लग्न लागलें असें क्षणभर दुःखानें जणु त्याला वाटले !

मोठ्या पहांटे आम्ही अहमदाबादला पोंचलों. स्टेशनवर राजाच्या कुटुंबीयांनीं नि मित्रांनीं आमचे स्वागत केले. अहमदाबादला थोडे दिवस राहून आम्ही मुबईला आलों. आणि नवीन जीवन सुरू झालें. ससार सुरू झाला.

तरुण असतांना राजाने सरकारी शाळेवर बहिष्कार घालून राष्ट्रीय विद्यापीठांत नांव घातले होते. नंतर तो इंग्लडांत गेला. तेथे सारेच विद्यार्थी करतात त्याप्रमाणे त्याने राजकारणांतहि लुडबुड केली. परतु हिंदुस्थानांत परत आल्यावर आपल्या बॅरिस्टरीचा मुबईत नीट जम बसेपर्यंत राजकारणांत प्रत्यक्ष भाग घ्यायचा नाहीं त्याने असें ठरविले. कांहीं दिवस तो बॅरिस्टरींत रंगला. परंतु रोमरोमांत राजकीय वृत्ति असल्यामुळे, राजकारणाकडे दूर उभें राहून केवळ पाहत राहणे हे त्याला जमेना. राजकारणाचे केवळ प्रेक्षक होणे त्याला अशक्य होऊं लागलें. हळूहळू राजकारणानें त्याला ओढले. केवळ बॅरिस्टरींत राजा सुखी नाहीं हे मी पाहूं शकत होतें. देशासाठीं आपल्याला जें करतां येईल तें करायला तो उत्सुक होता. आणि जरूर तर स्वातंत्र्यासाठीं सर्वस्वावर पाणी सोडायला, जें जें हृदयाशीं धरून ठेवलें होतें, तेंहि अर्पायला त्याची तयारी होती. आतांपर्यंतचें जें राजाचे राजकीय जीवन मीं पाहिलें, त्यांत तरी वैयक्तिक महत्त्वाकांक्षा वा स्वार्थ यांचा लेशहि मला दिसला नाहीं. त्याचें राजकीय जीवन या गोष्टींनीं दूषित झालें नाहीं. कलंकित झाले नाहीं आणि पुढेंहि महत्त्वाकांक्षा नि स्वार्थ यांना तो थारा देणार नाहीं याची मला खात्री आहे. मुकेपणानें काम करीत राहणेंच त्याला आवडतें. कोणाच्या डोळ्यांत न भरतां, गाजावाजा न करतां काम करावे यांतच त्याचा आनंद. पुष्कळ कटु अनुभव आले असले, भ्रमनिरास झाला असला, तरी स्थिरपणे, अविचलपणें तो गेलीं कित्येक वर्षे याप्रमाणे मुके काम करीत आहे.

राजा अशा प्रकारचा मनुष्य आहे कीं वय कितीहि वाढले, तरी ज्याची बालसदृश साधी वृत्ति कायम राहील. विवक्षित ध्येयांवरची श्रद्धा अचल राहील. तो प्रामाणिक आहे, मोकळ्या मनाचा आहे. मनुष्यांतील अंतिम चांगुलपणावर त्याची श्रद्धा आहे. स्वतःच्या वर्तनासाठीं असणारें त्याचें नीतिशास्त्र फार उच्च दर्जाचें आहे; परंतु ज्यांचीं नीतिमूल्यें निराळीं आहेत, त्यांना तो अधःपतित समजत नाहीं. मनांत ध्येयवादी असणारीं हीं माणसें, अशांना जगांतील दंभ पाहून, आपलीं स्वप्नें चुरडलीं जात आहेत असें पाहून, ज्याला आपण चांगले समजत आलों ते तसें नाहीं, असे पाहून फार मानसिक क्लेश होतात.

ज्यांच्या हृदयांत ध्येयवाद आहे, अशांना भ्रमनिरास झाल्यामुळें फार मानसिक त्रास सोसावा लागतो.

पुष्कळांची अशी समजूत आहे कीं राजा अहंकारी आहे, नबाबी आहे. परंतु हें सत्य नव्हे. त्याचा सर्वांत मोठा दोष जर कोणता असेल, तर (आणि हा दोष म्हणायचेंच झालें तर ) तो अति हळुवारपणा. तो अति संवेदनाक्षम आहे. तो लहान होता तेव्हां-पासूनच तो जरा आंतल्या गांठीचा झाला. कारण इतरांपेक्षां निराळ्या वृत्तीचा असल्या-मुळे त्याच्याविषयीं फार गैरसमज होत. गैरसमज उत्पन्न होण्यापेक्षां दूरच असलेले बरें असें जणूं त्यानें ठरवलें. त्याच्या स्वभावांतील दूर राहण्याची जी ही वृत्ति, तिलाच चुकीनें नेहमी अहंकार म्हणून मानण्यांत येतें. परंतु ज्यांना त्याचा स्वभाव माहित आहे, ते त्याच्यावर प्रेम केल्याशिवाय राहणार नाहींत; त्याच्या गुणांमुळें नव्हे ( जे पुष्कळ आहेत ) तर त्याच्या दोषांमुळे, त्याच्यांतील दुबळेपणामुळें; कारण त्यांमुळेच तो इतका सहृदय आहे, त्यांतच त्याची खरी मानवता आहे.

"आम्ही प्रवासी आहोंत; ज्या रस्त्यानें आम्ही जातों, त्या रस्त्याला आम्हीच नटवतों. आम्ही थांबतों, स्थिरावतों; परंतु काळाच्या प्रवाहावरील पिसांप्रमाणें आम्ही आहोंत."

— सेसिल डे लीविस

१९२० पासून जीवनांत सदैव बदल होत होते. कशाचीच जणूं शाश्वती नाहीं असें तें जीवन चाललें होतें आणि यामुळें पुढच्या क्षणीं काय होणार आहे हें मला कधींहि सांगतां येत नसे. प्रथम प्रथम रोज उठून होणारे बदल बरे वाटत असत. कांहीं तरी नित्य नूतन घडतच आहे असें पाहून उत्साह वाटे, प्रेरणा वाटे. परंतु अनिश्चितताच जेव्हां शाश्वत होऊं लागली, रोज उठून कांहीं ना कांहीं फेरफार आहेच असें जेव्हां होऊं लागलें, तेव्हां डोकें दुखूं लागलें. नको ही कटकट नि यातायात असें वाटूं लागलें. परंतु याच्या उलट इकडे वैवाहिक जीवनांतील माझीं पहिलीं वर्षें तरी अति शांतपणें गेलीं आहेत. आणि मला आशा आहे कीं थोडेफार चढउतार जरी आले, तरी उरलेलें जीवनहि असेंच शांतपणें जाईल.

पहिले कांहीं महिने तितकेसे सुखाचे गेले नाहींत. अहमदाबाद शहर उद्योगधंद्यांचें मोठें केन्द्र आहे. औद्योगिक क्रान्तीचा प्राचीन परंपरांवर जेव्हां आघात होऊं लागतो, ही क्रान्ति प्राचीन परंपरांवर जेव्हां कुरघोडी करूं लागते, तेव्हां नाना प्रकारचे विरोध, विसवाद निर्माण होत असतात. अहमदाबाद शहरहि त्याला अपवाद नव्हते अशा विसं-

वादांनीं भरलेलें ते शहर म्हणजे एक निराळेंच जग वाटलें. अशा जगाच्या अस्तित्वाची मला कल्पनाहि नव्हती. ज्या जगांत आतांपर्यंत मी होतें, त्या जगापेक्षां हें जग किती निराळें. जीवनाकडे पाहण्याची दृष्टि, चालीरीति, पद्धति, जगण्याची रीत, सारेंच निराळें. कशांतच साम्य नव्हतें. माझ्या पतीच्या घरांतील सारीं माझ्याशीं जरी प्रेमानें, उदारतेनें वागत, तरी मला तेथें एकटें एकटें वाटे. कोठे तरी रानांत येऊन पडल्या-सारखें वाटे. राजावरचें माझें प्रेम जर खोल नसतें, उत्कट नसतें, तर हें नवीन जीवन मला खरोखर फारच जड गेलें असतें. राजाचें प्रेम, त्याचा समजुतदारपणा, त्याच्या कुटुंबीयांनीं दाखविलेली सहिष्णुता, यांमुळें मी माझ्या निराशेंतून वांचलें. आणीबाणीच्या वेळेस या गोष्टींनीं मला वर घेतलें, बुडूं दिलें नाहीं. त्या वेळेसच नव्हे, तर सदैव या गोष्टींनीं मला तारलें आहे. मीं पुष्कळदां राजाची निराशा केली असेल; परंतु त्यानें माझी कधीं केली नाहीं. मी त्याच्या कसोटीला पुष्कळ वेळां उतरलें नसेन. परंतु माझ्या कसोटीला तो सदैव उतरला.

लग्न झाल्यावर कांहीं महिन्यांनीं जवाहरचें मला एक पत्र आलें होतें. त्या पत्रानें एकमेकांशीं जुळतें कसें घ्यावें हें मला शिकविलें. त्यानें लिहिलें, "वैवाहिक जीवनाचा नवीन अनुभव घेतांना तुला जीवनाकडे निराळ्या दृष्टिकोनानें पाहावें लागेल आणि असें करून शहाणपण मिळवावें लागेल. तुरुंगांतील अनुभवाचा फायदा ज्यांना मिळाला आहे ते एक गोष्ट तरी नक्की शिकले असतील; सहनशीलतेची, उतावळें न होण्याची किंमत त्यांना समजून आली असेल. आणि या अनुभवानें जर ते शहाणे झाले असतील, तर परिस्थितीशीं जुळवून घेण्याचा गुणहि ते शिकले असतील. आणि हा गुण अंगीं असणें म्हणजे मोठी गोष्ट होय. लौकरच तुझी घडी नीट बसेल अशी मला आशा आहे. तूं माझी लहान बहीण, तूं सदैव परम सुखांत असावेंस हीच तुझ्या भावाची इच्छा."

तुम्हांला कदाचित् आश्चर्य वाटेल, ऐकून जरा चमत्कारिक वाटेल; परंतु वैवाहिक जीवनाच्या पहिल्या कांहीं महिन्यांत सर्वात मोठा प्रश्न माझ्या डोळ्यांसमोर येऊन उभा राहिला असेल तर तो अन्नाचा. खाण्यापिण्याच्या बाबतींत मी फार लक्ष घालणारी नव्हते. परंतु बहुतेक सर्व काश्मीरी लोकांप्रमाणें मांस नि मासे मला आवडत. परंतु अहमदाबादला सासरीं सारे कडक शाकाहारी. मांस नाहीं, मासे नाहींत, अंडींहि नाहींत; हॉटेलमध्ये किंवा एखाद्या रेस्टॉरंटमध्ये जाऊन खाण्याचीहि शक्यता नव्हती. कारण तसें कोणी करीत नसे. मला गुजराती अन्न आवडत असे परंतु फक्त भाज्या खाऊन मला तृप्ति वाटत नसे. तीन महिने मी शाकाहारी होतें आणि या तीन महिन्यांत मी कधीं पोटभर जेवलें नाहीं; थोडीफार उपाशीच असें. पुढें मांसाशनावर विसंबून राहायला मी स्वतःला शिकविलें. आणि आतां वाटेल तितके दिवस मांसमच्छी-शिवाय मी खुषीनें राहूं शकतें.

अहमदाबादेत उद्योगधंद्यांत पुढें आलेलीं जीं कांहीं कुटुंबें आहेत, त्यांपैकींच राजाचें कुटुंब हेंहि एक आहे त्याचे वडील पुष्कळ वर्षांपूर्वी निवर्तले. त्या वेळेस हीं मुलें लहान होतीं. राजाच्या आईने धंद्याकडे स्वतः जातीनें लक्ष दिलें. आणि विरोधी शक्ति प्रचंड होत्या, तरी तिनें कारभार यशस्वी रीतीने करून दाखविला. मुले मोठीं होऊन आपल्या खांद्यावर धंद्याची धुरा घेईपर्यंत तिनें सारें काम केलें. त्या कठीण काळांतहि तिने आपल्या मुलांची हयगय केली नाहीं. त्यांच्यावर ती प्रेम करी त्यांची काळजी घेई. त्यांचें दुखलेंखुपलें पाही. लहानसहान गोष्टींतही लक्ष देई. साऱ्या धंदेवाइक लोकांप्रमाणे राजाच्या घरची मंडळीहि अबोल आहेत, आंतल्या गांठीची आहेत, शांत आहेत, आपल्या भावना दुसऱ्याला ती कधीं दाखविणार नाहींत. प्रथम मला हा अबोलेपणा समजेना माझ्यावर यांचे कोणाचें प्रेम नाहीं, अशी मीं पुष्कळदां समजूत करून घेत असे.

राजाचे कुटुंब अविभक्त आहे. परंतु एकत्र कुटुंबपद्धति असली, तरी प्रत्येकाला स्वेच्छेप्रमाणे वागण्याचें स्वातंत्र्य असते. कोणी कोणाच्या आड येत नाहीं. असे असूनहि कुटुंबांत विस्कळितपणा नाहीं. सर्वांचें एकमेकांवर प्रेम आहे. केवळ धंद्याने ते एकत्र जोडलेले आहेत असे नाहीं; तर तेथें खोल भावबंधन आहे. अहमदाबादेतील धंदेवाइक समाज, हे व्यापारी, कारखानदार, हे सारे सनातनी वृत्तीचे आहेत. त्यांच्यांत संकुचितपणा आहे, पुरातनप्रियता आहे. ते अहंकेंद्री आहेत. स्वतःचाच विचार करणारे आहेत. त्यांचीं जीं मूल्ये असतील, त्याचप्रमाणे ते सर्वांना वागायला लावतील ; सर्वांनीं वागलें पाहिजे असे म्हणतील. परंतु त्यामुळें व्यक्तीच्या खाजगी जीवनांत आपण उगीच ढवळाढवळ करीत आहोंत, त्रास देत आहोंत, हे त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. विशेषतः एकत्र कुटुंबपद्धतींत तर असे होण्याची फार शक्यता. म्हणून जुळवून घेण्याची आमची प्रक्रिया फार अवघड होती, बरेच दिवस चालू होती.

भूतकाळांतील एकत्र कुटुंबपद्धतीचा प्रयोग त्या काळांतील सामाजिक रचनेला योग्य होता, उपयुक्त ठरला. परंतु ती सामाजिक रचना आज गडगडत आहे जुन्या स्वरूपांत ती राहणें शक्यहि नाहीं. हिंदुस्थानांत सर्वत्रच एक झगडा सारखा सुरू आहे. व्यक्ति आपल्या हक्काचा पुरस्कार करी; माझ्या इच्छेप्रमाणे मला जगूं दे असे म्हणे. तर एकत्र कुटुंबपद्धति त्याला म्हणे "ते कांहीं नाहीं; सर्वांनीं एका ठरींव साच्याप्रमाणे वागलें पाहिजे !" अशा संघर्षात साहजिक, कुटुंबाची सत्ता कमी कमी होत गेली. कारण कुटुंबाची सत्ता व्यक्तीच्याच जीवनाच्या आड येई असे नव्हे, तर राष्ट्रीय जीवनाच्याहि आड येई. ज्या शक्ति जगाला आज हालवीत आहेत, त्या शक्तींशीं या एकत्र कुटुंबपद्धतीचा कसा मेळ घालतां येणार ? मला वाटते कीं एकत्र कुटुंबपद्धतीला हळूहळू परंतु निश्चये करून नष्ट व्हावें लागेल. परंतु हिंदुस्थान फार मोठा देश असल्यामुळे आणि

त्याचीं मुळें भूतकाळांत फार खोल गेलेलीं असल्यामुळे हें घडून यायला कांहीं काळ लागेल.

परंतु एक घटक म्हणून कुटुंब महत्त्वाची वस्तु आहे. विशेषत: लहान लहान कुटुंबें. जशीं आनंदभवनांत आम्ही राहत होतों. माझे आईबाप, जवाहर नि त्याचे कुटुंब, माझी बहीण नि मी, बस्स! एवढयांचा एक घटक. परंतु आम्ही एकत्र होतों तरीहि कठोर नि कडक नियमांनीं, चटकबंद विधिनिषेधांनी आम्ही एकत्र बांधलेले नव्हतों. अशी एखादी आमची स्मृति नव्हती. एकाच घरांत आम्ही राहत होतों परंतु आमचीं व्यक्तिगत जीवनें आम्ही जगत होतों. आणि एकमेकांशीं क्वचितच आमचा संघर्ष होई. आम्हांला एकच बंधन एकत्र जोडणारें होतें, तें म्हणजे प्रेम-बंधन. प्रेमबंधनाहून अधिक बळकट बंधन जगांत कोणतें आहे? एकत्र कुटुंबपद्धतींत जीं आर्थिक बंधनें सर्वांना एकत्र राखीत असतात, तीं बंधनें पुढेमागें खरोखरीच बंधनें होतात; व्यक्तीच्या विकासाच्या आड तीं येतात, व्यक्तीला गुदमरवतात. दडपून टाकतात.

राजाच्या कुटुंबीयांचे या बाबतींतील विचार निराळे होते. यामुळे झगडे होत. स्वत: राजाचेहि या बाबतींतील विचार माझ्याशीं जुळत नसत. कधीं कधीं त्याचा–माझाहि खटका उडे. पुष्कळ गोष्टींत आमचें ततोतंत जुळणार नाहीं हें आम्हांला कळून चुकलें. आमच्या विचारांची, मतांची खडाजंगी होई. परंतु राजा सहनशील होता. दुसऱ्याचें समजून घेण्याची त्याची वृत्ति असे. त्यानें त्या काळांत आणि पुढेंहि इतकीं वर्षे जी सहनशक्ति नि अनाग्रही वृत्ति दाखवली, तीं खरोखरच अद्वितीय आहेत, भव्य नि उदात्त आहेत. पहिले महिने तरून जायला त्याच्या या गुणांनीं मदत केली. आणि पहिले महिनेच सर्वांत कठीण असतात.

लग्न झाल्यावर कांहीं महिने राजाच्या कुटुंबांतच आम्ही राहत होतों. नंतर आम्हीं स्वतंत्र बिऱ्हाड थाटलें. एके ठिकाणीं एक गाळा घेतला. लहानसाच गाळा; परंतु अति अद्यतन असा होता. मला ती जागा आवडली. गृहव्यवस्थेचा मला फारसा अनुभव नव्हता. काय करावें, कधीं कधीं सुचत नसे. कधीं कधीं फारच कठीण वाटायचें सारें. परंतु एकंदरींत आपलें घर आपण चालवण्यांत एक प्रकारची गंमत असते. ज्या घरांत साऱ्या सुखसोयी विपुलतेनें असत, अशा मोठ्या घरांत माझें बरेंचसें जीवन आजवर गेलेलें. त्यामुळें आतां त्या लहान जागेत साऱ्या पद्धतीनें राहण्यांतील आलेला अनुभव मोठा अपूर्व होता.

माझा पति कामांत असे, तेव्हां मला दिवस जरा कंटाळवाणे वाटत. मला सुनेसुने वाटायचें. दिवस जातां जायचा नाहीं. मुबईंत माझ्या ओळखीचे फारसे लोक नव्हते. राजाचे मित्र वगळले, तर माझ्या वडिलांचे कांहीं जुने मित्र मुंबईंत असत, ते नि त्यांचीं

कुटुंबें एवढींच मला माहित. परंतु मला मैत्री पटकन करतां येते. त्यामुळे लौकरच पुष्कळसे नवीन परिचय झाले, नवीन मित्रहि मिळाले. जीवन सुखी नि समाधानी होतें.

१९३४ च्या हिंवाळ्यांत जवाहर पुन्हां तुरुंगांत पडला. प्रत्येक वर्षाच्या उत्कृष्ट भागांत तो तुरुंगांतच असे. त्याला बरेच महिन्यांत आम्ही भेटलों नव्हतों. कमलाने पत्र लिहून जवाहरला भेटायची तुमची दोघांची इच्छा आहे का असें विचारलें. आम्हीं समति पाठवली. मुलाखत ठरली. कमलाला भेटून तिघांनीं डेहराडूनला जायचें असे निश्चित झालें. ठरवलेल्या दिवशीं आम्ही जेलच्या दारापाशीं आलों. सुमारें अर्धा तास थांबल्यावर आम्हांला जवाहरच्या खोलीकडे नेण्यांत आले. साधारणपणें तुरुंगाच्या कचेरींत मुलाखती देण्याची पद्धति आहे. परंतु जवाहरची खोली जरा बाहेरच्या बाजूच्या कोठ्यांत असल्यामुळें आम्हांला तेथें जाऊं दिलें. राजानें अद्याप जेलसारखी वस्तु जवळून कधीं पाहिली नव्हती. ही त्याची तुरुंगांतील पहिली भेट. मला जे इतर तुरुंग माहित आहेत, त्या तुरुंगांइतका प्रचंड नी भीतिप्रद हा डेहराडून तुरुंग वाटला नाहीं. परंतु हिंदी तुरुंगांच्या जवळ जो कधीं आलेला नाहीं, त्याला डेहराडून जेलहि भीषण नि कराल वाटल्याशिवाय कसा राहील? आम्ही जवाहरच्या खोलींत बसलों. लहानशी खोली. तेथें एक लोखंडी खाट होती. टेबल होतें. खुर्ची होती. कांहीं पुस्तकें इकडेतिकडे पडलेलीं होतीं. एका कोंपऱ्यांत चरका होता. तो दिवसहि मोठासा प्रसन्न नव्हता. फार गार वारा सुटला होता. उदासवाणा असा तो दिवस भासत होता. आणि ती खोलीहि भयाण नि निरानंद वाटली. जवाहरनें आपल्या नैसर्गिक प्रसन्न हास्यानें आमचें स्वागत केलें. तो कृश दिसला, जरा वाळल्यासारखा वाटला. कमलाला नि मला तुरुंगांतील अशी भेटींची संवय झालेली होती. आपल्या प्रिय मंडळीला बदलणाऱ्या परिस्थितींत, बदलणाऱ्या स्थितींत पाहण्याची गोष्ट आम्हाला नवी नव्हती. परंतु राजाला सारें नवीन होतें. तेथील जागा पाहून त्याला जरा धक्काच बसला. कमला नि मीच बोलत होतों. तो सर्व भेटींत मुकाट्यानें बसला होता. जेव्हां आम्ही घरीं आलों, तेव्हां राजा सरळ आपल्या खोलींत गेला. एक चकार शब्दहि कोणाजवळ तो बोलला नाहीं. बराच वेळ झाला तरी खोलींतून तो बाहेर आला नाहीं, तेव्हां काय झाले म्हणून पाहायला मी गेलें. अंथरुणावर तो पडून होता. अति दुःखीकष्टी दिसत होता; त्याला फार वाईट वाटत असावें. त्यानंतर राजानें जवाहरची तुरुंगांत पुष्कळ वेळां भेट घेतली; परंतु अजूनही प्रत्येक वेळेस तुरुंगांतील भेट घेतांना त्याला जरा खिन्न नि उदास वाटल्याशिवाय राहत नाहीं. प्रिय माणसांना वर्षानुवर्ष तुरुंगांतील गजांआड पाहणें हे सुखावह कसें असणार? वाईट वाटतेच. ज्यांना आपण भेटू शकत नाहीं, त्यांचा सहवास मिळावा म्हणून, ते पुन्हां आपल्यांत यावेत म्हणून मन भुकेलेलें होतें; आणि तें शक्य नसल्यामुळे साहजिकच मन खिन्न होतें. परंतु

यामुळें आम्ही कधीं गतधैर्य झालो नाहीं. आम्हांला असहाय असे कधीं वाटलें नाहीं. उलट स्वातंत्र्याची लढाई पुढे चालवयाला अधिकच कृतनिश्चय आम्ही झालों. आज स्वतः राजा तुरुंगांत आहे. हजारों कार्यकर्ते स्वातंत्र्याच्या लढयांत खांद्याला खांदा लावून लढणारे हजारों सेवक आज तुरुंगांत आहेत. राजाची नि माझी वर्षं होऊन गेले तरी भेटगांठ नाहीं; जेव्हां मला सुनेसुने वाटते, राजासाठीं जेव्हां जेव्हां मी आगावतें, आणि माझ्या पत्रांतील मजकुरावरून तो सारें समजतो, तेव्हां तेव्हां तो माझ्यावर रागावतो. मीं दाखविलेल्या दुबळेपणामुळें तो मला लाजवतो.

कांहीं वर्षे प्रत्यक्ष राजकारणांत राजा भाग घेत नव्हता. परतु घडामोडी झपाट्याने होत चालल्या. आणि त्यांचे स्वरूप असे होते कीं राजाला सार्वजनिक जीवनापासून अलिप्त राहणे अधिकाधिक कठीण होऊ लागले; आणि हळुहळू तो ओढला गेला. पुष्कळांना वाटते कीं राजाला या बाजूला खेचण्यास मी कारण: माझ्यामुळे तो राजकारणांत आला: मीं परिणाम घडवला, बॅरिस्टरी बंद करायला मीं लावले; परतु लोकांची ही समजूत सर्वस्वी चुकीची आहे, निराधार आहे. राजकारण म्हणजे काय हे मला चांगलेच माहित होते. अनिश्चितता, बदल, तुरुंग, दीर्घकाल टिकणाऱ्या ताटातुटी म्हणजे राजकारण. अशा या राजकारणाची तेरा वर्षे मीं चव घेतली होती. आणि नव्याने मिळालेली सुखशांति गमावण्यास मी तयार नव्हते. मला तशी इच्छा नव्हती. माझे मुलगे लहान होते, म्हणून राजकारणांत प्रत्यक्ष भाग मी घेऊ इच्छित नव्हते. जवाहर नि स्वरूप यांच्या मुलांना अगदीं लहान [illegible] कौटुंबिक जीवन असें नाहीं. स्थिर असे ऊबदार प्रेमळ घर नाहीं. कसलें निश्चित जीवन नाहीं. परंतु तरीहि सभोवतीं जे घडत होते, त्याच्या ज्वाळा मला लागल्याशिवाय कशा राहणार? म्हणून मला जे कांहीं थोडें करतां येणें शक्य होतें, ते मीं केले परतु राजाला संपूर्णपणे लढयांत उडी घेण्याची प्रबळ उत्कठा होती. त्याला मागे धरून ठेवणें मला योग्य वाटले नाहीं. तसा प्रयत्न करणे बरें वाटलें नाहीं. सुखाचा थोडासा काळ मिळाला होता. अटका, तुरुंगवास यांमुळे होणाऱ्या नेहमींच्या ताटातुटीसाठीं मी मनाने पुन्हां तयार होऊन राहिले.

आम्ही मुंबईत राहत होतो मला मुंबई आवडे. अलाहाबाद मला प्रिय असे; परतु तेथे माझे घरच होते म्हणून ते आवडे: दुसरें कांहीं विशेष कारण नव्हते मोठे शहर मला आवडते. त्याचें कारण असेहि असेल, कीं माझें निम्में आयुष्य लहान शहरांत गेले. मला मुंबई आवडे: कारण मुंबईने मला प्रेम दिलें, ऊब दिली. मुंबईत नेहमीं नूतन अपेक्षांचे वातावरण असते. म्हणूनहि मला आकर्षण वाटे. समुद्रहि मला नवीनच होता आणि त्याने माझे मन मोहून घेतलें. युरोपकडे मी समुद्रांतून गेले आणि तिकडून परत समुद्रांतून आले.समुद्राचा तेवढाच काय तो माझा पूर्व-परिचय; परतु बरेच दिवस समुद्राच्या

जवळ मी कधीं राहिले नव्हते. परंतु मुंबईस समुद्राला पोटभर पाहिले. एकमेकांच्या अंगावर लोळत येणाऱ्या त्या खेळकर लाटा, किंवा रागानें खडकांवर आपटणाऱ्या त्या प्रक्षुब्ध लाटा, त्यांना पाहून मला कंटाळा येत नसे. कितीहि लाटांचा तो नाच पाहिला, तरी पोट भरत नसे.

राजा कामांत असला म्हणजे दिवस जायचे नाहीत. मीं स्वतःला कांहीं तरी उद्योग लावून घेण्याचें ठरविलें. सामाजिक कार्य उचललें. स्त्रियांच्या विविध संस्थांत सामील झालें. गलिच्छ वस्तींत, कामगार चाळींत जाऊन आम्ही काम करीत असूं. त्या कामांत मला रस वाटे; परंतु वाईटहि वाटे. आजूबाजूला इतकें दारिद्र्य असावें, दुःख असावें नि आपल्याला तें दूर करायला फारसें कांहीं करतां येऊं नये, याचें वाईट वाटे.

१९३५ मध्यें आई आम्हांला भेटायला आली. जवाहर तुरुंगांतच होता. कमला आजारीच होती. औषधोपचारासाठीं ती कलकत्त्यास होती. बापूंनीं आईला वर्ध्याला येण्याविषयीं बरेचदां लिहिलें. शेवटीं तिनें जायचें ठरविलें. ती अलाहाबादला एकटीच होती. वर्ध्याला थांबून नंतर ती मुंबईला आली. माझ्या नवीन घरीं आई प्रथमच आली होती. आई आलेली पाहून मला किती आनंद झाला. महिनाभर राहायचा तिचा बेत होता. परंतु तीन आठवडे जेमतेम झाले असतील नसतील, तों तिला अर्धांगाचा झटका आला. जवळजवळ दोन महिने ती पुष्कळ आजारी होती. माझी बहीण, मावशी, ह्यींहि मुंबईला आलीं. किती तरी दिवसरात्री चिंतेंत गेल्या. जीवनमरणाच्या झोल्यावर आई होती. जगणार का मरणार, राहणार का जाणार ? असें क्षणक्षणां वाटत होतें.

आई अशा स्थितींत असतांनाच आमचा मुलगा हर्ष जन्मला. १९३५ फेब्रुवारीची पहिली तारीख होती. आईच्या आनंदाला सीमा नव्हती. तिचा हा पहिला नातू होता. कारण माझा भाऊ नि बहीण दोघांना मुलीच होत्या.

हळुहळू आई आजारांतून उठली. परंतु अन्ताचा हा केवळ आरंभ होता. ती पुन्हां पूर्वींसारखी कधींहि झाली नाहीं.

१९३५ च्या एप्रिलांत कमलाची प्रकृति अधिकच बिघडली. प्रवास झेपेल इतक्या शक्ति येतांच स्वित्झर्लंडमध्यें जायचा डॉक्टरांनीं सल्ला दिला. त्या वेळेस संयुक्त प्रांतांतील भोवाली या थंड हवेच्या ठिकाणीं ती होती. तिकडे स्वित्झर्लंडला ती जायला निघण्यापूर्वीं तिला भेटावें, तिच्याबरोबर कांहीं दिवस राहावें असें आम्हांला वाटलें. म्हणून राजा नि मीं जायचें ठरविलें. दोन महिन्यांचा बाळ बरोबर घेऊन आम्ही निघालों. पहाडांतील भोवाली गांवीं आलों, कमलाबरोबर महिनाभर आम्ही होतों. आणि कमला प्रकृतीसाठीं युरोपांत गेली, ती आम्हांला पुन्हां भेटणार नाहीं असें आमच्या स्वप्नांतहि नव्हतें. तशी कल्पनाहि आली नाहीं. जवळ जवळ पुढें वर्षानें कमला निवर्तली.

तिच्या मृत्यूची वार्ता आल्यावर चार दिवशींच आमचा मुलगा अजित जन्मला. :तविक त्याचा जन्मदिवस आनंदानें साजरा व्हायचा. परंतु कमलाच्या मृत्यूनें मच्या सर्वांच्याच जीवनावर एक दाट कृष्ण छाया पसरली होती. त्यामुळें बाळाच्या माचा आनंद मानायला आमचीं हृदये मोकळीं नव्हतीं, शोकभाराने तीं ओथबलीं ीं, जड झालीं होतीं. परंतु बाळाच्या जन्मामुळेच कमलाच्या मरणाचें दुःख थोडे सह्य ले. त्या प्रखर तीव्र आघाताची धार जरा कमी वाटली. बाळाने आम्हांला धीर दिला.

"अति सुंदर वस्तूंना मरणहि अति लौकर येतें. मरणोत्तरहि त्यांचा सुगंध राहतो. परंतु गुलाबावर ज्यानें प्रेम केलेलें असतें, त्याला तो सुगंध दुःखद वाटतो."

—फ्रान्सिस थॉम्प्सन

आनंदभवनांत वडिलांनीं एकदां मेजवानी दिली होती. त्या प्रसंगीं मीं कमलाला प्रथम पाहिले. मी त्या वेळेस लहान होतें. त्या भोजनसभारंभांत मला हजर राहूं दिलें नाहीं. परंतु व्हरांड्यांतून मी तो समारंभ पाहूं शकत होतें आणि त्याप्रमाणें पाहिलाहि. मला वाटतें माझ्या मावशीनें मला कमला दखविली. मावशी म्हणाली, "ती बघ तेथें एक मुलगी आहे. तुला आवडेल का ती? काय वाटतें तुला? ती तुझी वैनी व्हायची आहे." मावशीनें बोट केलें होतें तिकडे मीं पाहिलें; आणि उंच, सडपातळ, अति सुंदर अशी एक मुलगी मीं पाहिली. इतर कांहीं मंडळींसह ती तेथें बसली होती. वैनी म्हणजे काय तें मला नीट कळेना; परंतु ती मुलगी आमच्यांत राहायला येणार असा मीं तर्क केला. आणखी एक बहीण येणार म्हणून मला आनंद झाला. परंतु ही येणारी बहीण जरा लहान असती, माझ्या वयाची असती, तर अधिक बरें झालें असतें असें मला वाटलें. कमलेचें तें पहिलें दर्शन मीं कधीं विसरलें नाहीं,

विसरणार नाहीं: तिचें पाहिलेले ते पहिले प्रत्यक्ष चित्र. त्या वेळेस ती १७ वर्षांची होती. परिपूर्ण यौवनांत होती. एक प्रकारचा ताजेपणा तिच्यांत होता.

यानतर कांहीं महिन्यांनीं जवाहरचें दिल्लींत लग्न लागलें. कमला आमच्यांत राहायला आली. आपली लावण्यमयी नववधू सर्वांना दाखवतांना, या सुंदर सुनेची सर्वांना ओळख करून देतांना माझ्या आईबापांना किती अभिमान वाटत असे, किती धन्यता वाटत असे ते मला आठवतें; चांगलेच आठवतें. ती केवळ सुंदरच होती असें नव्हे, तर आरोग्याचीहि मूर्ति होती. तिच्याकडे पाहून कोणीहि असें भविष्य करायला धजला नसता कीं हिचें बहुतेक जीवन रुग्णशय्येवर जाईल म्हणून. कमला नि जवाहर यांच्या वैवाहिक जीवनाचा आरंभ तर सुरेख सुरू झाला असें वाटलें. उज्ज्वल भविष्य समोर दिसत होतें. क्षितिजावर ढगांचें नांवहि नव्हतें. सुखाचीं थोडीं वर्षें गेलीं. आणि नंतर एकाएकीं भराभरा फेरबदल होऊं लागले. घडी विसकटूं लागली. राजकारणानें जवाहरला नि वडिलांना नेलें, खोल पाण्यांत नेलें, दुष्काळांत सांपडलेल्या माणसासारखा दिसणारा दुबळा, शिडशिडित असा एक लहानसा माणुस आमच्या जीवनांत शिरला; आमच्याच नव्हे, तर आणखीहि अनेकांच्या जीवनांत शिरला. आणि त्यानें सारा इतिहास बदलला. प्रवाहाला निराळीच गति दिली. क्रान्तिकारक बदल होऊं लागले. उलथापालथी होऊं लागल्या. तो लहान माणूस म्हणजे गांधीजी कुटुंबांतील इतर मंडळींप्रमाणें कमलानें सुखविलासांचा त्याग केला. गांधीजींची ती अति निष्ठावत अनुयायिनी बनली. गांधीजींना कमलाविषयीं फार प्रेम वाटे. तिलाहि त्यांच्याविषयी आणि त्यांच्या आवडत्या ध्येयाविषयीं प्रेम वाटे.

कमलाला आतांपर्यंत कष्ट माहित नव्हते. दुःख काय ते तिला ठाऊक नव्हतें. लग्नापूर्वीं नि नंतरहि सुखाच्या नि सुरक्षिततेच्या जगांतच ती वावरत होती. कशाची काळजी नव्हती. उद्यां काय होणार याची कधीं फिकीर वाटली नाहीं. परंतु एकाएकीं हे सारें बदललें. निश्चिंतीच्या ऐवजीं चिंता आली. अनिश्चितता, ताटातुटी, हृदयवेदना, आणि शारीरिक व्याधि यांचें जीवन सुरू झालें. परंतु कमलेनें न डगमगतां, धैर्यानें, हंसतमुखानें सर्व परिस्थितीला तोंड दिलें. तिच्या तोंडून असमाधानाचा, तक्रारीचा, कुरकुरीचा, एक शब्दहि मीं कधीं ऐकला नाहीं. आपल्या इच्छेप्रमाणें साऱ्या घटना जेव्हां घडून येत नाहींत, त्या वेळेस आपण बहुतेक सारीं दैवाच्या नांवानें बोटें मोडूं लागतों. परंतु कमलानें दैवालाहि कधीं दोष दिला नाहीं; त्याच्याविरुद्ध आदळआपट केली नाहीं. जवाहरनें आपलें जीवन देशासाठीं देण्याचें ठरवतांच, कमला एक क्षणभरहि मागें राहिली नाहीं. त्यांच्याबरोबर तीहि उभी राहिली. देशाशिवाय दुसऱ्या कशाचाहि विचार ज्याच्या मनाला कधीं शिवला नाहीं, ज्याचा उत्साह कधीं सपला नाहीं, धैर्य ज्याचें खचलें नाहीं, असा परम-सैनिक भारतांत कधीं काळीं झाला असेल तर तो सैनिक

म्हणजे कमला होय. कमलेच्या धैर्यासारखे धैर्य क्वचितच कोठें दिसेल. कमलेबद्दल फारसें कोणाला माहित नाहीं. माझ्या एका मित्रानें तिच्याविषयीं लिहिलें आहे कीं "तिचें जीवन म्हणजे नदादीपाची तेजस्वी ज्योत होती. ही ज्योत थरथरे, मध्येच अधिक झळके, प्रदीप्त होई, अधिकच उत्कटतेनें पेटे. आणि जेव्हां तेल संपत आलें, तेव्हां मंद होत होत ती ज्योत मालवली." असें नेहमीं म्हणण्यांत येतें कीं, "देवांना जे आवडतात, ते तारुण्यांतच मरतात." ही गोष्ट खरी असावी. कारण कमलावर प्रेम केल्याशिवाय, तिच्या धैर्याची तारीफ केल्याशिवाय कोणालाहि राहवत नसे. पतीचें नि सासऱ्याचें महान् व्यक्तित्व जरी तिला झांकोळी, तरीहि तिनें राजकारणांत स्वतःचें असें स्थान निर्माण केलें होतें. मृत्यूनें अति निष्ठुरतेनें तिला नेलें नसतें, तर ती किती तरी कीर्तिमती झाली असती; मोठें यश तिनें मिळविलें असतें. दिसायला ती दुबळी दिसे, कृश दिसे: परंतु मनानें ती खंबीर होती. ती खरें नाणें होती, तिच्या त्या सौम्य वर्तनाच्या पाठीमागें, शान्त स्वभावाच्या पाठीमागें, त्या सौम्य स्निग्ध डोळ्यांच्या मागें अपार सामर्थ्य असे; ही गोष्ट जवळच्या परिचितांनाच माहित होती. तिच्यांत अनेक गुण होते, पुष्कळ दोषहि होते. ती इतकी बालसदृश स्वभावाची होती, कीं कोणी तो दोष म्हटला असता. अजून ही मुलगीच आहे असें वाटे. कधीं कधीं ती आपल्या प्रकृतीकडे मुळींच लक्ष देत नसे. आणि कितीहि तिला सांगितलें, तरी ती स्वतःची अधिक काळजी कधीं घेत नसे. तिला सारखीं दुखणीं येतच असत. आणि त्यांतच शेवटी तिचा अंत झाला. परंतु इतकीं दुखणीं येत असूनहि ती वृद्ध झाली आहे असें कधीं वाटलें नाहीं. पोक्तपणा, परिपक्वपणा तिला कधीं आला नाहीं. अखेरपर्यंत तिच्या तोंडावर कौमार्यातील मधुरतम अशी कोवळीक होती. एखाद्या मुलीसारखी तिची मुद्रा मोहक नी गोड दिसे. लग्नाच्या वेळेस जशी ती दिसे, तशीच शेवटपर्यंत दिसत होती. दुखण्यांनीं तिचें शरीर आंतून पोखरलें; परंतु बाह्य रूपांत फरक पडलेला इतक्या वर्षांत मीं तरी कधीं पाहिला नाहीं.

कमलाचें लग्न होऊन बरींच वर्षे झालीं, तरीहि तिच्याविषयीं मला फारसें ज्ञान नव्हतें. तिच्या स्वभावाचें फारसें दर्शन मला झालें नव्हतें. एक तर नवी नवरी म्हणून तिचे सारखे देव्हारे मांडण्यांत येत असत. पुढें ती निरनिराळ्या सामाजिक कामांत पडली. वडील पुष्कळ वेळां मेजवान्या द्यायचे. पाहुणे यायचे. आई तर आजारीच असे. तेव्हां या साऱ्या पाहुण्यांची सरबराई करण्याचें काम कमलावरच पडे. ती त्या समारंभांत यजमानीण बने. १९२६ मध्यें युरोपांत आम्ही एकत्र राहिलों. त्यावेळेसच खरी कमला मला कळूं लागली. आम्ही मैत्रिणी बनलों. जीवनांतील अनेक गोष्टींची आम्ही चर्चा करीत असूं; कधीं कधीं वादविवाद खूप रंगे. आम्ही प्रक्षुब्धहि होत असूं. जें आम्ही ऐकत असूं, वाचीत असूं, त्यावर पुष्कळदां स्त्रियांच्या हक्कांवर आमचे वाद होत; परंतु

हे वाद शेवटीं समाधानानें संपत. वादाचा शेवट गोड होई. युरोपांतील तिचा बहुतेक वेळ अंथरुणांत पडून राहण्यांतच जाई. परंतु तिची प्रकृति सुधारल्यावर, प्रवास झेपेल इतकी शक्ति आल्यावर जेव्हां आम्ही एकत्र हिंडलों फिरलों, तेव्हांचा आनंद अपूर्व होता. ते महिने फारच सुखांत गेले, मजेंत गेले. नवीन नवीन वस्तु पाहायला, नवीन नवीन गोष्टी शिकायला ती अधीर असे. एखादें वनभोजन असो, एखादी मेजवानी असो, अल्पोपाहाराला मंडळी आलेली असो, कमला त्यांत संपूर्णपणें रमायची, भाग घ्यायची. कितीहि थकल्यासारखें तिला वाटत असलें, तरी ती रसभंग होऊं देत नसे; आनंदांत विघ्न आणीत नसे. संताप यायला रास्त कारण असलें तरीहि ती शांत राही. चीड येण्यासारख्या परिस्थितींतहि, अशा गंभीर प्रसंगींहि ती मनाचा तोल संभाळी, संयम राखी. युरोपांतून परतल्यावर आम्हीं दोघीजणी अधिकच जवळ आलों. कारण आम्हीं दोघीजणींनीं राजकारणांत भाग घेतला आणि कामहि एकत्र केलें. तें काम करतांना कमलाचा उत्साह पाहून मी थक्क होत असें. माझी प्रकृति तिच्यापेक्षां किती तरी निरोगी, किती तरी चांगली; परंतु मी थकून जात असें, गळून जात असें. घरींच राहत असें. परंतु कमला नाहीं कधीं बसून राहिली; घरीं पडून राहिली; थंडी पडलेली असावी, तरी कमला पहांटे ५ ला उठायची. स्त्रीस्वयंसेविकांची आम्ही कवाइत घेत असूं त्यासाठीं ती तयार होऊन जाई. कवाइत पांच वाजतां असे. कवाइत वगैरे संपल्यानंतर सकाळीं आठाला आम्ही परदेशी कापडाच्या दुकानांवर निरोधन करायला जात असूं. संबंध हिवाळाभर कमला याप्रमाणें ठरलेलें सारें काम दिवसभर करीत असे. पुढें उन्हाळा आला. प्रखर ऊन पडायचें. अंगाची तलखी व्हायची, लाहीलाही व्हायची; परंतु कमळा आपल्या कामासाठीं उभीच. कडक थंडी असो, कडक उन्हाळा असो. कमलाच्या कामांत कधीं खंड पडला नाहीं. आमच्यापैकीं बहुतेक सारीच याप्रमाणें काम करीत होतीं. परंतु आम्ही पुष्कळदां कुरकुर करीत असूं, दमून जात असूं, निरुत्साही निःगतधैर्य होत असूं; तसें कमलाचें नसे. तिची श्रद्धा अभंग असे. तिची स्फूर्ति अनंत असे. उत्साहशक्ति अथांग असे; परंतु असें अपार काम करून ती थकली. आणि स्वतःला याप्रमाणें झिजवून तिनें आपलें मरण जवळ आणलें. तिचा उत्साह अगम्य असला, तरी शरीर जर्जर झालेलें होतें. त्या रोगशीर्ण, दुःखदग्ध शरीराला कामाचा हा अपार ताण सहन झाला नाहीं. आणि शेवटीं मृत्यूनें मात केली.

कमला जरी शान्तदान्त स्वभावाची होती, फारशी कोणाच्या अध्यांत मध्यांत न येणारी अशी जरी ती होती, तरी जीवनासंबंधीं तिचीं कांहीं निश्चित मतें होतीं, तिचे कांहीं निश्चित सिद्धान्त होते. आणि एकदां तिच्या मनानें एखादी गोष्ट घेतली, कीं त्याप्रमाणें ती वागल्याशिवाय राहत नसे. तिची नादुरुस्त प्रकृति तिचा निश्चय बदलूं शकत नसे. जवाहरनें कांहीं अशीं साहजिकच कमलाला झांकोळलें, तरी तोहि तिला संपूर्णपणें

झांकोळूं शकला नाहीं. तिला स्वतःचें असें स्वतंत्र व्यक्तिमत्त्व होतें. ती स्वयंप्रकाशित होती. स्त्रियांचा उत्कट कैवार घेणारी ती होती. स्त्रियांच्या हक्कांसाठीं आपल्या मित्रांशीं, सहकाऱ्यांशीं कितीदां तरी तिनें झुंज घेतली होती. पुरुषमंडळी कमलाविषयीं कुरकुर करीत. ते म्हणायचे, " आमच्या बायका आमचें न ऐकतां कमलाजींचेच ऐकतात, त्याप्रमाणें वागूं पाहतात. आम्हांला पसत नसणारीं कमलाजींचींच मतें आमच्या बायका उचलीत आहेत. आमचें कसें व्हायचें ?" कमलाची वृत्ति स्वतंत्र होती. स्वतंत्र बाण्याची ती स्त्री होती. स्वतंत्र प्रज्ञेची होती. कष्ट पडोत, अडचणी येवोत, रोग जर्जर करोत, तिची स्वतंत्र वृत्ति चिरडली गेली नाहीं. ती अजिंक्य राहिली. देशाच्या स्वातंत्र्याच्या लढाईंत अल्पस्वल्प भाग का होईना, आपल्याला घेतां आला म्हणून तिला अभिमान वाटे. आणि जवाहर कोट्यवधि जनतेचा आवडता झालेला पाहून तिला परम सुख होई, कृतकृत्य वाटे. जवाहर कीर्तीच्या शिखरावर चढलेला पाहून तिला वैषम्य नाहीं वाटलें; त्याचीं स्तुतिस्तोत्रे ऐकून तिला कधीं तिळभर मत्सर नाहीं वाटला.

१९३४ पासून पुढे कमलाची प्रकृति झपाट्यानें बिघडत चालली; अधिकाधिक खालावत चालली. भोवाली येथील आरोग्यधामांत तिला ठेवण्यांत आले. शेवटीं सारें चांगलें होईल असें वाटत होतें. त्यासाठीं आम्हीं प्रार्थना करीत होतों; तशी आशा मनांत खेळवीत होतों. किती तरी दिनरात्री चिंतेत गेल्या. कमला बरी होईना; हळूहळू दुखणें अधिकच बळावलें. जवाहर पुन्हां एकदां तुरुगांत होता. या वेळेस तो आल्मोरा तुरुगांत होता. मधून मधून कमलाला भेटण्याची त्याला सूट मिळाली होती. भेटण्याच्या वेळेची किती आतरतेनें तो वाट पाहत असे ! तीं दोघें ज्या घटका अशा भेटींत एकत्र दवडीत, त्या घटका किती पटकन जात असतील ! शेवटी कमलानें स्वित्झर्लंडला जावे असा डॉक्टरांनीं सल्ला दिला. तिकडे जाण्यापूर्वीं तिला भेटायला, तिच्याजवळ चार दिवस राहायला आम्ही भोवाली येथें गेलो होतों. राजा नि मी, दोघें गेलो होतों. माझा मुलगा तेव्हां दोन महिन्यांचाहि पुरा नसेल. परत माझ्या आईपेक्षांहि त्या बाळाला पाहून कमलाला आनंद झाला. आणि ती म्हणाली, " मी युरोपांतून परत आल्यावर मला जर असें दिसलें कीं तुम्ही या बाळाची नीट काळजी घेत नाहीं, तर तुमच्याजवळून तो मी घेऊन जाईन. सभाळा. याद राखा "

युरोपांत जायचा दिवस आला. आल्मोरा जेलमधून कमलाला निरोप द्यायला जवाहर आला होता. त्याला परवानगी देण्यांत आली होती. त्या हृदयद्रावक दिवशीं त्याच्या मनांत कोणते विचार येत असतील बरें ? मला सांगणें शक्य नाहीं परतु त्यावेळेस त्याच्या तोंडाकडे पाहून हृदय दुभग होई, शतचूर्ण होई. सारें दुःख त्या त्याच्या दोन डोळ्यांत जणूं येऊन उभें होतें. कठोर मुद्रा धारण करून आपलें दुःख लपवण्याचा प्रयत्न तो करीत होता. परंतु तो प्रयत्न व्यर्थ होता. एकमेकांचा निरोप

घेण्याचा तो क्षण आला. दोघांनीं मुखावर वीर-हास्य ठेवून निरोप घेतला. आणि मोटरींत बसून ती डोंगर उतरून स्टेशनकडे चालली. तेथून आगगाडींत बसून ती मुंबईला जाणार होती. जवाहरची मोटरहि वाट पाहत होती. डोळ्यांत अश्रु तसेच ठेऊन, ते न सांडतां त्यानें आईचा नि माझा निरोप घेतला. आईनें त्याला जवळ घेतलें; आणि त्यानें मला जवळ घेतलें. आमच्याकडे पाठ फिरवून तो गेला. मोटरकडे चालला. परंतु त्याच्या चालण्यांतील ती तेजस्विता आज नव्हती. जणूं स्प्रिंग तुटली. त्याच्या चालण्यांतील तो नित्य उत्साह, ती विद्युल्लेखा अकस्मात् नाहींशी झाली असें दिसलें. कांहीं घटकांपूर्वीं तो होता त्याहून किती तरी पटीनें तो वृद्ध झाल्याप्रमाणें वाटला; अति गळून गेल्यासारखा दिसला. पुढें कांहीं महिन्यांनीं जवाहरची सुटका करण्यांत आली. कमला अत्यवस्थ होती. विमानानें तो युरोपला गेला. स्वित्झर्लंडमधील लॉसने शहराच्या एका उपनगरांत १९३६ फेब्रुवारी २८ ला कमला देवाघरीं गेली. तिच्याजवळ जवाहर नि इंदिरा होतीं.

" कांहीं छाया, कांहीं प्रकाश, कांहीं विजय, कांहीं अश्रु, आणि झपाट्यानें जाणाऱ्या वर्षांचें वाढतें ओझें. "

—एडन फिल्पॉट

कमलाच्या निधनानंतर मार्च १९३६ मध्यें जवाहर हिंदुस्थानांत परत आला. स्वित्झर्लंडमधील एका शाळेंत त्यानें इंदिरेला ठेविली; त्याला भेटायला मी अधीर होतें. परंतु माझा दुसरा मुलगा निदान महिन्याचा तरी व्हावा म्हणून मी थांबलें. या वेळीं जवाहरकडे जाणें म्हणजे दुःखमय होतें. तो प्रवास सुखाचा नव्हता. कमलाच्या करुण निधनानंतर जवाहरला भेटण्याचा मला धीर होत नव्हता. भीति वाटत होती. कमलावर माझें प्रेम होतें. माझ्या मनःस्थितीवरून जवाहरची कशी असेल त्याची कल्पना मला येत होती. कधींहि भरून न येणारी अशी जवाहरची हानि झाली होती. त्याचें मोलाचें निदान हरपलें होतें.

आम्ही आनंदभवनाच्या दाराशीं आलों. जवाहर आम्हांला भेटायला बाहेर आला. कांहीं महिन्यांपूर्वीं तरुण दिसणारें त्याचें मुखमंडल, वृद्ध दिसूं लागलें. दुःखाच्या रेषा त्या तोंडावर दिसत होत्या. अतिच थकलेला नि शिणलेला तो दिसत होता. त्याला कांहीं सुचत नव्हतें. जणूं बेचैन झाला होता. हृदयाची वेदना लपविण्याची तो पराकाष्ठा करीत होता. परंतु त्याच्या भावनोत्कट खिन्न डोळ्यांत, भावदर्शक दुःखी डोळ्यांत

शोकाचा सागर भरलेला दिसत होता. आणि जे त्याच्याजवळ सारखे होते, त्यांना त्याची ती विदीर्ण स्थिति पाहून दुःख झाल्याशिवाय कसें राहणार? अलाहाबादला पधरा दिवस राहून नतर आम्ही लखनौला गेलो. सारीच गेलो. कारण राष्ट्रीय सभेचे तेथें अधिवेशन होतें.

आणि त्या वर्षी जवाहरच अध्यक्ष म्हणून निवडला गेला होता. नेहमींप्रमाणें राजकारणांत त्याचा काळ जाऊ लागला. वैयक्तिक हानि, वैयक्तिक दुःख दूर ठेवण्यांत आलीं. जरी अतरीं दुःखी होता, जरी त्याला मनांत शून्य वाटत होतें, तरी बाहेर अपरपार कार्यांत तो मग्न होता. किती तरी परिषदा तेथें होत्या. भरपूर काम होतें. आणि लखनौनतर पुढल्या वर्षी पुन्हां फैझपूर येथेंहि तोच अध्यक्ष निवडला गेला.

फैजपूरच्या अधिवेशनानतर प्रांतिक विधिमंडळाच्या सर्व देशभर निवडणुका व्हायच्या होत्या. कॉंग्रेसच्या उमेदवारांसाठीं जवाहरनें तुफानी दौरा देशभर काढला. विजेप्रमाणें तो सर्वत्र गेला. वाऱ्याप्रमाणें फिरला. देशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत तो गेला. शहरांतून गेला. खेड्यांतून गेला. शेंकडो सभांतून बोलला. मागच्या लढयानतर पुन्हां डोकें वर काढणाऱ्या जनतेंत त्यानें उत्साहाची लाट आणली. त्यांना प्रेरणा नि स्फूर्ति दिली. सात प्रांतांतून राष्ट्रीय सभेला बहुमत मिळालें. आणि व्हाइसरॉयजवळ करार करून सात प्रांतांतून राष्ट्रीय सभेचीं मत्रिमंडळें स्थापण्यांत आलीं. मंत्रिमंडळें स्वीकारण्यापूर्वी पुष्कळ भवति न भवति झाली. परंतु अधिकारस्वीकाराचा निर्णय शेवटीं घेतला गेला. कॉंग्रेसचे बहुतेक मंत्री किती तरी वर्षें तुरुगांच्या गजांआड राहिलेले होते. माझी बहीण स्वरूप–तीहि एक मंत्री बनली. हिंदुस्थानांतील पहिली ती एकच स्त्री-मंत्री ती होती

लहानपणापासूनच स्वरूप मोठी धोरणी होती. मंत्री व्हायला ती खरोखरच लायक होती. ती बहुधा प्रक्षुब्ध होत नाहीं. कसलाहि प्रश्न असो, कशीहि परिस्थिति असो, सर्व प्रकारच्या परिस्थितींत ती शांतपणें वागते. स्थिर–मति नि सुंदर, मोहक नि वाहून न जाणारी अशी स्वरूप आहे. त्यामुळें सर्वांना जिंकून घेणें तिला कठिण नाहीं जात. मंत्री या नात्यानें तिनें चांगलेंच यश मिळविलें. अशा प्रकारच्या कामाला लागणारें शिक्षण तिनें घेतलेलें नव्हतें; तिनें कठिण काम अंगावर घेतलें होतें. परतु तिनें आपली कामगिरी उत्कृष्टपणें बजावली. ती लोकप्रिय झाली. स्वरूपनें राजकारणांत भाग घ्यायला जेव्हां आरंभ केला, तेव्हां तिची वक्तृत्वशक्ति पाहून आम्ही चकितच झालों. जणूं ती उपजतच त्या कलेंत पारंगत होती. सभा किती का मोठी असेना, ती गोंधळून जात नसे, गडबडून जात नसे. हिंदुस्थानी नी इंग्रजी–दोन्ही भाषांत ती अस्खलितपणें नि सहजतेनें बोलते.

तरुणपणांतच तिचे केस जरा पिंगट होऊं लागले–आणि नतर झपाट्यानें भराभरा शुभ्र होऊं लागले. आमच्या कुटुंबांतीलच हा परंपरागत दोष आहे. स्वरूपचे केस आज सारे रुपेरी आहेत. परंतु ते तिची चारुता अधिकच खुलवतात.

ती उत्कृष्ट माता आहे, कार्यक्षम गृहिणी आहे. राजकारणांत तिचा बराचसा वेळ जात असला, तरीहि ती घरांत लक्ष देते, मुलांकडे बघायला वेळ काढते, रावड मिळविते.

वर्षांतून दोनतीन वेळां जवाहर मुंबईस येत असे. आमच्याकडे राहत असे. तो जवळ असावा असे वाटे. परंतु शेकडों कार्यक्रम आंखलेले असायचे. त्यांत तो मग्न असावयाचा. त्याच्याजवळ बोलायला बसायला फारसे मिळत नसे. तो आमच्याकडे असला म्हणजे आमच्या लहानशा घरांतील शांत असे रोजचे व्यवहार पार बदलून जात. उजाडले नाहीं तोंच पाहुणे येऊं लागत आणि मध्यरात्रीपर्यंत हे सत्र सुरू असे. शेकडोंची जा-ये सुरू असायची. कोणी आधी ठरवून येत, तर कोणी दर्शनार्थ येत. टेलिफोन सारखा वाजत असायचा. दारांतील घंटेला विश्रांति नसायची. आणि या दोहों-मध्ये माझा सारा वेळ जायचा. कधीं दारांत जावें लागे, तर लगेच फोनवर धांवावें लागे. जेवणाची ठरीव वेळ नसे. एकान्त नसे. दुपारीं जेवायला किती येतील, रात्रीं किती येणार याचा अंदाज नसे. मला स्वयंपाकघर लवचिक ठेवावें लागे. आयत्या वेळेस दहा वीस पाहुणे आले, तरी त्यांनाहि लगेच वाढतां येईल अशी तयारी ठेवावी लागे.

जीवन म्हणजे धांवपळ असे नुसती दम घ्यायला, श्वास घ्यायला फुरसत नसे. जेवायच्या वेळेस तेवढा जवाहर दिसायचा किंवा त्याच्या सभांना आम्ही त्याच्याबरोबर गेलों, तर तो दिसायचा; क्वचित् एखादे वेळेस तो जेव्हां आमच्या वांद्र्याला यई तेव्हां किती आनंद आम्ही लुटीत असू. वेळ पटकन जायचा. तो गमतीच्या गोष्टी सांगे, आठवणी, आख्यायिका सांगे. हसे, हसवी. खूप बोलायचा. कधीं चर्चा चाले. आमच्या घरगुती गोष्टींचाहि ऊहापोह होई. कधीं सायंकाळीं जर तो घरीं असला, तर तो इंग्रजी कविता म्हणे व वाचून दाखवी. कविता म्हणत असतांना किंवा वाचीत असतांना तो आपणास तन्मय करतो. ते ऐकणें म्हणजे परम आल्हाद असतो. जवाहर फारच सुंदर रीतीनें कविता म्हणतो वा वाचतो.

१९३८ च्या जानेवारींत आई अकस्मात अर्धांगाच्या झटक्यानें निवर्तली. आणि २४ तास झाले नसतील तोंच आईची मोठी बहीण–आमची मावशी तीहि वारली. तिलाहि तसाच झटका आला. दोन अति दुःखाचे प्रसंग. दोन शोककारक मृत्यु. तो कठोर, निर्दय आघात होता. मुदैवानें मी त्या वेळेस अलाहाबादला होतें. मी मुंबईला रडत आलें, दुःखमूढ होऊन आलें, शोकबधिर होऊन आलें. आईशिवाय असणारें ते घर ! तें आतां पूर्वीसारखें कसें होणार ! त्या जुन्या जीवनांतील असें कांहीं गेलें, जें पुन्हां कधीं येणार नाहीं.

पुढें कांहीं महिन्यांनीं त्याच वर्षी जवाहर युरोपला जायला निघाला. इंदिराला भेटायला तो जात होता. राजाला नि मलाहि जायची इच्छा होती. परंतु शेवटच्या क्षणीं राजाला काम सोडून जाणें अशक्य झालें. जवाहरबरोबर मीं जावें असे त्याने सुचविलें. परंतु राजाशिवाय जाण्याची कल्पना मला आवडली नाहीं. शिवाय दोन लहान मुलगे मागें ठेऊन जाणें बरें दिसेना. शिवाय राजाबरोबर युरोपांत जायची माझी योजना कधींपासूनची होती. मग एकटीच कशी जाऊं ? जवाहर एकटाच गेला. मागून वाटले कीं त्याच्याबरोबर गेलें असतें तर बरें झालें असतें. कारण यादवी चाललेल्या स्पेनमध्यें तो गेला होता. त्याची स्पेनमधील सफर साहसाने भरलेली होती, चेतना देणारी होती. नाना अनुभव देणारी होती. येतांना तो इंदिराला थोडे दिवस घेऊन आला. तिला लहानशी सुटी होती.

१९३९ च्या एप्रिलमध्यें आपला अभ्यास पुढें चालवायला इंदिरा इंग्लंडला परत जायला निघाली. पुन्हां एकदां राजा नि मी दोघांनीं पृथ्वीपर्यटणाची योजना आंखली. साऱ्या जगाचा प्रवास करायचा असा बेत रचिला. इंग्लंडपर्यंत इंदिराहि बरोबर असती. परंतु पुन्हां सारे बेत फिसकटले. परंतु कॉंग्रेसनें नेमलेल्या "नॅशनल प्लॅनिंग" कमिटींतील काम सोडायला राजा त्या वेळेस तयार नव्हता. शेवटच्या क्षणीं आम्ही आमचीं तिकिटें रद्द केलीं. क्षितिजावर महायुद्धाचे काळे ढग दिसूं लागले होते. परंतु आम्ही पुढें जाऊं अशी आशा करीत राहिलों. ती आशा अर्थातच् विफल झाली. कारण महायुद्ध सुरू झालेंच.

१९४० च्या अखेरीस इंदिराने कायमचें घरीं परत यायचे नक्की केलें. मध्यंतरीं एका कठिण दुखण्यांतून जावें लागल्यमुळें ती स्वित्झर्लंडमध्यें कांहीं दिवस गेली होती. पाहिल्या मिळणाऱ्या विमानानें ती येणार असें मला कळलें. ती येणार म्हणून आनंद झाला. परतु विमानाने येणार म्हणून जरा चिंता वाटली. जवाहर डेहराडूनच्या तुरुगांत होता; मीं माझी चिंता त्याला कळवली. त्याने आपल्या तडकाफडकी पद्धतीनें मला लगेच उत्तर लिहिलें. आणि माझ्या भीतीबद्दल त्यानें माझी चांगलीच हजेरी घेतली. मी एखाद्या म्हाताऱ्या आजीबाईप्रामाणे घाबरावे हें त्याला रुचलें नाहीं. त्यानें उत्तरांत लिहिलें,

" इंदूनें परत यायचे ठरवले म्हणून आनद झाला. वाटेंत सर्व प्रकारचीं सकटें, धोके हे असणारच. परतु तिकडे इंदूने एकटे दुःखीकष्टी राहण्यापेक्षां सकटे, धोके यांना तोंड देऊन येणें बरें. तिला यायचे असेल, यावेसे वाटत असेल, तर तिनें निघून यावें नि साऱ्या परिणामांना तयार राहावें.

"आम्ही तिच्याकडे पाहत होतों. रात्र होती. तिचा श्वासोच्छ्वास चालला होता. परंतु किती मंद नि हळू चालला होता. जीवनाची लाट तिच्या हृदयांत खालीवर होत होती. आमच्या उत्कट आशा भीतीला खोटें पाडीत होत्या; आणि आमच्या भीति आशांना खोटें पाडीत होत्या. ती निजली होती तेव्हां ती मेली असें वाटलें. ती मेली तेव्हां निजली आहे असें वाटलें; कारण जेव्हां ती अंधुक नि उदास सकाळ आली, आणि नुकत्याच पडलेल्या पावसानें सारें गारठून गेल्यासारखें झालें होतें, तेव्हां तिच्या त्या शांत पापण्या मिटल्या, आमच्या सकाळपेक्षां तिची निराळी सकाळ होती."

—थॉमस हुड

माझी आई अतीव सुंदर होती. नाजुक, सुकुमार होती. पांच फूट जेमतेम तिची उंची असेल. ती एका विशिष्ट काश्मीरी वळणाची स्त्री होती. निर्दोष अशी तिची आकृति. सरें प्रमाणबद्ध; सारें रेखीव; जणूं एक गोडशी बाहुली. परंतु ही बाहुली बहादूर होती हें पुढें दिसून आलें.

तिच्या कुटुंबांतील ती सर्वांत लहान मुलगी होती. तिला एक भाऊ होता. दोन वडील बहिणी होत्या. तिची सर्वांत मोठी बहीण तिच्याहून दहा वर्षांनीं मोठी होती. आणि तिनेंच तिला वाढविलें. दोघींचें एकमेकींवर अपार प्रेम. एकमेकींस त्या जीव कीं प्राण करीत.

तिची बहिणींत आई सर्वांत धाकटी नि सर्वांत अधिक रूपलावण्यसंपन्न असल्यामुळे कुटुंबांतील सर्वांची ती लाडकी होती. तिचे लाड व्हायचे, तिला खाऊ मिळायचे. एखाद्या बाहुलीला जसें जपून वागवावें लागते, तसे तिला वागवीत तिच्या वयाच्या इतर मुलींना साधारणपणें जसें वागविण्यांत येते, तसें तिला वागविण्यांत येत नसे. जणुं तिचे कांहीं दुखेल खुपेल, कोठें धक्का लागेल. लहानपणींच तिचे लग्न झालें आणि ती आपल्या पतिगृहीं गेली. त्या घरांत तिच्या ओळखीचें कोणीच नाहीं. सारेच परके. कोणी कठोर, कोणी कृपाळ. माझी आजी सामान्य स्त्री नव्हती. ती तिच्या-परी मोठी होती, तिच्या अंगी बरेच गुणही होते. परंतु किती झालें तरी जुन्या वळणाचीच ती होती. सासूपणा तिच्याजवळ होता. एकत्र कुटुंबपद्धति मोडेपर्यंत आईचे दिवस फारसे सुखाचे गेले नाहीत. विभक्त झाल्यावर तिचें स्वतःचे घर झालें. घराची ती स्वामिनी झाली. परंतु या स्वतःच्या घरांतहि एखाद्या अमोल रत्नाप्रमाणें तिला वागविण्यांत येई. स्त्रीचे हृदय ज्याची ज्याची म्हणून इच्छा करणें शक्य असेल, तीं तीं सर्व सुखें वडिलांनीं आईसमोर ठेविलीं. कशाला तोटा नव्हता. जणु साऱ्या ऋद्धिसिद्धि हात जोडून समोर उभ्या होत्या. परंतु जगांतील सारीं सुखें सभोंवतीं असूनहि मानवाला अत्यंत आवश्यक अशी एक गोष्ट तिच्याजवळ नव्हती. आणि ती म्हणजे आरोग्य.

जवाहर जन्मल्यापासून आईची प्रकृति बिघडलीच. मधून मधून ती फार आजारी पडायची. जिवांवरचीं दुखणीं यायचीं. प्रत्येक आजार तिला अधिक अशक्त करून जाई. कोणतेही उपचार तिला आराम देत ना, आरोग्य देत ना. युरोपांतील तज्ज्ञतम डॉक्टरांचे उपचार करायला मिळावेत, म्हणून वडील तिला घेऊन तिकडेहि गेले. परंतु सारे उपचार निरुपयोगी ठरले. मला क्वचितच् असा काळ आठवतो कीं ज्या वेळेस आई खडखडीत बरी होती; निरामय नि निरोगी होती; नीट खातेपिते, आमच्याप्रमाणेच रोजचें जीवन जगते, असें कधींच झालें नाहीं. आईने मुलाची काळजी घेणें म्हणजे काय, मुलांचें दुखलेंखुपलें वगैरे सारखें पाहणें म्हणजे काय, याचा लहानपणीं मला कधीं अनुभव आला नाहीं. कारण जेथें आईचीच काळजी सदैव घ्यायला लागायची तेथें आई आमची काळजी कशी घेणार ? माझी काळजी कशी घेणार ?

आणि अशा रीतीनें वर्षे जात होतीं. मला माझी आई म्हणजे कल्पवृक्षाचें दुर्मिळ असें पुष्प वाटे. अति रमणीय असें पुष्प. ज्याच्यावर सर्वांनीं प्रेम करावें, जें सर्वांनीं हृदयाशीं धरावें, पुजावें; जीवनांतील क्षुद्र चिंतांपासून, नाना अपायांपासून ज्याला सांभाळावें, त्यांचा स्पर्शहि ज्याला होऊं देऊं नये. १९२० पर्यंत आपल्या लहानशा राज्यावर आई एखाद्या राणीप्रमाणें राज्य करीत होती. सारे सुखोपभोग, प्रेम, सहानुभूति यांनीं ती परिवेष्टित होती. आपल्या विख्यात पतीचा, तेजस्वी पुत्राचा, आपल्या आनंद-

भवनाचा तिला अभिमान होता. दुःखानें क्वचितच् कधीं तिला स्पर्श केला असेल. असहकाराचें युग येईपर्यंत चिंताहि दूर होती. आणि नंतर? थोड्याशा आठवड्यातच जन्माच्या सवयी दूर ठेवाव्या लागल्या. आमच्या लहानशा घराण्यांत एक लहानशी क्रान्तिच झाली.

नवीन परिस्थितीशीं जुळवून घेणें बाकीच्यांना तितकें कठिण गेलें नाहीं. परतु आईला नि वडिलांना जीवनाकडे पाहण्याची सारी दृष्टिच बदलणें भाग होतें. स्वतःच्या साऱ्या सवयी बदलणें भाग होतें. आणि ती गोष्ट सोपी नव्हती. वडील साठीच्या घरांत. आईची पन्नाशी उलटलेली. अशा वयांत हे क्रान्तिकारक बदल करणें, जुनी कात टाकून संपूर्णपणें नवीन घेणें कठिण होतें. परतु माझ्या आईबापांनीं एका क्षणांत सारें जीवन बदलून टाकलेलें पाहून लोकांनीं तोंडांत बोटें घातलीं. एका घडींत चमत्कार झाला. वडिलांना जीवनांतील चांगल्या गोष्टी प्रिय होत्याः चांगले कपडे, चांगले अन्न, ऐषआरामी जीवन हें त्यांना आवडत असे. आईनें उत्तमोत्तम वस्त्रांशिवाय दुसरीं वस्त्रें कधीं वापरलीं नाहींत. पाहिजे असे ते तिला सदैव मिळत असे. इच्छित वस्तूशिवाय राहावें लागलें असें कधीं झाले नाहीं. हालअपेष्टा म्हणजे काय, कष्ट, ददात म्हणजे काय ते तिला माहित नव्हतें. तरीहि एक ब्र न काढतां, जराहि कुरकुर न करतां ती खादी वापरूं लागली. जड, जाड, ओबडधोबड लुगडीं नेसूं लागली. त्यांचें ओझेंहि तिला सहन होत नसे.

आईचें यापुढचें जीवन म्हणजे एक अग्निदिव्य होतें. हृदयवेदना, त्याग, अनत चिंता यांचेच ताट आतां वाढलेलें होतें. ज्यांच्यावर तिचें अपार प्रेम, ज्यांना ती जीव कीं प्राण करी, तीं सारीं त्या भेसूर जेल-भिंतींच्या आड गेलेलीं. सदैव ताटातुटी. आमची ही लहानशी आई, नाजुक नि हळुवार अशी ही आई कांहीं करूं शकेल असें आम्हांला कधींहि वाटलें नव्हतें. परंतु त्या दुबळ्या शरीरांत अमोघ धैर्य होतें, अपार सकल्पशक्ति होती, असें दिसून आलें. कितीहि आपत्ति कोसळल्या, कितीहि दुःखें आलीं, तरी तिचें ते धैर्य, तिचा तो निश्चय अभंगच राहिला.

यानतरचीं वर्षें म्हणजे तिची कसोटी होती. तिची सत्त्वपरीक्षा होती. परंतु उतारवयांत ससारांत हे जे बदले करावे लागले, त्यामुळें ती कधीं कष्टी झाली नाहीं. कधींहि दुःखाचा, कुरकुरीचा शब्द चुकूनहि तिच्या तोंडांतून बाहेर पडला नाहीं. घरांत पूर्वी जेथें सुरक्षितता होती, सुखशांति होती, तेथें सारी अनिश्चितता आली, सकटें आलीं. परंतु खरेंच आश्चर्य वाटतें, कीं अशा सर्व परिस्थितींतहि आई चांगली नीट राहूं शकली. तिनें आपली प्रकृति जरा बरी सांभाळली. परंतु वडिलांच्या मृत्यूनंतर मात्र ती तग धरूं शकली नाहीं. ती निस्त्राण झाली जुन्या विचारांची अंतरंगीं असल्यामुळें आपण पूर्वजन्मीं कांहीं तरी भयंकर पाप केलें असेल, म्हणून आपला पति हिरावण्यांत

आला असें तिला वाटे. तिला नेहमीं वाटत असे कीं आपण आधीं मरूं, भरल्या कपाळानें जाऊं. कारण ती नेहमीं आजारी आसायची. प्रकृति नीट नसायची. आणि वडील एक दिवसहि कधीं आजारी पडले आहींत. आजार काय ते वडिलांना माहितच नव्हतें. तुरुंगांतील जीवनामुळें, तेथील मारक वातावरणामुळें वडील लौकर मेले.

जवळ जवळ पन्नास वर्षें दोघें एकत्र नांदलीं; सुखदुःखांत भागीदर झालीं. वडिलांच्या सामर्थ्यावर आई नेहमीं विसंबून असे. शारीरिक परिस्थिति बिकट असो वा मानसिक बिकट असो. आपला पति आपणांस तारून नेईल असा तिला विश्वास असे. सुखाच्या काळांत, त्याचप्रमाणे त्या दोघांनाहि ज्याला तोंड द्यावें लागलें अशा दुःखाच्या काळांतहि त्यांनीं तिला प्रेमानें सांभाळलें. ते तिची सदैव काळजी घेत. वडिलांशिवाय आईला शून्य वाटे. मृतवत् वाटे; भांबावल्यासारखें, आंधळ्यासारखें वाटे. तिला परिस्थितीशीं बरेच दिवस नीट जुळवून घेतां आले नाहीं. अशा या काळांत जवाहर तिचा आदर्श पुत्र होता. स्वतःची झालेली अपरंपर हानि त्याचें हृदय विदीर्ण करीत होतीच परंतु आपलें दुःख गिळून आईला वाटणारें दुःख हलकें व्हावें म्हणून तो शक्य तें सारें करी. त्या दिवसांतील त्याचा मृदु शांत स्वभाव, त्याची मातृभक्ति, यांचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे; त्या गोष्टी इतक्या पवित्र आहेत, कीं त्यांची वाच्यता करणें बरें नव्हे; त्या बोलून दाखवणें ठीक नव्हे.

आई वडिलांनंतर जीवन कंठीत होती. परंतु आपल्या मुलांसाठीं, विशेषतः जवाहरसाठीं जणूं ती जगत होती. कमलाच्या मृत्यूनें तिच्यावर आणखी एक आघात झाला. जीवनांतील समस्यांना, प्रश्नांना तोंड देण्याचे सामर्थ्य अतःपर तिच्याजवळ उरलें नाहीं. दिवसेंदिवस ती अधिकाधिकच अशक्त होत गेली.

१९३८ मध्यें मुलांना घेऊन वार्षिक भेटीसाठीं मी अलाहाबादला गेलें. दरवर्षी मी एकदां जात असें. एक महिनाभर या वेळेस राहिलें. मुबईस परत जाण्याचा ठरलेला दिवस आला. परंतु आई सारखा आग्रह करून दिवस पुढें ढकली. एके दिवशीं संध्याकाळीं आम्ही सारीं एकत्र होतों. जवाहर, स्वरूप, तिचे यजमान, त्यांचीं मुलें नि मी–सारीं तेथें होतों. गेले कांहीं दिवस आईला जरा शक्ति आल्यासारखें वाटत होते. तिला उत्साह वाटत होता. आणि त्या संध्याकाळीं तर तिच्यांत जणूं स्फूर्ति आली होतो.

रात्रीं आम्ही जेवत असतांना ती आमच्याजवळ बसली. आणि किती तरी जुन्या आठवणी सांगूं लागली. जणूं आज ती स्मृतीच्या साम्राज्यांत गेली होती. रोजच्यापेक्षां ती किती तरी अधिक बोलली. ती बरी आहे, सुखी आहे असें पाहून अम्हांलाहि बरें वाटलें. जेवल्यानंतर आम्हीं बसलों, गप्पा मारल्या. रात्रीचे साडेदहा वाजले. त्या रात्रीं स्वरूपला लखनौला जायचे होते. तिची गाडी बाराला होती. आई म्हणाली, " मला कांहीं झोंप

येत नाहीं स्टेशनवर जायला स्वरूप निघेपर्यंत मी बसून राहीन." आम्हीं तिला परावृत्त करण्याची खटपट केली. परंतु ती ऐकेना. म्हणून आम्हीहि बोलत बसलों. आई हळूहळू शांत, अति शांत होत होती.

अकराला स्वरूपनें जायची तयारी केली. ती उठली. ती आईजवळ निरोप घ्यायला गेली. स्वरूपला पोटाशीं धरण्यासाठीं आई उठली; परंतु एकाएकीं तिला झटका आला: जरा वांकडीतिकडी झाली. जवाहर नि मी पटकन स्वरूपच्या साहाय्याला धांऊन गेलों नसतो, तर आई खालीं पडली असती. आम्हीं तिला अंथरुणावर ठेवलें, परंतु तेथें ठेवण्यापूर्वीच तिची शुद्ध गेली. अर्धांगाचे पूर्वी दोन झटके आईला येऊन गेले होते. हा तिसरा होता. डॉक्टरांना बोलावण्यांत आले. परंतु मान हलवून ते म्हणाले, " आशा नाहीं; दोनचार तासांत सारें संपेल."

मृत्यु अशा प्रकारें येईल ही मला कल्पनाहि नव्हती. मी स्तंभितच झालें. अशी अकस्मात् आई गेली कशी ? एक शब्दहि न बोलतां, शेवटचा मुकाहि न घेतां अशी कशी कायमची माझी आई गेली ? माझी लहानशी आई. आमचा मुका घेतल्याशिवाय ती आम्हांला कधीं बाहेर जाऊ देत नसे. घरांतून घटकाभर जरी बाहेर जायला आम्ही कोणी निघालों, तरी ती आम्हांला जवळ घेईल, पापा घेईल नि म्हणेल जा आतां. अशी प्रेमस्नेहमयी, वात्सल्यमयी आई ! ती गेली हें शक्यच वाटेना. डॉक्टरांचा निर्णय दूर फेंकावा असे वाटलें. हे डॉक्टर कांहीं तरीच सांगतात, झूट सांगतात, असे वाटे. मला त्या डॉक्टरांचा राग आला होता. तेहि आमच्यासारखेच वाट पाहत उभे राहिले. ते कांहीं उपायच करीनात. असे कसे डॉक्टर ? असे वाटे.

आईच्या बिछान्याभोंवतीं रात्रभर आम्ही बसून होतों. तिच्याकडे पाहत होतों. जवाहर, स्वरूप, मी, आणि आमची मावशी बिबीअम्मा. पहांटे पांच वाजतां घरघर थांबली. ती तेथें शांत पडून होती. जणु झोपली होती. अश्रुपूर्ण नयनांनीं हलक्या आवाजांत जवाहर म्हणाला, " आईहि गेली " आणि तेव्हां मला अति दुःखमय असे भान आले, अति वेदनामय असे ज्ञान झालें कीं माझी ती लहान प्रिय पूज्य आई अशा झोपेत गेली आहे कीं जेथे पुन्हां जागृति नाहीं. माझें दुःख मी दाबून ठेऊ पाहत होते. परंतु फुकट; दुःखानें आंत जणू जळून जात होतें. डोळ्यांतून पाणी येईना, तिच्या बिछान्याभोंवतीं इतरांसह मी उभी होतें. श्वास घेण्याचेहि धैर्य होत नव्हतें. आईचा प्राण गेला तेव्हां मावशी तेथें खोलींत नव्हती. तिला ती गोष्ट सांगायला जवाहर नि स्वरूप गेलीं. आतां आईजवळ मी एकटीच होते. आणि अश्रूंचा पूर धांवून आला. मला ते आवरतना. हळूच मीं गुडघे टेंकले. आईला शेवटचा मुका निरोप दिला.

शेवटचा प्रणाम केला. नंतर एकदम मी खोलीच्या बाहेर वेगानें गेलें. वाटलें कीं माझे हुंदके तिच्या शांतीचा भंग करतील, तिची झोंपमोड करतील.

आईच्या प्रेतयात्रेला हजारों लोक आले. आम्हीं तिला फुलांनीं शृंगारली. किती सुंदर दिसत होती ती! तिच्या तोंडावरच्या रेषा, सुरकुत्या नाहींशा झाल्या होत्या. ते गुळगुळीत दिसत होतें, सजीव भासत होतें. ती जिवंत नाहीं असें क्वचितच कोणी मानता.

पुन्हां एकदां आनंदभवनावर अंधेरी आली. दुःखाची, औदासीन्याची छाया पसरली. स्वतःच्या स्वामिनीच्या चिरवियोगामुळे आनंदभवन उजाड खिन्न दिसत होतें.

" कांहींनीं नांव मिळविलें, कीर्ति मिळविली, मानसन्मान मिळविला; ते विद्वान होते; शहाणे नि बलवान् होते; कांहींचें नांवगांव माहित नाहीं, अशिक्षित होते ते; दरिद्री होते. सर्व बाबतींत ते दुबळे होते. परंतु दोन बाबतींत नाहीं. दुःख नि अन्याय यांच्यासमोर ते वांकत नसत. तेथें दुबळेपणा नसे. "

—वुइल्यम मॉरिस

माझी सर्वांत मोठी मावशी, तिला आम्ही 'बिबीअम्मा' म्हणत असू. ती बालविधवा होती. स्वतःच्या जीवनांत राम उरला नसल्यामुळें तिनें. माझ्या आईसाठीं सारें जीवन दिलें. त्या दोघी सख्ख्या बहिणी खऱ्या. परंतु दोघींच्या स्वभावात जमीन-अस्मानाचें अंतर. मावशी आईहून मोठी. परंतु अकालीं वैधव्य आल्यामुळें ती शांत परंतु कार्यक्षम अशी तरुण स्त्री बनली. आपलें जीवन खडतर असणार हें तिनें ओळखलें होतें. कोणावरहि अवलंबून न राहतां, स्वतःच्या पायावर उभें राहायला शिकलें पाहिजे अशी तिनें मनांत खूणगांठ बांधली. हें ध्येय डोळ्यांसमोर ठेवून ती आपल्या मनोबुद्धीला शिकवूं लागली. या कठोर व निष्ठुर जगांत मला स्वाभिमानानें जगायचें आहे, या जगाच्या लहरीवर लोंबकळत राहायचें नाहीं, असें तिनें स्वतःशीं ठरविलें. आणि तदनु-रोधानें स्वतःची ती तयारी करूं लागली. स्वतःला सु-क्षम करूं लागली, कार्यक्षम करूं

लागली. तिला यश आलें. कारण ती अति बुद्धिमान् होती, अति हुशार होती. इंग्रजीचा शब्दहि तिला माहित नव्हता; परंतु संस्कृतचा चांगलाच अभ्यास तिनें केला होता. ती संस्कृतमधील पंडिता होती. कोणत्याहि प्रकारचा धंदाहि ती पटकन उचली. वडील नेहमीं म्हणत कीं बिबीअम्माला आवश्यक ते सारें शिक्षण जर मिळालें असते, सर्व अनुकूलता जर तिला मिळाली असती, तर ती उत्कृष्ट वकील झाली असती. ती दक्ष होती, अतिधूर्त होती. तिची विनोदशक्ति अपूर्व होती.

विधवा असल्यामुळें स्वतःचें असें तिला घर नव्हतें. निरनिराळ्या नातलगांकडे ती राहत असे. परंतु वर्षातील बराचसा भाग ती आमच्याकडेच राही. ती आमच्याजवळ असावी असे आम्हांसहि वाटे. आमचें तिच्यावर प्रेम होते. आमच्याकडे असे तेव्हां आईला गृहव्यवस्थेंत ती मदत करी. आई आजारी असली तर रात्रदिवस तिची शुश्रूषा करी. स्वतःचें भानहि तिला अशा वेळीं राहत नसे. तिचे जग म्हणजे तिची बहीण, तसेंच इतर भाच्या, भाचे, यांचे बनलेले होतें. तिचा आवडता भाऊ पुष्कळ वर्षांपूर्वी मरण पावला होता; परंतु तिचें सारें जीवन प्रामुख्यानें माझ्या आईभोंवतींच फिरत असे. बिबीअम्माचें आईवर प्रेम होते, निष्ठा होती, तसें प्रेम, तशी निष्ठा मीं अन्यत्र पाहिलीं नाहींत.

मी तिची आवडती भाची होतें. मी लहान होतें, तेव्हां तिच्याजवळ जाऊन बसायला मला आवडे. ती किती तरी गोष्टी सांगायची. परींच्या गोष्टी, रामायण-महाभारतांतील गोष्टी, भारताच्या प्राचीन वैभवाच्या कथा, भारतीय शूर पुरुषांच्या, सतींच्या कथा ती सांगत असे. ज्या ज्या शूर स्त्रियांचीं, थोर सतींचीं अमर नांवे मी ऐकें, ज्या ज्या थोर वीरांगनांविषयीं मी वाचीं, त्यांतील कोणाचीहि भूमिका बिबी-अम्मानें नीट करून दाखविली असे आपलें मला नेहमीं वाटायचे. तिच्याजवळ जशी निर्भयता होती, जसे असामान्य धैर्य होते, तसें क्वचितच् कोठे आढळेल. स्त्रियांत तर नाहींच जवळ जवळ आढळणार. खरोखरच मावशीवर माझें फार प्रेम होतें.

आईहून दहा वर्षांनीं मोठी असूनहि, आणि स्वतः परंपरागत रूढींचें जीवन जगत असूनहि बिबीअम्मा आईहूनहि विशाल मनाची होती, उदार मनाची होती. आईप्रमाणेंच आमच्या अर्वाचीन रीति नि कल्पना ऐकून तीहि धक्का बसल्यासारखें करी. परंतु आमच्यापैकीं कोणावरहि ती शेरे मारीत बसत नसे. हा तिचा शहाणपणा होता. बायकांनीं केंस कापावे, बाह्या नसलेलीं पोलकीं घालावीं, वगैरे गोष्टी तिला पसंत नसत. परंतु आम्ही तिच्या पाठीला लागून ती चिडून आम्हांला कांहीं तरी म्हणेल असें करण्याची खटपट करीत असूं. "तुला आवडत नाहीं तर आम्हांला म्हण कीं तुमचें चुकत आहे. मूर्ख आहांत." असे आम्ही तिला म्हणायचे. परंतु ती बोलत नसे; ती केवळ आमची उपेक्षा करी. तिकडे लक्षच देत नसे. परंतु आईचे तसें नसे.

आई आपल्याला कां आवडत नाहीं त्याचीं कारणें सांगे; नाना प्रकारांनीं आपली नापसती दाखवी. परंतु त्यामुळें परिस्थिति थोडीच कांहीं सुधारत असे! आम्हांला जें पसंत नसे ते आम्हीं केलेंच पाहिजे असा तिचा हट्ट नसे. परंतु आम्ही अधिक सनातनी व्हावें, इतकें अर्वाचीन होऊ नये, असें तिला वाटे.

बिबीअम्मा माझी केवळ प्रिय मावशीच नव्हती, तर आणखीहि कांहीं होती. ती माझ्या विश्वासाची जागा होती. जेव्हां कधीं आईकडे जायला मी धजत नसें, तेव्हां तिच्याकडे निर्भयपणें जात असें. कारण माझा दृष्टिकोन समजून घेण्याचा ती प्रयत्न करी. तसें करणें कितीहि अवघड असले, तरी ती यत्न केल्यावांचून राहत नसे.

मार्गदर्शनासाठीं आई नेहमीं दुसऱ्यावर विसबून असे. कोणत्या गोष्टींत तिनें कधीं निर्णय घेतला आहे असें झालेंच नाहीं. असा प्रसग आठवत नाहीं. म्हणून निश्चित सल्ला ती आम्हांला कधीं देऊ शकत नसे. तिला ते कठिण जाई. शिवाय आईकडे आम्ही निराळ्या दृष्टीनें पाहत असू. आई म्हणजे एक सुकुमार नाजुक मूर्ति. आम्हीं तिला संभाळलें पाहिजे. तिची काळजी घेतली पाहिजे. तिनें नाहीं आमची काळजी घ्यायची, तिनें नाहीं मार्गदर्शन करायचे. म्हणून मी माझ्या सा या भानगडी, साऱ्या कुरबुरी, माझ्या अडचणी, माझ्या चिंता घेऊन बिबीअम्माकडे जायची. आणि तिने एकदांहि मला निराश केलें नाहीं.

जेव्हां आईचे प्राण गेल्याची वातमी आम्हीं तिला नेऊन दिली, तेव्हां ती स्तभित झाली. तिचा विश्वास बसेना. आपण जिवत असावें, नीट असावें, आणि आपली लहान बहीण इतक्या थोड्या अवधीत मरावी हें शक्य तरी आहे का? परतु हळूहळू ती शोकान्त सत्यकथा तिच्या ध्यानांत आली. किती तरी दुःखांना तोंड देऊन उरणारें तिचें ते बलवान, शूर हृदय—परंतु त्याला आज एवढा धक्का बसला, त्याच्यावर एवढा आघात झाला कीं त्याची तीव्रता कमी करणे मानवी शक्तीच्या पलीकडचें होते; परतु जरी तिचे हृदय विदीर्ण झाले होते, तिचीं इद्रियें घेरी आल्यासारखीं झालीं होतीं, तरी त्या तीव्र दु:खांतहि तिनें आधीं आमचा विचार केला. आमचें दुःख कमी करण्यासाठीं स्वतःचे लपवण्याचा तिनें प्रयत्न केला. प्रेतयात्रेसाठीं काय काय तयारी करायची तें आम्हांला माहित नव्हतें. बिबीअम्माच्या तें ध्यानांत आलें. तीच स्वतः सारी तयारी करूं लागली. अन्त्यविधीसाठीं स्वतःच्या हातानें तिनें सारें साहित्य गोळा केलें. ज्या लहान बहिणीला तिनें वाढवलें होतें, आणि जन्मभर जिची काळजी तिनें घेतली होती, त्या बहिणीच्या अन्त्यविधीची तयारी तिनें आपल्या हातानें करून दिली.

प्रेतयात्रा निघाली. आईचा देह घराच्या बाहेर काढण्यांत आला. बिबीअम्मा एखाद्या पुतळ्याप्रमाणें व्हरांड्यांत उभी होती. ती अचल होती. डोळ्यांतून एकहि अश्रु-

बिंदु आला नाहीं. आपल्या आवडत्या बहिणीची पुष्पालंकृति ती ताटी जोंपर्यंत दिसत दिसत होती, तोंपर्यंत ती टक लावून अनिमिष नेत्रांनीं तिकडे पाहत होती. लगेच ती माघारी वळली नि आईच्या खोलींत गेली. मी तिच्या पाठोपाठ गेलें. ज्या खोलींत आई होती, तेथें आईच्या अनेक आवडत्या वस्तु होत्या. त्यांचें जणूं बिबीअम्मा शेवटचें दर्शन घेत होती. बहिणीच्या आवडत्या वस्तु. मी माझे हात तिच्या गळ्याभोंवतीं घालून म्हटले "बिबीअम्मा, जरा पडून विश्रांति घे ना." तिनें माझ्याकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांत अद्याप अश्रु नव्हते. माझ्या प्रश्नाकडे लक्ष न देतां ती म्हणाली, " जा, स्नान करून खालीं ये. मी तुझ्यासाठीं चहा करून ठेवतें. " दुपारचे दोन वाजून गेले होते. मी तिच्याशीं वाद घालीत बसलें नाहीं. मी वर माझ्या खोलींत गेलें. स्नान करून खालीं आलें तों चहा तयार होता. परंतु बिबीअम्मा कोठें होती? तो चहा मला पिववेना. बिबीअम्माची ती स्तंभित मुद्रा मला सचिंत करीत होती. मी तिला शोधीत गेलें. तों आईच्या खोलींत ती होती. जेथें नेहमीं आई असे, तेथें ती पडून राहिली होती. खालीं वांकून मीं तिला हांक मारली. तिनें डोळे उघडले.

" बिबीअम्मा, थोडा चहा घे ना. बरें वाटेल. " मीं म्हटले. परतु उत्तर नाहीं.

" बिबीअम्मा, तूं आमची सर्वांची सदैव आई म्हणूनच होतीस आणि आतां तूंच आमची आई आहेस. आतां फक्त तूंच आम्हांला आहेस. मला तुझी फार जरूर आहे. मला तूं हवीस, किती तरी हवीस." मीं पुन्हां म्हटलें. तिनें मला जवळ घेतलें. तिच्या डोळ्यांत आतां प्रथमच अश्रु आले. ती म्हणाली, " बेटी, तूं माझी आवडती मुलगीच आहेस. परंतु मनुष्याला आई एकच असूं शकते. तुझी आई कायमची गेली, बाळ. तिची जागा मी भरून काढूं शकणार नाहीं. शिवाय, मी तिच्यासाठीं जगत होतें. आतां ज्याच्या-साठीं जगावें असें काय आहे? माझें कर्तव्य संपलें. मलाहि गेलेंच पाहिजे. " मला बोलवेना. कारण जे अश्रु मी थांबवूं पाहत होतें, त्यांनीं मला गुदमरवलें, गळा दाटला. मी तिच्याजवळ बसलें. तिचें डोकें थोपटीत होतें. नतर तिला झोंप लागली आहे असे वाटून मी बाहेर निघून गेलें. मी कितीदां तरी तिला पाहायला पुनःपुन्हां गेलें; परतु ती निजलेलीच. शेवटीं मला जरा भीति वाटली. म्हणून मीं जाऊन तिला हलवलें. परंतु ती जागी झाली नाहीं. पुन्हां, आणि आणखी पुन्हां मीं तिला हांका मारल्या, परतु ती हलली नाही. माझा भाऊ स्मशानांतून अद्याप परत आला नव्हता. म्हणून मी गेलें नि माझ्या बहिणीला सांगितलें. तीहि घाबरली. आम्ही डॉक्टरला बोलावलें. सातांच्या सुमा-रास जवाहर परत आला. आणि आतां डॉक्टरहि आले. त्यांनीं पाहून सांगितलें कीं आईला झटका आला होता, तसाच हाहि आहे. आमचा विश्वास बसेना. आयुष्यांत कधींहि असा झटका तिला आला नव्हता. ती कधीं फारशी आजारीहि पडली नव्हती. तिची प्रकृति सदैव निरोगी. परतु तीच तेथे निश्चेष्ट पडली होती.

तिला कशानेंहि वांचवतां येत नव्हते. वांचवायला करण्यासारखें कांहीं नव्हतें. सर्वांचीच चमत्कारिक स्थिति झाली. माझी तर फारच. दुसऱ्यांना ती होती त्यापेक्षां अनत पटीनें ती मला प्रिय होती; दुसऱ्यांना वाटे त्यापेक्षां अनंत पटीनें ती मला मोलवान वाटत होती. तिच्याजवळ बसून राहणें, पाहत राहणें यापलीकडे आम्ही अधिक कांहीं करूं शकत नव्हतों. आदल्या दिवशींची रात्र काढली होती तशीच ही आजची काळरात्र काढायची. मी इतकी शोकाकुल झालें होते, कीं मला हलवेना. तिच्याजवळच मी बसलें. माझ्या मनांत आठवणींचा सागर उसळला होता. कित्येक वर्षांच्या आठवणी. किती तरी दिवस, किती तरी वर्षें ती आमच्याकडे होती. त्या सर्व दिवसांच्या आठवणी. आणि जें प्रेम नि समजून घेण्याची जी सहानुभूति तिनें मला दिली, आईच्या बाबतींतील तिची अचल श्रद्धा नि भक्ति, आमच्या कुटुंबावरची तिची निष्ठा नि प्रीति–सारें सारें आठवत होतें माझ्या हृदयाचे हजारो वेदनामय तुकडे उडतील, हजारों रक्ताळ छकलें उडतील असें वाटे. परंतु तसें झाले नाहीं. अगतिक होऊन तेथें मी बसलें. तिच्या प्रशान्त मुखाकडे पाहत होतें. या अशा गोष्टी कां घडतात याचा विचार करीत होतें.

रात्रभर आम्ही पहारा करीत होतों. आणि पहांटे पांच वाजतां, आईच्या मरणानतर बरोबर २४ तासांनीं बिबीअम्माने प्राण सोडला. २४ तासांच्या आंत आई नि मावशी दोघे मरावींत? तें अशक्य वाटे. आम्हांला दुःखांत लोटून, निराश करून दोघें कशीं गेलीं?

आणि पुन्हा आणखी एक प्रेतयात्रा! आदल्या दिवशींच्या प्रेतयात्रेपेक्षां आजची किती निराळी. बिबीअम्मानें सन्यास घेतला होता. संन्याशाला अन्त्यविधि नाहींत. आम्हीं तिला केशरी वस्त्र नेसवले. तिच्या सौंदर्याशिवाय दुसरा दागिना अंगावर नव्हता. तिचे तोंड वृद्ध नि रेखांकित जरी होतें, तरी तें एकदम तारुण्यसंपन्न वाटलें. साऱ्या सुरकुत्या नाहींशा झाल्या. तिच्या मुखावर अशी शान्ति होती, कीं ती सुखी आहे असे कोणालाहि वाटावें. कदाचित् आपल्या बहिणीबरोबर ती असेल, जिच्यापासून मृत्युहि तिला दूर करू शकत नव्हता.

आईच्या प्रेतयात्रेला हजारो जमले होते. एखाद्या राणीला न्यावें त्याप्रमाणें तिला स्मशानांत नेण्यांत आलें. किती वैभव, किती थाटमाट. बिबीअम्माच्या प्रेतयात्रेलाहि गर्दी जमली. परतु आश्चर्य हें होतें कीं शेंकडों दरिद्री लोक, अंगावर चिंध्या असलेले, म्हातारे, लुले, पांगळे, थोटे ह्यांची गर्दी होत होती. बिबीअम्माला ते "देवी" म्हणत. तिच्या शेवटच्या दर्शनास ते येत होते. त्या साऱ्यांचें तिच्यावर प्रेम होतें. किती तरी गरीब माणसें, खालच्या जातींतील किती तरी स्त्री-पुरुष बिनदिक्कत बिबीअम्माकडे मदत मागायला, सल्ला घ्यायला येत. आणि ती सर्वांना प्रेमानें सारें देई. तिचे जीवन साधें होतें. आणि जें जवळ असे तें सर्व प्रिय मंडळींना देई; गरिबांना, ज्यांना जरूर असे

त्यांना मुक्तहस्तानें देई. तिच्या मृत्यूनें आपला एक मोठा आधार गेला, प्रेमळ मित्र गेला असें त्यांना वाटलें. प्रकृति निरोगी असतांना आईच्या पाठोपाठ २४ तासांत ती गेली, यामुळें लोक तिला " संत " म्हणूं लागले. कारण संताशिवाय या प्रकारें आपले प्राण कोण देऊं शकेल ?

आमचें सारें आवार दरिद्रीनारायणांनीं भरून गेलें. जिच्यावर त्यांनीं भक्तिप्रेम केलें होतें, तिच्या मुखमंडळाचें क्षणभर तरी दर्शन व्हावें म्हणून त्यांची झुंबड उडाली होती. ते एकमेकांवर पडत होते. सर्वांच्या डोळ्यांतून अश्रू वाहत होते. त्या दिवशीं असा कोणीहि नव्हता, कीं ज्याचें हृदय दुःखी झालें नाहीं. ज्या वेळेस ताटी—ती साधी अनलंकृत ताटी मुकेपणानें, मुक्या मिरवणुकीनें नेण्यांत येऊं लागली, त्या वेळेस सर्वांचे डोळे भरून आले, सर्वांचीं हृदयें शोकाकुल झालीं.

आणि अशा रीतीनें माझ्या प्रियतम मावशीला मीं शेवटचा निरोप दिला. जें झालें तें बरें झालें असेंच मला वाटलें. कारण बहिणीशिवाय जगणें तिला असह्य झालें असतें. परंतु इतक्या एकाएकीं आम्हांला नसती सोडून गेली, तर बरें झालें असतें. कारण कधींहि भरून न येणारे दोन खळगे एकदमच नसते पडले !

" अरे थांबा, द्वेष, मत्सर, मरण हीं पुन्हां आलींच का पाहिजेत ? थांबा, माणसांनी एकमेकांस मारलेंच का पाहिजे, मेलेंच का पाहिजे ? थांबा, त्या कटु भविष्याच्या भांड्यांतील थेंबन्‌थेंब नका ओतूं ! जगाला भूतकाळाचा कंटाळा आला आहे. हें जग मरणार का शेवटीं विश्रांति घेणार ? "

—शेले

जुलै १९३९ मध्यें जवाहरनें सीलोनमध्यें जायचें ठरविलें. तो मला म्हणाला, " तूंहि चल. " मीं त्याचें आमंत्रण आनंदानें स्वीकारलें. सीलोनला जायची मला नेहमीं इच्छा होती. किती दिवसांपासून ते मनांत होतें. परंतु पूर्वी कधीं वेळ आलीच नाहीं, मला संधिच नाहीं मिळाली.

जवाहर एका महत्त्वाच्या कामासाठीं जात होता. कोणती होती ती कामगिरी ? सीलोनमध्यें राहणारी हिंदी जनता नि तेथील मूळची सिंहली जनता यांच्यामध्यें पुष्कळच गैरसमज होते. कटु भावना निर्माण झाल्या होत्या. जवाहरनें जावें नि प्रत्यक्ष वस्तु स्थिति काय आहे तें पाहून यावें असें ठरविण्यांत आलें होतें. शक्य झालें तर दोघांमध्यें त्यानें दिलजमाईहि घडवून आणावी, सुसंवाद निर्माण करावा.

पुण्याच्या विमनतळावरून एका लहान विमानांत बसून आम्ही निघालों. अगदीं सकाळची वेळ असूनहि निरोप द्यायला गर्दी जमली होती. कॉंग्रेसचे स्थानिक

पदाधिकारी, जवाहरचे मित्र नि भक्त सारे आले होते. दक्षिण हैद्राबादवरून आम्ही जाणार होतो. हैद्राबादला देवी सरोजिनी नायडूंकडे आम्ही उतरलों. तिच्या कुटुंबांतील मंडळींसह जेवण केलें. नतर मद्रास, त्रिचनापल्ली वरून आम्ही कोलंबोला दुसऱ्या दिवशीं पोंचलो. लॅव्हिनिया पर्वतावरील विमानतळाच्यावर आमचें विमान उडत असतां खालीं जमलेला अफाट जनसमुदाय आम्हीं पाहिला. आमचा विमानवाहक मोठा हुशार होता. एक गोड असा तो तरुण होता. त्यानें विमान एकदम खालीं उतरवलें नाहीं. विमान वाटोळे फिरवून त्या गर्दीच्या डोक्यावर मडले घेत घेत तो फिरत राहिला. नंतर पुन्हां त्याने विमान चढवले आणि एकदम वेगानें खालीं आला. जणूं त्याने त्या जनवृंदाला प्रणाम केला. उतरतांच लोकांचा विमानाभोंवतीं तोबा उडाला. मोठ्या मुश्किलीनें जमाव ताब्यांत ठेवतां आला. जवाहरच्या अभिनंदनार्थ लोक पुढें आले. तीं प्रेमळ हस्तांदोलनें, तीं भावनोत्कट मधुर स्मितें यांमुळे आम्ही आनदलों. आम्हाला घरीं आहों, मित्रांत आहों, असें वाटलें.

हिंदी नि सिंहली उभयविध जनतेनें खांद्याला खांदा लावून आमच्या प्रेमळ अभिनदनाचें हें जें मधुर, प्रदर्शन केलें, त्यामुळें वाटलें कीं ज्या कामगिरीवर जवाहर आलेला होता, त्याचा आरंभ तर बरा झाला. यशाची थोडी आशा वाटूं लागली. परंतु त्या वेळेस जरी आम्हांला वाटलें कीं जवाहरला यश मिळालें आहे, दोन्ही जमातींतील कटुता—जी वाढत होती—ती पुष्कळशी कमी झालेली आहे, तरी पुढें अगदीं स्पष्टपणें दिसून आलें, कीं तसें कांहीं होणें शक्य नव्हतें. आमच्या भेटीनंतर एक महिन्यानेंच सिलोनी सरकारनें ८०० हिंदी कामगारांना काढून टाकलें नि त्यांना परत हिंदुस्थानांत पाठविलें.

सीलोन मला आवडलें. तेथें जें जें मीं पाहिलें तें तें आवडलें. जरी कार्यक्रम अखंड चालू होते, तरीहि तेथील कांहीं स्थळें पाहण्यासाठीं जवाहर मधून मधून सवड काढी. आम्हीं कांहीं मनोहर मंदिरें, सुंदर उपवनें पाहिलीं. आणि जेथें जेथें जात असूं तेथील तें आतिथ्य पाहून आमचें हृदय उचबळून येई. आम्ही त्या स्वागतानें भारावून जात असूं. सिंहली नि हिंदी यांची जणूं आमच्यावर प्रेमस्नेहाची वृष्टि करण्यांत स्पर्धा लागे. अशा उदार नि सुस्वभावी लोकांत इतके भेद कां, कटुता निर्माण होण्याइतके तीव्र भेद कां, हें मला समजत नसे.

सीलोनमध्यें स्त्रियांत जरी पडदा नसला, तरी बहुतेक समारंभांतून आमचें स्वागत होतांच पुष्पहार वगैरे घालून झाल्यावर, यजमान जवाहरला पुरुषांच्या बैठकींत घेऊन जाई नि यजमानीण मला आंत स्त्रियांच्या मंडळांत नेई. भोजनाच्या वेळेस आम्ही थोडा वेळ मिसळत असूं. आणि मग पुन्हां पुरुष एकीकडे जात, स्त्रिया एकीकडे जात.

हिंदुस्थानांत मतवादी बायांचा धिंगाणा फारसा नाहीं. कांहीं स्त्रियांच्या संस्था आहेत. परतु त्या सामाजिक सुधारणांतच बहुतेक लक्ष देतात. परंतु राष्ट्रीय चळवळ, स्वातंत्र्याचे महान् आंदोलन सुरू झाल्यापासून पुरुषांच्या बरोबरीनें आम्हांलाहि स्वातंत्र्य हवें, आम्हीहि त्यांच्या बरोबरीच्या आहोत, कमी नाहीं, समान स्वातंत्र्य हवें, अशा विचाराना खूप चालना मिळाली. महात्माजींचे अनत्याचाराचें, अहिंसेचें तत्रच असें आहे कीं त्यांत पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियाहि भाग घेऊ शकतात. गांधीजींचा सिद्धान्त स्त्रियांच्या हृदयाला पटला. आणि हजारो वर्षांच्या चालत आलेल्या रूढी तोडायला, त्याप्रमाणे भारतमातेचींहि बधनें तोडायला गांधीजींनीं मार्ग दाखवला. घराच्या बाहेर न पडणाऱ्या भारतीय नारी हजारोंनीं स्वातंत्र्यसंग्रामांत सामील झाल्या. हालअपेष्टा, कष्ट, सकटे, तुरुगवास, मृत्यु. सर्वांना तोंड द्यायला त्या उभ्या राहिल्या. आणि असें केल्याने सामाजिक नि राजकीय दोन्ही प्रकारचें स्वातंत्र्य त्यांनीं मिळविले.

सीलोनमध्यें, जेथें जेथें आम्ही गेलो, तेथें तेथें जवाहरला बघावे म्हणून, त्याच्या तोंडचे चार शब्द ऐकायला मिळावेत म्हणून, हजारो नरनारी जमत. चहाच्या नि रबराच्या मळ्यांतून काम करणाऱ्या तामीळ कामगार बंधुभगिनींची खूप गर्दी असे. आमच्या जायच्या रस्त्याच्या दोन्हीं बाजूंना हजारों लोक तासन् तास जवाहर दृष्टीस पडावा म्हणून ताटकळत उभे असत. मोटरींतून मी त्यांच्याकडे बघत असे; कधीं कधीं मोटरींतून खालीं उतरून भावाबरोबर उभी राहून त्या संमीलित समुदायाकडे मी पाहत असे. त्यांचीं तोंडें तेजानें फुललेलीं दिसत. आपल्या प्राचीन मातृभूमीहून आशेचा नि उत्साहाचा सदेश घेऊन आलेल्या त्या भारतपुत्राकडे बघत असतांना त्यांच्या तोंडावर विश्वासाचें, प्रेमाचे तेज झळके. आपल्या जन्मभूमीपासून आपण दूर असलों, तरी आपणांला आपले देशबांधव विसरले नाहींत अशी खात्री, असा विश्वास, जवाहरची ती त्यांच्यांतील उपस्थिति त्यांना देत असे.

एके दिवशीं दिवसभरच्या अपरंपार श्रमामुळें जवाहर अगदीं गळून गेल्यासारखा दिसला. या साऱ्या श्रमांचा कांहीं उपयोग होईल का, कशाला करायची इतकी यातायात, असें क्षणभर मनांत आलें. परतु तीं लाखोंचीं तोंडे माझ्या डोळ्यांसमोर येत. जर लाखोंचें प्रेम नि विश्वास मिळत असेल, तर कितीहि कष्ट पडले तरी ते घेणं योग्यच होईल असें मग वाटे.

दहाच दिवस आम्हीं लंकेंत होतो. गजबजलेले दिवस. कितो तरी सभा, परिषदा, ते स्वागतसत्कारसमारभ ! आणि सीलोमधील सुंदर स्थळांना आम्हीं दिलेल्या भेटी !' सारखी धांवपळ होती. आणि आमची मुदत सपली. आमची म्हणण्यापेक्षां जवाहरची सपली. कारण मी तेथे आणखी एक आठवडा राहून मग मुंबईस परतले.

सीलोनहून परतल्यावर जवाहर लगेच चीनला जायला निघाला. राजा, मुलें, मी-आम्ही सारींच अलाहाबादला त्याला निरोप देण्यासाठीं गेलों होतों. चीनमध्यें जाण्याचें स्वप्न किती तरी दिवस जवाहर खेळवीत होता. प्राचीन देशांचे त्याला सदैव आकर्षण वाटतें. स्वतःची इच्छा पूर्ण करण्याची त्याला आज संधि मिळत आहे, ती इच्छा आज तो पुरी करूं शकत आहे, यामुळें मला तरी आनंद झाला; परंतु तिकडे फार दिवस तो राहूं शकला नाहीं. ती क्षणिक अल्पजीवि भेट झाली. महायुद्ध भडकल्यामुळें एकाएकीं त्याला चीनची यात्रा संपवावी लागली. तो परत आला. चिनी लोक नि त्यांचा महान् नेता जनरॅलिसिमो चॅंग-कै-शेक यांचें धैर्य नि निश्चय पाहून जवाहरला अपार कौतुक वाटलें, अति आदर वाटला. कांहीं झालें तरी चीनच्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्याची त्यांची ती भीष्म प्रतिज्ञा पाहून जवाहरचें हृदय उचंबळून गेलें.

१९३९ सप्टेंबरमध्यें इंग्लंड नि जर्मनी यांच्यांत युद्ध सुरू झालें. हिंदुस्थाननेंहि जर्मनीशीं युद्ध पुकारल्याचें जाहीर करण्यांत आलें. परंतु हिंदी जनतेला एका अक्षरानेंही विचारलें नाहीं. हिंदी जनतेची संमति घेतली नाहीं. आम्ही एकंदर परिस्थिती-कडे काळजीपूर्वक पाहत होतो. साम्राज्यवाद शेवटीं खतं होईल अशी आशा करीत होतों. या सर्व गोंधळांतून, या चिखलांतून स्वतंत्र असा नव हिंदुस्थान जन्माला येईल असें वाटत होतें. गांधीजींची तद्वतच राष्ट्रीय सभेची सहानुभूति संपूर्णपणें ब्रिटिशांकडे होती. मैत्रीचा नि मदतीचा हात प्रामाणिकपणानें पुढें करण्यांत आला होता. युद्धहेतु जाहीर करा अशी आमची मागणी होती. परंतु युद्धहेतूंची घोषणा केली जाईना. हळूहळू लाखोंच्या हृदयांतील आशांकुर जळून गेले. सारा भ्रमाचा भोंपळा फुटला. विफलतेची भावना फैलावली. ब्रिटन आपल्या इतिहासांतील आणीबाणीच्या वेळीं तरी हृदयपरिवर्तन झालेलें दाखवील असें जें वाटत होतें, तें फोल ठरलें.

१९४० मध्यें निरुपाय म्हणून, दुसरा मार्गच नव्हता म्हणून गांधीजींनीं वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला. साऱ्या राष्ट्राच्या वतीनें केलेला तो नैतिक निषेध होता. आदर्श सत्याग्रही श्री. विनोबा भावे हे पहिले स्वयंसेवक म्हणून गांधीजींकडून निवडण्यांत आले जवाहर दुसरे निवडले जाणार होते. परंतु सत्याग्रह करण्यापूर्वीच, बरेच दिवस आधीं वर्ध्याहून अलाहाबादेस येतांना वाटेतच त्याला पकडून गोरखपूर येथें खटल्यासाठीं नेण्यांत आलें. चार वर्षांची सक्तमजुरी त्याला मिळाली. ती शिक्षा ऐकून सारा हिंदुस्थान अवाक् झाला; स्तंभित झाला. परंतु त्याचबरोबर स्वातंत्र्यासाठीं निकरानें लढायला, अधिकच निश्चयानें लढायला तो बद्धपरिकर झाला.

राजानें सर्वांआधीं स्वयंसेवक म्हणून नांव दिलें. जेव्हां त्यानें गांधीजींची परवानगी मागितली, तेव्हां गांधीजींनीं कृष्णीला कल्पना मान्य आहे का असें विचारलें. जर कांहीं कारणास्तव मीं परवानगी देत नसेन, तर राजानें तुरुंगांत न जाणें बरें, तो

तुरुंगांत न गेलेलाच बरा, असें गांधीजी म्हणाले. आमच्याभोंवतीं सारा अंधार होता, गोंधळ होता, उत्पात होता. परंतु जें थोडेंफार देशासाठीं करतां येईल, तेंहि हातून न झालें, तेंहि न केलें, तर राजा दुःखी होईल हें जाणून मीं परवानगी दिली. राजाला अटक झाल्यानतर महिन्याभरानें बापूंना मीं पत्र लिहिलें. सत्याग्रह करण्याची मींहि परवानगी मागितली. मीं लिहिलें, " लढयापासून दूर राहणें नीरस वाटतें. " परंतु मुलें लहान असल्यामुळें त्यांच्याकडे कोणी तरी पाहणें अगत्याचें असल्यामुळें त्यांनीं मला परवानगी दिली नाहीं. त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागण्याहून दुसरा मला मार्ग नव्हता.

याच्यापूर्वीं राजा नि मी पंधरा दिवसांहून अधिक एकमेकांपासून दूर राहिलों नव्हतों. कधीं एखादे वेळेस फार फार तर तीन आठवडे वियुक्त झालेलीं असूं यामुळे त्याचा हा वियोग मला चांगलाच जाणवला. दर पंधरा दिवशीं मुलाखतीची मुभा होती. ठराविक वेळीं आम्हीं पत्रें पाठवूं शकत होतों, आणि माझ्यासभोंवतीं पुष्कळ भलेभले मित्रहि होते. तथापि जरा सुनेंसुनें वाटल्याशिवाय राहत नसे. माझ्या दोन्ही मुलांनाहि राजा नसल्यमुळें चुकल्याचुकल्यासारखे वाटे. परंतु जरी ते लहान होते, तरी त्यांना समजत होतें. आपल्या पित्याचा त्यांना अभिमान वाटत होता. एकदां केव्हां तरी भेटीला आम्ही गेलों होतों. दोन्ही मुलांच्या भावना त्या वेळीं उचंबळून आल्या. रडायचें नाहीं असें त्यांनीं ठरविले होते. ते अश्रु रोखूं पाहत होते; परंतु शेवटीं गालांवर ते घळघळून आलेच. परंतु आतां या वेळेस मुलाखतीहि नाहींत. त्यामुळें लहान मुलांच्याहि हृदयांत कटुता, दुःख, संताप निर्माण झालीं आहेत.

"पृथ्वीवरील साऱ्या साम्राज्यांच्या साऱ्या फौजा जरी आल्या, तरी एका सत्याग्रहीचा आत्मा त्यांना चिरडून टाकतां येणार नाहीं, आणि तो एक मनुष्य प्रभावी ठरेल."

— टेरेन्स् मॅक्स्विनी

जवळ जवळ अपत्य ११ वर्षे जवाहर आपल्या आईबापांचे एकच अपत्य होता. त्याचे खूप लाड केले जात. विशेषत: आईचा तर तो फारच लाडका होता. तो शाळेंत कधीं गेला नाहीं. घरींच त्या त्या विषयांतील तज्ज्ञ शिक्षक त्याला शिकवीत. किती तरी वर्षे त्याला भाऊ वा बहीण नसल्यामुळें तो एकटा एकटा होता. वडीलहि जरी त्याचे लाड पुरवीत, तरी सुदैवाने ते कडक शिस्तीचेहि भोक्ते होते. यामुळें फाजील अहंकारी जवाहर झाला नाहीं.

लहानपणापासूनच वडिलांविषयीं जवाहरला फार आदर वाटे. जें जे चांगलें आहे, जें जें धीराचें नि सामर्थ्याचें आहे त्या सर्वांची मूर्तिमंत प्रतिमा म्हणजे आपले वडील असें त्याला वाटे. वडिलांप्रमाणें व्हायचें हीच एक त्याची महत्त्वाकांक्षा होती. वडिलां-विषयीं पूज्यभाव नि प्रेम जरी त्याला वाटे, तरी तो त्यांना बराच भीतहि असे. वडिलांच्या रागाची त्याला नेहमीं धास्ती असे. कारण एकदां त्या रागाला त्याचा बळी पडला होता, त्या क्रोधाच्या कचाटयांत-तावडींत तो सांपडला होता. आणि ती स्मृति सहजा-

सहजीं पुसली जाण्यासारखी नव्हती. परंतु वडील अन्यायानें कधींहि शासन करणार नाहींत अशी आमची खात्री असे. तथापि पुढें वयोमानाप्रमाणे वडिलांचा रागहि कमी होऊ लागला. त्यांनींहि आपली ही वृत्ति कह्यांत आणली. जरी मधून मधून ती वृत्ति दिसे, तो राग जरी आंत सदैव होताच, तरी तो आतां वरचेवर वर उफाळत नसे.

अशा रीतीनें जवाहर वाढला. लाजाळू, अति सवेदनाक्षम असा हा मुलगा होता. बरोबरीचे सवगडी नसल्यामुळे तो वडील माणसांतच पुष्कळसा मिसळे. वयाच्या चौदाव्या वर्षीच तो हॅरोला गेला. केंब्रिजला अभ्यास पुरा करून १९१२ मध्ये तो हिंदुस्थानांत परत आला. तेव्हां तो माझ्या प्रथम दृष्टीला पडला. त्यानें १९०८ मध्यें सुटींत घरीं आलेला असतांना मला पाहिले होतें.

किती तरी वर्षे माझा भाऊ मला परक्यासारखाच वाटे. कधीं मी त्याच्यावर प्रेम करीत असें, कधीं त्याच्याविषयीं आदर वाटे, तर कधीं त्याचा रागहि येई; मग तो मुळींच आवडत नसे असें व्हायचें. परंतु कांहीं वर्षांनीं जेव्हां सत्याग्रह चळवळ सुरू झाली, आणि जवाहरनें राजकारणांत उडी घेतली, त्या वेळेपासून मला त्याचें स्वरूप बरेंचसें दिसूं लागले. आणि जसजसा त्याचा स्वभाव मला अधिकाअधिक कळूं लागला, तसतसा त्याच्याविषयींचा आदर वाढतच गेला. एके काळीं मला चुकीनें वाटे कीं माझा हा भाऊ अहंकारी आहे म्हणून. परंतु आतां सम्यक् दर्शन झालें.

तो आदर्श वडील भाऊ आहे. माझ्या बहिणीपेक्षां आणि माझ्यापेक्षां तो वयानें इतका मोठा असूनहि त्यानें कधींहि आमच्यासाठीं कायदे केले नाहींत. असेंच वागलें पाहिजे, तसेंच केलें पाहिजे, असें इतर वडील भावांप्रमाणें त्यानें कधीं केले नाहीं. आम्हीं केलेले कधीं जर त्याला पसंत पडलें नाहीं, तर तो सौम्यपणानें, शहाणपणानें, नीट धोरणानें आमच्याशीं त्या बाबतींत बोले, चर्चा करी; आणि आम्ही चुकलों आहोंत हें तो आम्हास दाखवी; आणि आपणच चुकलो हें मग आम्हांसहि दिसे. त्याचें म्हणणें समजा, आम्हांला पटलें नाहीं, तरीहि जरी त्याला दुखावल्यासारखें मनांत वाटलें, तरीहि तो ते दाखवीत नसे आणि स्वतःचीं मतें आमच्यावर लादीत नसे. स्वरूपचा नि माझा तो वंदनीय असा बडा भाईच केवळ आहे असें नव्हे, तर तो आमचा महान् मित्र आहे, प्रेमळ सखा आहे. आम्हांला तो अति अमोल वाटतो. त्याचें आमच्यावर किती प्रेम, कशी समजून घेण्याची बुद्धि! ज्याप्रमाणे वडील आधार वाटत, त्याप्रमाणेंच आज जवाहर वाटतो. आम्ही कधीं संसारांतील चिंतांनीं, नाना प्रकारच्या प्रश्नांनीं जिकिरीस आलों, तर आम्हांला कोण धीर देतो? जवाहर. तो धीर देतो. तो सामर्थ्याचा मेरु आहे, आमचा आधारस्तंभ आहे. या खांबाला आम्ही टेंकतो नि निर्धास्त वाटतें. तो उपदेश देत बसत नाहीं, तर ज्या ज्या वेळेस मदतीची, मार्गदर्शनाची आवश्यकता असते, त्या वेळेस साहाय्यार्थ पुढें येतो. उपहासाची किंवा उपालंभाची भीति न वाटतां आम्ही

आमचीं सारीं हृद्गतें त्याच्याजवळ ओकतो. तो अति विश्वासार्ह आहे. स्वतः मानवी असल्यामुळें तो दुसऱ्याचा दुबळेपणा समजूं शकतो.

वडिलांच्या मृत्यूनंतर जवाहरला आईची नि माझी सदैव काळजी वाटे. स्वरूपचें लग्न झालेलें होतें. तिचें स्वतःचें घर होतें. आमच्या लहानशा कुटुंबाचा जवाहर आतां मुख्य होता; परतु हिंदी कुटुंबांत पद्धति असते त्याप्रमाणे मला नि आईला आपण आतां जवाहरवर केवळ अवलंबून आहोंत असें वाटूं नये म्हणून तो फार जपे. आमच्या मनांतहि असें कधीं आलें नाहीं कीं आतां आम्ही परावलंबी झालों; आतां जवाहर प्रमाणः परंतु त्याला तसें वाटलें. वडिलांनीं मृत्युपत्र करून ठेवलें नव्हतें. त्यांनीं तसें करावे असें आम्हीहि त्यांच्यापासून कधीं अपेक्षिलें नाहीं. कारण असें करणे म्हणजे त्यांच्या स्वभावाच्या अगदीं विरुद्ध होतें. परंतु आतां कांहीं गोष्टींची जवाहरला सारखी चिंता वाटे. वडील जिवंत होते त्या वेळेस मी ज्या मोकळेपणानें वागत होतें, तशी आतां वागणार नाहीं, पैसे वगैरे लागलेसवरले तर मागणार नाहीं, असे त्याला वाटे. म्हणून त्यानें मला एक पत्र लिहिलें. मीं आणि आईनें स्वतःला आनंदभवनाचे तसेंच वडिलांनीं जें कांहीं इतर ठेवलें असेल त्याचें मालक समजावे अशी इच्छा त्या पत्रात त्यानें प्रकट केली होती. तो आतां एक विश्वस्त म्हणून आमचा कारभार पाहणार होता. विश्वस्त या नात्यानेंच माझ्याकडे पाहा असें त्याने लिहिले होतें. त्यांत त्यानें आणखी असेहि लिहिलें होतें कीं " मला नि माझ्या कुटुंबाला फारसें लागणार नाहीं; तेव्हां आपण पूर्वीप्रमाणेंच एकत्र राहू शकू. त्यांत संकोच वाटायचे कारण नाही; परंतु मी येथें तुम्हांला जरूर तेव्हां मदत नि मार्गदर्शन करायलाच फक्त आहें असें तुम्ही समजून चालावे. असा वागणारा भाऊ या जगांत मिळणे कठीण असें मला वाटलें. हे सारें त्यालाच शोभण्यासारखें आहे. स्वतःच्या ध्येयाप्रमाणे तो वागतो. कधीं चलित होत नाहीं. जवाहरचा हा विशेष आहे. त्याच्या डोळ्यांसमोर कांहीं एक आदर्श असतो. आदर्शानुरूप तो आचरण ठेवतो हें विशेष.

वडिलांप्रमाणेच जवाहरहि शीघ्रकोपी आहे. मी चौदा वर्षांचीं होतें तेव्हां जवाहर मला गणित शिकवूं लागला. तोच आपण होऊन म्हणाला, " मी शिकवीत जाईन." गणित म्हणजे मला अगम्य वस्तु. माझें डोकें उठायचें त्या गणितानें. जवाहर आतां शिकवणार म्हणून मी नाचूं लागलें नाहीं. परतु त्यानें आतां शिकवतों म्हटलेंच, तर नाहीं कसे म्हणाचे ? सुटायला मार्ग नव्हता. त्या काळांत जवाहरला जरा मी भीतच असें. तो माझ्यावर संतापलेला पाहायचीं मला फारशी इच्छा नव्हती. आमचें अध्ययन-अध्यापन सुरू झालें. पहिले कांहीं धडे फारच चांगले वाटले. जवाहर किती छान सांगतो, कसें छान शिकवितो असे वाटले. ज्या विषयाचा मनापासून मीं तिटकारा करीत असें तोच विषय अति आनंदाचा वाटूं लागला. मी त्यांत रस घेऊ लागलें. शुष्क नि नीरस

गणितविषय काव्यमय वाटूं लागला. एक तासच जवाहर शिकवी. परतु तो तास केव्हां येतो असें मला होई. परंतु जवाहरची जो भीति कमी वाटूं लागली, मलाहि जरा आत्मविश्वास वाटूं लागला; तोंच कांहीं तरी बिनसले. एके दिवशीं माझें लक्षच लागेना. मला त्या दिवशीं कसेंसेंच वाटत होतें. माझी एकाग्रता होईना. कांहीं लक्षांत राहीना, आठवेना, सुचेना. यामुळे जवाहर चिडला. (त्याचा तरी काय दोष? मी त्याला दोष देत नाहीं.) तो संतापूं लागला. त्याचें तें खवळलेले नारसिंह रूप पाहून माझ्या डोक्यांत थोडेंफार होतें-नव्हतें, तेहि पळाले! मी केवळ मुकी बनलें. कशाचेच उत्तर मला देतां येईना. तो कांहीं वाक्ये ओरडला, आणि मी घाबरून गेलें. माझी अक्कलच गुग झाली, बुद्धि जणूं मेली. मला मेल्यासारखे वाटले. मी स्तंभित झाले, अ-वाक् झालें. मी जायला निघालें, एखादा धडा नाहीं आठवला म्हणून का तो महान् अपराध? एखादे वेळेस माणसाला नाहीं मेलें आठवत. माझे मन जणूं दुखावलें गेलें. मी अ-सुखी आहें असें मला वाटले. मी माझ्या डोळ्यांतलें पाणी अडवीत होतें, परतु मी माझीं पुस्तकें भीतभीत हळूच गोळा करीत असतां डोळे आलेच भरून; माझे अश्रु बघून एका क्षणांत त्याचा राग गेला. त्याला वाईट वाटले, पश्चात्ताप झाला. मला जवळ घेऊन त्यानें चुकलो म्हटले, क्षमा मागितली. परतु ह्या प्रसंगानतर त्याने कितीहि सांगितलें, कितीहि खटपट करून पाहिली, तरी पुन्हां मी त्याच्याजवळ धडे घ्यायला गेलें नाहीं. तो माझे मन वळवण्याची शिकस्त करी. परंतु मी नाहींच गेले.

राजकारणाशिवाय, तसेंच लेखनावाचनाशिवाय जीवनांत दुसरी कसली गोडी जवाहरला नाहीं असें त्याला नीट न ओळखणारे लोक समजत असतात. परंतु ही गोष्ट सर्वस्वी खरी नाहीं. या गोष्टींत त्याचा पुष्कळसा वेळ जातो ही गोष्ट खरी; परंतु दुसरेहि त्याचे आवडते नाद आहेत, नाना छंद आहेत. परंतु इच्छा असूनहि त्या इतर गोष्टींकडे, त्या इतर छदांकडे त्याला भरपूर वेळ देतां येत नाहीं. राजकारणांतून वांचलेला वेळ तो वाचनांत दवडतो. कधीं कधीं लेखनांतहि. परतु लिहिण्याचे काम बहुधा तुरुगांतच तो करतो. घोड्यावर बसणें त्याला आवडते. तो खंदा घोडेस्वार आहे. पोहण्याचाहि त्याला नाद आहे. परंतु पोहण्याची सधि क्वचित्च त्याला मिळते. नाटक-सिनेमाला तो फारसा जात नाहीं. आम्हीं आग्रहच केला आणि चित्र किंवा नाटक खरोखरच चांगले असलें, तर तो येतो; त्यांत रसहि घेतो. परंतु जवाहरचा खुला दिल जेव्हां तो मुलांत असतो तेव्हां पाहावा. मुलें, मग तीं किती का वर्षांचीं असेनात, त्याला त्याची फिकीर नसते. मुलें लहान असोत वा मोठीं असोत. तो त्यांच्यांत रमतो. मुलांचा त्याला फार लळा; आणि मुलेंहि त्याला जीव कीं प्राण करतात. तो कितीहि कामांत असला, अथवा कितीहि थकलेला असला, तरीहि जर एखादे मूल येऊन त्याला हें असेंच कां, तें तसेंच कां वगैरे प्रश्न विचारून भंडावूं लागलें, तरी तो त्या मुलावर रागावणार नाहीं,

त्याला रागाने दूर लोटणार नाहीं, हो तिकडे चालता असें म्हणणार नाहीं. उलट आपलें सारें काम थांबवून तो त्या मुलाची जिज्ञासा पुरी करील.

जवाहरमध्यें आणखी एक कधीं नाहींसा न होणारा गुण आहे. तो कोठेंहि असो; तुरुंगांत असो वा बाहेर असो; कितीहि कामांत असो; थकलेला भागलेला, गळून गेलेला असो; तो कधीं कोणाचा जन्मदिवस विसरत नाहीं; तसेंच वार्षिक दिवस किंवा आणखी असेच महत्त्वाचे प्रसंग तो विसरत नाहीं. स्मरणपूर्वक केल्या जाणाऱ्या या लहान-सानच गोष्टी; परंतु त्यांमुळेंच तो सर्वांना आवडतो. जे त्याला ओळखतात, ते त्याच्यावर यासाठींच अपार प्रेम करतात. एकदां असें झालें, कीं हिंदी पंचांगाप्रमाणें ऑक्टोबर १९, १९३० ला माझा वाढदिवस येत होता. अटक होतांच तो दिवस जवाहरला आठवला. त्या दिवशींच त्याला अटक झाली होती. कांहीं दिवसांनीं नतर त्यानें मला पत्रांत लिहिलें:

"नुकतेंच माझ्या असें ध्यानांत आलें कीं १४४ व्या कलमाखालीं माझ्यावर पकड-वॉरंट काढणाऱ्या या ब्रिटिश सरकारनें १९ ऑक्टोबरला मला पकडून एक मोठा अपराध केला आहे. कारण एक महत्त्वाची गोष्ट त्या दिवशीं करायची मी विसरून गेलों. त्या दिवशीं तुझा वाढदिवस होता. एका सुदर कलात्मक वस्तूची भेट त्या दिवशीं मी तुला देणार होतो. माझ्या आवडत्या लाडक्या बहिणीसाठीं मनांत योजनाहि होती. परंतु मनांतलें सारें मनांतच राहिले. तें प्रत्यक्षांत आले नाहीं. माझ्या हातून ही मोठीच चूक झाली. नि आतां चुटपुट लागली आहे, चुकचुक करीत आहे. परतु झालेली चूक दुरुस्त करायला मी धांवलों आहें: हें बघ, तूं आतां एक काम कर. एखाद्या पुस्तकविक्रेत्याकडे जा आणि कांहीं सुंदरशीं पुस्तकें निवडून घे. कोणतीं पुस्तकें घेशील ? कांहीं प्राचीन काळांतील ज्ञानभांडाराचीं पुस्तके घे; कांहीं मध्ययुगांतील श्रद्धेचीं घे; कांहीं अर्वाचीन सशय-वादावरचीं घे; आणि भविष्यकलीन नवयुगाचीं घे. घे अशीं सारीं सुंदर पुस्तकें. त्यांचे पैसेहि दे. आणि आपल्या भावाची लाडक्या बहिणीला उशीरा का होईना, परंतु आलेली प्रेमाची भेट समज. तुझा भाऊ जरा विसरभोळा आहे, परंतु आपल्या लहान बहिणीची त्याला नेहमीं आठवण येत असते. आणि विकत आणलेलीं तीं निवडक पुस्तकें वाच. जें वाचशील त्यांतून एक जादूचें शहर निर्माण कर. नाना स्वप्नें तेथें असतील. किल्ले असतील. उद्यानें असतील. फुलांच्या बागा, खळखळ वाहणारे झरे तेथे असतील, तेथे सुख नि सौंदर्य असतील. जीं दुःखें, जे शाप या पृथ्वीला, दुःखी जगाला सोसावे लागत आहेत, त्यांना त्या तुझ्या कल्पनानगरींत मुळींच येऊ देऊ नकोस. जीवन म्हणजे मग सुखमय असा चिरप्रयत्न; हे जादूचें शहर बांधण्यासाठीं अविरत उद्योग नि साहस; जीवन म्हणजे सभोंवतालची सारी क्षुद्रता नि कुरूपता: सारें दुःख, दैन्य घालवून देण्यासाठीं चाललेली महान् साधना असें वाटेल."

जवाहर इंग्लंडमधून आला, तेव्हां तो अतिनीनेटका, झकपक दिसणारा, अति सभ्य असा एक सुंदरसा नवजवान होता. परंतु श्रीमंताचा मुलगा साहजिकच जरा बिघडतो तसाच तोहि होता. जरा गर्विष्ठ असतो वाटे. परंतु पुढें अशीं वर्षें आलीं कीं मोठमोठे अनुभव त्याला मिळाले. त्याचप्रमाणें निराशा, दुःखे हींहि आलीं. यामुळें तो मृदु बनला आणि आज तो पूर्वी कधींहि नव्हता इतका प्रेमार्द्र वाटतो. पाश्चिमात्य शिक्षणाचा साहजिकच त्याच्या जीवनावर बराच परिणाम झालेला आहे. आणि जीवनाकडे पाहण्याची त्याची दृष्टि हिंदी कमी असून अधिकांशानें पाश्चिमात्य आहे असें लोक समजतात. परंतु अलीकडे युद्धाचीं उपासमारीचीं जीं हीं वर्षे जात आहेत आणि जगांत जें नैतिक नि राजकीय (अराजक माजलें आहे, जो सांवळागोंधळ चालला आहे.) तें सारें पाहून हिंदी नि चिनी विचार ज्या उगमांतून संस्फूर्त होऊन बाहेर पडले, त्या मूळच्या उगमांकडे आपल्यांतील बरेचजण ओढले गेले आहेत. जवाहरहि त्याला अपवाद नाहीं: एवढेंच नव्हे, तर तो अधिकच ओढला गेला आहे. जवाहरचें व्यक्तिमत्व आज प्राचीन विचारभूमींत आपलीं मुळें खोल दवडीत आहे, आणि समृद्ध अशा भूतकाळांतून ते रसशोषण करीत आहे. पुष्कळशीं स्वप्नें भंगल्यावरहि भ्रमाचे, भोपळे फुटल्यावरहि आज त्याच्या जीवनांत जी शांति दिसते, कटुतेचा जो अभाव दिसतो, हें सारें भारतीय संस्कृतीचें खरो-खर फळ आहे. जवाहर म्हणजे पूर्वपश्चिमेचे मधुर–मीलन; जीवन कसें जगावें ते त्याला पूर्व शिकविते; आणि माणसाचे भवितव्य बनविणाऱ्या नाना वृत्तिप्रवृत्ति, नाना विचार-विकार यांचें स्वरूप व्यापकपणें समजून घेण्यासाठीं पश्चिम त्याला मदत करते. म्हणून प्रखर राष्ट्रीय वृत्तीचा असूनहि आपल्या राष्ट्राचें खरें स्वातंत्र्य दुसऱ्या देशांत जुलुम नि दास्य चालू असतां टिकू शकणार नाहीं अशा भूमिकेवर तो आज भक्कमपणें उभा आहे. हिंदुस्थानांतील घडामोडींनीं ज्याप्रमाणें त्याचें भावनाक्षम मन अस्वस्थ होतें, त्याचप्रमाणें आशिया वा युरोपमधील घडामोडींनींहि होते. स्वातंत्र्याचा तो खरा शिपाई आहे. स्वातंत्र्य कोठेंहि कधींहि धोक्यांत आलें, तर त्याची बाजू घेऊन उभें राहावयास तो सदैव सिद्ध असतो.

असे कांहीं आहेत कीं ज्यांना जवाहर जरा उद्धत वाटतो, दडपणारा वाटतो. त्यांना जवाहरची ही वृत्ति आवडत नाहीं. कधीं कधीं जवाहर असा असतो, परंतु स्वभा-वानें तो गर्विष्ठ किंवा दुसऱ्यावर हुकमत गाजवूं पाहणारा असा मुळींच नाहीं. असें असण्यापेक्षां तो दूर जाईल. तो महत्त्वाकांक्षी नाहीं. लोकांच्या डोळ्यांसमोर तेजोवलयांकित असें असावें असें त्याला वाटत नाहीं. उलट या धकाधकींत बाजूला जाऊन बसण्यांतच त्याला आनंद वाटेल. शक्य तर त्याला तेथेंच अधिक शांति मिळेल. परंतु हें सारें होणें नाहीं. जवाहर एक प्रकारचा स्वप्नांत विहरणारा प्राणी आहे. अति श्रमानें श्रांत झाल्यावर तो जेव्हां पडून राहतो, तेव्हां तो दूर कोठें तरी बघत असतो.

त्याचे डोळे स्वप्नमय दिसतात. या जगाचा तो नसून दुसऱ्याच जगांतील तो आहे असें वाटतें. कधीं कधीं त्याचे डोळे अपार करुणेनें नि उदासीनतेनें भरलेले दिसतात; आणि त्याचें ते ५३ वर्षांचें वय असूनहि फुलाच्या झोल्याप्रमाणें ताजें दिसणारें मुखमंडल क्षणांत किती तरी वर्षांचें म्हातारें आहे असे दिसूं लागते. जवाहरचें जीवन सुखाचें नाहीं. त्याच्या जीवनपथावर सारीं फुलेच फुललेलीं नव्हतीं. दुःखक्लेशांच्या, त्यागाच्या खुणा त्याच्या तोंडावर राहिल्या आहेत. ज्यांनीं ज्यांनीं तो कंटकमय मार्ग घेतला त्या सर्वांच्याच चेहऱ्यावर त्या खुणा दिसतील.

जवाहरवर टीका करणारे लोक आहेत; त्याचे दोष दाखवणारे लोक आहेत. परंतु खरी गोष्ट म्हणजे त्यांना जवाहर म्हणजे काय तें कळतच नसतं. त्याच्या वागणुकींतील मर्म ते समजूं शकत नाहींत. त्याच्या मार्गाचें आकलन त्यांना होत नाहीं. तोहि एक माणुस आहे. तुमच्या-आमच्यासारखाच तो आहे. माणसांत असणारे दोष, दुबळेपणा त्याच्यांतहि आहे. परतु बहुतेक सारे आपल्या दुबळेपणाला बळी पडतात; जवाहर तसा बळी पडत नाहीं आणि म्हणून त्याचा मोठेपणा. आज सारें हिंदुस्थान जवाहर-वेडें झालें आहे ते कां? त्याचे अनेक गुण, त्याचें शौर्यधैर्य, त्याचें सामर्थ्य, एवढ्यामुळेंच नव्हे, तर त्याच्यामध्यें आपणहि एक माणुस आहों अशी भावना आहे म्हणून. तो स्वतःला हुतात्मा समजत नाहीं, वीरशिरोमणि मानीत नाहीं. तो एवढेंच समजतो कीं देशाच्या संकटकाळीं त्याची सेवा करण्याचें भाग्य मिळालेला आणि शेवटपर्यंत तशी सेवा करीत राहूं इच्छिणारा मी एक माणुस आहे. तुरुंगांत जाणे म्हणजे मोठा त्याग असें तो समजत नाहीं. तुरुंगांत जाण्याची शेखी मिरवणें त्याला आवडत नाहीं. जरी त्याचें निम्मे आयुष्य तुरुगांत गेलें, तरी त्यांत काय मोठेंसे असें त्याला वाटतें. परकी सत्तेविरुद्ध स्वातत्र्यासाठीं लढत असतांना हें सारें अपरिहार्यच आहे. एकदां तुरुंगांतून त्यानें मला लिहिलें:

" आजच्या जगांत तुरुंगांत जाणें ही एक क्षुल्लक बाब आहे. आज जगाचा पायाच खिळखिळा होत आहे. नेहमीं तुरुगांत जाणे, यालाहि थोडी किंमत आहे; त्यापासून फायदा होतो परतु आंतून प्रेरणा नसेल, तर या किंमतीला फारसे महत्त्व नाहीं. जर आंतील प्रेरणा असेल, तर मग इतर कशाची पर्वा नाहीं. कारण ती प्रेरणा म्हणजेच कांहीं तरी प्राणमय वस्तु. "

आणि तरीहि सारखें वरचेवर तुरुंगांत जाणें वाटतें तितकें सोपें नाहीं. आणि तुरुंग म्हणजेहि कांहीं केवळ पुष्पशय्या नव्हे, कीं जेथें पुन्हां पुन्हां विश्रांति घ्यायला मनांत आलें कीं जावें. कांहींना वाटतें कीं नेहमीं तुरुंगांत जाणाऱ्यांना ती एक संवयच होते, आणि मग कांहीं वाटेनासें होतें. परंतु अशांनीं कांहीं महिने तुरुंगांत काढावेत म्हणजे या गैरसमजांचें, चुकीच्या कल्पनांचें निरसन होईल. किती तरी शारीरिक अ-सुखें

तेथें असतात. अर्थात् जेव्हां मनुष्य तुरुंगांत जातो , तेव्हां तो हें सारें गृहीत धरूनच जातो. सर्वांत त्रासदायक गोष्ट म्हणजे तुरुंगांतील जीवनांत अरेरावीच्या ज्या रोजच्या क्षुद्र गोष्टी घडत असतात, त्यांच्याशीं जुळते घ्यायला मनाला कठिण जातें.

आपल्या प्रिय मंडळींपासून विमुक्त केले जाणें, अधिकाऱ्यांच्या लहरीनुसार भेटगांठ होणें, या सर्व गोष्टींनीं संताप येतो. आपण चिडतो. दुःखी होतों. तुरुंगांत वाटेल तितके दिवस राहणें आणि पुन्हां जीवनांत कटुता येऊं न देणें ही मोठीच गोष्ट आहे. परंतु जवाहरला ती पूर्णपणें साधली आहे.

जवाहरनें लिहिल्याप्रमाणें, एखादी गोष्ट करण्याची आपल्याला आंतून प्रेरणा झाली असेल, तरच ध्येयप्राप्तीसाठीं भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा सुसह्य होऊं शकतात. जवाहरला पुनःपुन्हां अटक व्हावी आणि आम्हीं दुःखीकष्टी व्हावें; परंतु तो आम्हांला धैर्य नि शक्ति देई. तो म्हणे, " मी कोण ! माझ्यासाठीं दुःखीकष्टी नका होऊं. आतां पुन्हां बाहेर येईन. " कितीही आपत्ति त्याच्यावर आल्या, तरी तो त्यांचें हंसें करी. त्यांना फार महत्त्व देत नसे. आणि आम्हांला त्या सर्व गोष्टींना धीरानें तोंड द्यायला तो शिकवी.

१९४० मध्यें त्याला चार वर्षांची सजा देण्यांत आली. त्या शिक्षेंतील सूडबुद्धीनें सारा देश स्तंभित झाला. ज्यानें ज्यानें म्हणून ती बातमी वाचली, तो तो हळला, चकित झाला. आम्हांलाहि तो मोठाच धक्का होता, कठोर आघात होता. सरकारच्या जगाहून विपरीत असणाऱ्या कृतींची जरी आम्हांला कल्पना होती, विचित्र नि अनपेक्षित वटहुकुमांची जरी आम्हांला सवय झालेली होती, तरी ही चार वर्षांची सजा ऐकून पूर्वी कधींहि आम्ही दुःखी झालों नव्हतों इतके दुःखी झालों. मला तर कांहीं सुचेना, जवाहरला मीं तसें लिहिलेंहि. आणि राजा व मी भेटीला येऊं का विचारलें. तो डेहराडूनच्या तुरुंगांत होता. माझ्या पत्राला उत्तर म्हणून त्यानें लिहिलें:

" राजा नि तू जेव्हां जेव्हां याल, तेव्हां तेव्हां तुमचें सुस्वागतच आहे. मला फार आनंद होईल. विशेषतः राजाला भेटायची मला इच्छा आहे; कारण मग पुढें लौकर त्याची माझी भेट होणें शक्य नाहीं. ( राजा वैयक्तिक सत्याग्रह करणार होता. ) माझी शिक्षा ऐकून राजा अस्वस्थ झाला, त्याचे मन व्यथित झालें असें कळून मला वाईट वाटलें. आणि तूहि वेडे, अस्वस्थ झालीस ? परंतु अलीकडे मला जितकें शांत वाटत आहे तितकें पूर्वी क्वचितच् वाटलें असेल. आपल्या या वेड्या जगांत हें एक महत्त्वाचेंच कृत्य नाहीं का ? अशी शांति मिळविणें म्हणजें आश्चर्य नाहीं का ? माझे बाहेरचे जे उद्योग सध्यां थांबले आहेत, त्या उद्योगांशीं संलग्न असणारे माझ्या मनाचे कप्पे मीं आतां बंद करून टाकले आहेत. अभ्यासानें मी हें असें करायला, स्वतःला अलग करायला शिकलों

आहे. एखाद्या कांसवाप्रमाणें स्वतःच्या वहिर्वृत्तींना आंत ओढायची कला मला थोडी अवगत झाली आहे. तुम्हीं माझ्यासाठीं उगीच दुःखी होऊ नका. माझी काळजी करूं नका. आपणां सर्वांचेंच जीवन उत्तरोत्तर अधिकाधिक कठिणतर कष्टांचे होत जाणार. मागचे ते मऊ सुखाचे दिवस ते गतयुगांतील झाले. ते कधीं परत येणार ? ते कधीं परत येतील का तरी ? कोणालाच माहित नाहीं. जें जीवन आज समोर आहे, त्याच्याशीं जमवून घेतलें पाहिजे: जें आज नाहीं त्याच्यासाठीं आसावून बसतां कामा नये. शारिरीक कष्ट नि धोके, मनांतील वेदना नि वादळें यांच्यासमोर कांहींच नाहींत आणि जीवन मृदु असो वा कठिण असो; सुखाचें असो वा कष्टाचें; त्याच्यांतूनहि आपण कांहीं मिळवून घेऊं शकू: काढून घेऊ शकू: परतु शेवटीं ज्याला जीवनाचा उपभोग घ्यायचा आहे, त्याने किंमतीचा ( विचार करणें सोडून दिले पाहिजे. ) विचार करायचा नाहीं असे ठरवून टाकलें पाहिजे.

एकदां कलकत्त्याच्या अलिपूर जेलमध्ये जवाहर होता. पकडला गेल्यापासून त्याच्याविषयीं कांहींच कळलें नव्हतें. म्हणून साहजिकच थोडी हुरहुर वाटत होती. त्यावेळेस असेच एक पत्र त्याने मला लिहिले होतें. विशिष्ट जवाहरी वळणाचे ते पत्र पुढीलप्रमाणें आहे:

प्रिय कृष्णा

तूं नि इतर सारीं माझ्याविषयीं काळजी करीत नसाल अशी आशा आहे. मी बरी आहे. मनाची शांति आहे. विश्रांति मिळत आहे मी आतां खूप वाचीन. कारण करायला दुसरें खरोखरच येथे काहींच नाहीं. बस्स! वाचायचे नि विचार करायचा. दिवसाच्या रोजच्या गोष्टीहि करायच्या आणि म्हणून मी जेव्हां बाहेर येईन—तो दिवस दूर अद्याप बराच आहे. तेव्हां आजच्यापेक्षां अधिक शहाणा होऊन येईन. कदाचित्, कदाचित् नाहींहि कारण शहाणपण ही हातांतून निसटणारी वस्तु आहे; ती धरून ठेवणें कठिण. आणि तरीहि तें शहाणपण एखादे वेळेस अकमात् येतें, आपणांस समजतहि नाहीं. ते येवो, न येवो मी या काळांत त्याचा निष्ठावान उपासक होईन, त्याची कृपा मिळविण्याची खटपट करीन. एक दिवस हे शहाणपण माझ्यावर प्रसन्न होईल. आणि शहाणपणाची प्रेमाराधना करायला तुरुग योग्यच आहे असे तुला नाहीं वाटत ? येथल्या या एकजात शहाणपणाला वरूं पाहणे बरें वाटतें. जीवनांतील ती धांवपळ, ती घिसाडघाई येथे नसते. आपले मन व्यग्र न होतां येथे एकाग्र होऊ शकतें. आणि सर्वांच्या जीवनाकडे जरा दुरून, अनासक्त रीतीनें पाहतां येते. "

मैदानी जीवनाचा जवाहर भोक्ता आहे. हिंवाळ्यांतील खेळांचा तर तो फार शोकी. आम्ही जेव्हां स्वित्झलंडमध्ये होतो, तेव्हां तो तासनतास बर्फावरून घसरण्याचे,

चालण्याचे खेळ खेळायचा. निसर्गाचें ताजें, भ्रष्ट न केलेलें सौंदर्य त्याला फार आवडलें. तो निसर्गप्रेमी आहे; कारण खरोखर तो निसर्गाचेंच बालक आहे.

प्रत्येकानें आपलें काम नीट, चांगल्या रीतीनें करावें असें जवाहर अपेक्षितो. खेळ असो वा काम असो. सारें व्यवस्थित पार पडलें पाहिजे. काम नीट चापून चोपून घेणारा तो कठोर मालक आहे. १९३१ मध्ये त्याच्या सेक्रेटरीचें काम मीं जवळजवळ सहा महिने केलें. मला तें काम फार फार आवडलें. परंतु हातून कांहीं चूक होईल, जवाहर रागवेल अशा सारखी धाकधुक वाटायची. सुदैवानें माझ्या त्या मुदतींत कांहीं एक तसें झालें नाहीं. माझ्या कार्यक्षमतेमुळें हे झालें कीं नशिबानें हात दिला म्हणून झालें, त्याचा निर्णय अद्याप मला करतां आला नाहीं. मंदपणा, आळशीपणा, चुकारतट्टूपणा, काम नीट व्यवस्थित न करणें—या गोष्टी म्हणजे जवाहरच्या दृष्टीनें अक्षम्य पापें आहेत. एकदां स्वित्झर्लंडमध्यें असतांना तो मला स्कायिंग शिकवीत होता. पहिला धडा ज्या दिवशीं तो देणार होता, तो दिवस कांहीं चांगला नव्हता. दोन दिवसांत बर्फ पडलें नव्हतें. आणि पूर्वीचें पडलेलें बर्फ टणक होऊन त्याचे गुळगुळित दगड बनले होते. मी पुनः पुन्हा उभी राहीं, परंतु लगेच दणकन् खालीं येई. मला माझा तोलच सांभाळवेना. मलाहि वाईट वाटलें. जवाहर तर चिडला. थोडीं पावलें तरी चालायचेंच, कांहीं होवो, असें ठरवून मी प्रयत्न करी. परतु प्रत्येक वेळेस मी घसरें, पडें. आणि पडें तीहि बावळटासारखी, वेडीवाकडी. आणि जवाहरच्या स्वभावाचें थोडे दर्शनहि त्या वेळेस झालें. त्यानें मला आपल्या मनोवृत्तीची थोडी चुणुक दाखविली. तो म्हणाला, भविष्यवाणी बोलला, " दहा लाख वर्षांतहि शिकणार नाहींस. " मला मेल्यासारखें झालें. माझाहि स्वाभिमान दुखविला गेला. एका स्विस् , मैत्रिणीला मला शिकवायला सांगितलें. आणि तीन दिवसांत, माझ्या भावानें भविष्य वर्तवलें होतें तरी, मी एकटी, कोणाचे साहाय्य न घेतां त्या बर्फावरून चालूं लागलें, स्कायिंग करूं लागलें.

शुश्रूषा जवाहरनेंच करावी. अति कसोटीच्या परिस्थितींतहि त्याची शांति राहते. त्याची सौम्यता, त्याची सहानुभूति अनत आहेत. समजून घेण्याची त्याची वृत्ति अपूर्व आहे. त्याचा धीर, त्याची सहनशीलता यांना माप नाहीं. परिस्थितीशीं मिळवून घेण्याची शक्ति हा त्याचा सर्वांत मोठा गुण आहे. सभोंवतालच्या लहानसान गोष्टींतहि तो सौंदर्य बघतो, सुख बघतो; हा गुण ही एक फारच मोठी सिद्धि आहे. एकदां डेहराडूनच्या तुरुंगांतून त्यानें लिहिलें:

" तिसरे प्रहरच्या प्रखर सूर्यानें बरेचसे बर्फ वितळवलें आहे. परंतु पर्वत-शिखरांवरचें तसेंच आहे. मेघ हळूहळू दूर निघुन गेले आहेत. त्यांनीं आपला गाशा गुंडाळला आहे. आणि त्यामुळें तें गभीर निळें निळें आकाश दिसत आहे. उत्तर हिंदुस्थानांतील पावसानतर प्रथमच असें आकाश दिसलें. तें निळें आकाश ! खरेंच किती

आश्चर्यकारक, किती वेड लावणारे ! त्या निळ्या आकाशाचे मधून मधून दर्शन आम्हांला व्हावे म्हणून का अभ्रें निघून गेली ? तुमच्या मुंबईत असें आकाश दिसते का ? बरसातीनंतरचें निळें निळें आकाश ? तुमच्या तिकडेहि असेल. परंतु पाहणार कोण ? आणि आजची संध्याकाळ, नेहमींपेक्षांहि जी सुंदर होती, इतकी सुंदर क्वचित्च दिसते. ढगांची खेळीमेळी सुरू होती. मेघांना खेळावेसें वाटत होतें. सुर्याचे–हंसणाऱ्या सूर्याचे किरण पकडून हे मेघ त्यांना चौफेर फेंकीत होते. इकडे तिकडे किरणच किरण ! अपूर्व रंग येत होते, जात होते. नाना आकृति दिसत ! विचित्र, अपूर्व आकृति ! आणि क्षणांत बदलत, नाहींशा होत. आणि या सर्वांच्यावर रंगांची ती धिंगामस्ती ! तीं उघडीं बोडकीं पर्वतशिखरें लाललाल दिसत होतीं, जणू पेटलेले मोल ! खैबर प्रदेशांतील पर्वतांची त्यांनीं मला आठवण करून दिली. मधून मधून बर्फाच्छादित भाग चमकत, परत पुन्हां निष्प्रभ होत. आणि पुढें लौकरच तो चंद्र आला ! जवळ जवळ पूर्ण चंद्र ! त्यानें विविधतेंत आणखी भर घातली. ”

जवाहरच्या तोंडावर सदैव हास्य असले, बाह्यतः तो सुखी, आनंदी दिसला, तरी दुःखाचे, हृदयदाहाचे पेले तो कमी नाहीं प्यायला. त्याच्या वांट्यापेक्षांहि त्यानें अधिक दुःख भोगलें, हृदयविदीर्णता अनुभवली. ज्या वेळेस पत्नीच्या प्रेमाची नि सहकार्याची अधिकच आवश्यकता, त्यावेळेसच त्याची ती तरुण पत्नी निघून गेली ! जवाहरच्या जीवनांतील ती अति करुण नि दुःखद घटना होती. तें दुःख किती खोल होतें ते बाह्यतः न दाखवण्याची त्यानें पराकाष्ठा केली. क्षणभर जवाहर दुःखनिर्भर होतो, क्षणभर त्याचा धीर सुटतो. परंतु दुसऱ्याच क्षणीं तो आपला तोल सांभाळतो, पुन्हां शांत मुद्रा धारण करतो.

अगदीं तरुणपणांतच जवाहर राजकारणाकडे थोडाथोडा झुकूं लागला. परंतु हेच आपलें जीवनाचें कार्य होणार अशी थोडीहि कल्पना त्यावेळेस त्याला आली नसेल. हळूहळू निरनिराळ्या घडामोडींनीं, भराभर होत गेलेल्या घटनांनीं त्याला ओढलें. महान् आंदोलनांच्या महान् लाटा आल्या. आणि त्यांनीं त्याला वाहून नेलें. भरतीबरोबर तोहि नेला गेला. परंतु पुन्हां त्याला त्याचें जीवन जगायला दिलें, तरी पुन्हां तो अगदीं तसेंच करील. पूर्वी वागला तसाच पुन्हां वागेल. अनेकांचे अनेक आरोप त्याच्यावर आहेत. कोणी म्हणतात तो नादी आहे, छांदिष्ट आहे; कोणी म्हणतात स्वप्नांत विहरणारा आहे; कोणी म्हणतात समोरचें या क्षणींचें काम नीट न करतां, या वेळचा, या क्षणींचा प्रश्न कसा सोडवायचा तें न बघतां, उगीच मोठमोठ्या गोष्टींविषयीं बोलत राहतो. हे आरोप खरे असतील वा नसतील. परंतु एक गोष्ट मात्र नाकारतां येणार नाहीं. आणि ती ही कीं जवाहर खरोखरच थोर थोर स्वप्नांत रमणारा आहे. मनोहर स्वप्नें मनांत खेळवणारा आहे. भविष्य काळांतील थोर गोष्टींचीं स्वप्नें तो बघतो; त्यांत तो रमतो. हीं स्वप्नें त्याला

जरी प्रत्यक्ष सृष्टींत पाहतां आलीं नाहींत, तरी दुसरे कोणी पाहतील. परंतु त्याचीं स्वप्नें स्वतःविषयींचीं नसतात, वैयक्तिक नसतात. भारताच्या भविष्याभोंवतीं तीं गुंफलेलीं असतात, विणलेलीं असतात. तो महान् भारत, ज्याच्या आगामी उज्ज्वल भवितव्या-विषयीं जवाहरला तिळभरहि शंका नाहीं. ज्या भारताच्या भविष्यकालीन मोठेपणाची त्याला निःशंक खात्री आहे, आणि ज्याच्या सेवेत तो आनंदानें आपले प्राणहि अर्पील—अशा भारताच्या भोंवतीं त्याचीं स्वप्ने नाचत असतात.

" भुताप्रमाणें माझ्या लहानपणाच्या जागांभोंवतीं मी हिंडलों. तीं पूर्वपरिचित माणसें भेटावीं, तीं चिरपरिचित तोंडें दिसावीं म्हणून मी साऱ्या पृथ्वीला प्रदक्षिणा करायला निघालों; परंतु सारी पृथ्वी म्हणजे ओसाड वाळवंट वाटलें."

* * *

" आणि ती कांहीं मंडळी मेली; आणि दुसरेहि कांहीं कायमचे सोडून गेले; आणि कांहींना माझ्यापासून ओढून नेण्यांत आलें. सारीं गेलीं, सारीं; ते परिचित चेहरे; तीं ओळखीचीं माणसें, सारीं गेलीं. "

—चार्लस् लॅम्ब

जवळजवळ एक वर्षापूर्वीं, एका वर्षाहून थोडे अधिक असेल, मी अलाहबादला जात होतें. बरोबर हर्ष नि अजित दोघे लहान मुलगे होते. आमच्याबरोबर राजा येऊ शकला नाहीं. तो पाठीमागून येणार होता. इंदिरेच्या विवाहसाठीं आम्ही जात होतों. प्रवास परिचयाचा होता. वाटेंतील प्रत्येक दृश्य पाठ होतें. गेल्या नऊ दहा वर्षांत या रस्त्यानें मी शतदां गेलें असेन. परंतु प्रत्येक वेळेस मी तेथें गेल्यावर कांहीं तरी अशुभ ऐकावें लागे. म्हणून जातांना हृदय सकंप असे, अस्वस्थ होत असे. या वेळेस काय ऐकावें लागणार, या वेळेस कोणतें ताट नशिबानें वाढलेलें असेल याचा विचार करीतच

मी जात असें. कधीं आई अकस्मात् अधिक आजारी झालेली असायची, किंवा जवाहर पकडला गेलेला असायचा, किंवा आणखी कांहीं असायचें. कांहीं तरी अनपेक्षित, दुःखकारक, अप्रसन्न असे कानांवर यायचेंच. परतु यावेळेस जातांना माझ्या डोळ्यांसमोर आनंद होता. कारण ज्या प्रसंगासाठीं मी जात होते, तो प्रसंग परम मंगल होता. इदिरा, माझी आवडती लाडकी भाची ! तिचा विवाह व्हायचा होता.

अलाहाबाद स्टेशनवर उतरलों, तेव्हां बरीच रात्र झाली होती. स्टेशनवर आम्हांला न्यायला मोटर आली होती. आम्ही पधरा मिनिटांत घरीं आलो. आनदभवन दिसलें, नेहमीप्रमाणें त्या माझ्या जुन्या घराविषयीं माझ्या हृदयांत प्रेमाच्या ऊर्मि उचंबळल्या. बरीच रात्र झाली होती, तरी आनदभवन आज लखलख करीत होतें. सुंदर रोषनाई होती. घरांत गडबड होती, लग्नघाई होती. लोकांची ये–जा सारखी सुरू होती. गडी माणसें आंतबाहेर करीत होतीं. कामांत व्यग्र होतीं. प्रत्येक खोलींतून कानांवर बोलण्याचे, हंसण्याचे आवाज येत होते. किती तरी वर्षांनीं आनदभवनानें आज उत्सवरूप धारण केलें होतें ! आनंदभवन आज आनदी होते.

आमची मोटर सावकाशपणें त्या भव्य दरवाजांतून आंत गेली नि थेट प्रवेश-द्वारापर्यंत तिच्यांतूनच आम्ही पुढें गेलों. मोटर थांबतांच, मुलांना विसरून, भावाला शोधण्यासाठीं उडी मारून मी गेलें. मी एकदोन पायऱ्या चढलें असेन नसेन तोंच तो आला. त्याने मला, मुलांना जवळ घेतलें. त्या जुन्या परिचित वातावरणांत जणु आम्ही पुन्हां होतों. मनाला बरे वाटत होते. जवाहर, स्वरूप, इतर मंडळी सर्वांना एकत्र बघून मला आनंद झाला. ज्या ज्या वेळेस मी आनदभवनांत येत असे, त्या त्या वेळेस हृदय भरून येत असे. परंतु ते क्षणभरच. लगेच जाणीव होई कीं हे प्रियतम आनंदभवन आतां पूर्वीचें नाहीं. किती तरी प्रिय मंडळी आज येथें नाहींत. आणि नवीन जोराचे बदलहि होत आहेत. अशा वेळीं आंतून अश्रु उसळत, परंतु बाहेर येत नसत. तथापि या वेळेस ही खिन्नता मी येऊं देणार नव्हतें. आम्हां सर्वांनाच तो आनंदाचा दिवस होता. अशा दिवशीं मी खिन्न नाहीं दिसतां कामा.

गेल्या कित्येक वर्षांनीं घरांत कहर उडवला होता. जें घर एके काळीं सुखाचें अन् शान्तीचे माहेर होते, त्या घराला आतां अवकळा आली होती, तरी त्या घरांत पुनःपुन्हां यावेसे वाटे. त्या घरांत आल्याने अद्यापहि बरें वाटे. कारण तेथें भावाचें प्रेम मिळे; त्याची ऊब मिळे; काळजी घ्यायला तेथे वहीण असे. आणि पुन्हां निष्काळजी, अल्लड अशी अठरा वर्षांची मुलगी जणु मी बनें !

लग्नदिवस उजाडला. प्रकाशमान सुदर मगल असा दिवस ! विवाह समारंभाची सारी सिद्धता झाली आहे कीं नाहीं, कांहीं राहिले तर नाहीं ना, हे पाहण्यासाठीं पहांटेपासून

लोक उठले होते. सारें बघत होते. चुलत भाऊ, चुलत बहिणी, मित्र, मैत्रिणी, किती तरी मडळी नवरीच्या खोलींत जमली होती. तिला चिडवीत होती. थट्टा मस्करी चालली होती. इदिराने विवाहवस्त्रे परिधान केलीं. शुद्ध खादीचीं तीं वस्त्रें होतीं. तुरुंगांत असतांना पित्याने कांतलेल्या बारीक सुंदर सुताचीं विणलेलीं तीं प्रेमळ मंगल वस्त्रे होतीं. इंदिरे-भोंवतीं तरुणींची गर्दी होती. गंमत होती. इदिरा जरा बावरलेली, जरा सलज्ज अशी दिसत होती. परंतु मनाची चलबिचल दिसूं नये अशी तिची खटपट होती. मुखावर शांति धारण करीत होती. आप्तेष्ट मित्रवेष्टित अशी ती तेथें बसली होती. अहेरांच्या राशि समोर पडल्या होत्या. शेकडों विवाह-भेटी. इंदिरा आधींच प्रिय-दर्शिनी; दिसायला गोड नि सुंदर; आज ती अधिकच गोड दिसत होती. अधिकच रमणीय दिसत होती. ती नाजूक दिसे. स्वप्नमय, परींच्या राज्यांतून, जणूं ती स्वर्गातून खालीं उतरली होती. ती हसत होती. बोलत होती. परतु मधूनच तिचे ते काळेभोर टपोर डोळे कुठे तरी दुःखाने दूर बघत आहेत असें वाटे. त्या डोळ्यांत कृष्णछाया पसरे. कां बरे ती कृष्णछाया ? अकालीं मेलेल्या आईबद्दलची का ती उत्कंठा होती ? तिच्या मृत्यूने जीवनांत निर्माण झालेली शून्यता अद्यापहि भरून नव्हती का आली ? तो खळगा का तसाच होता ? का पित्यापासून आतां दूर जावे लागणार म्हणून तें दुःख होतें ? तो पिता, ज्याचे ती जणूं जीवन बनली होती, प्राण बनली होती ! पित्याला अशा स्थितींत ती सोडून जाणार होती कीं ज्या स्थितींत जीवन अधिकच शून्यमय सुनेसुने असें त्याला वाटेल. कदाचित् तें दुःख अशासाठींहि असेल कीं सारे जुने स्नेहबंध सोडून नवीनच जीवन सुरू करायचें होतें. त्या नवीन जीवनांत काय काय असेल ? सुख ? दुःख ? मनोरथपूर्णता ? कीं भ्रमनिरास ? ते काळे डोळे अधिकच काळवडत. परंतु एक क्षणभरच. नंतर पुन्हां ते स्वाभाविक स्वरूप धारण करीत; आणि अथांग डोहाप्रमाणें वाटत.

मगल घटका जवळ आली. जवाहर इदिरेला घेऊन लग्नमडपांत आला. नवरदेव तेथें नवरीची वाटच पाहत होता. विधि साधा सुटसुटीत होता. अगडबब असें कांहीं नव्हतें. आवश्यक तेवढाच भाग ठेवण्यांत आला होता. वधू नि वर शेजारी शेजारी बसलीं. त्यांच्यासमोर वधूचा पिता होता. पित्याच्या शेजारीं एक आसन मांडून ठेवण्यांत आले होतें. कोणासाठीं ? त्याच्या पत्नीसाठीं. जरी ती देहाने तेथे नव्हती, तरी त्या दिवशीं त्याच्या विचारांत सारखी तीच होती: त्याच्या जीवनाचा जणूं ती भाग होती. त्या रिक्त आसनाकडे पाहणे अति करुण नि दुःखद होते. ते रिक्त आसन ! केवढा अर्थ त्यांत होता, किती दुःख ! तिचा विचार मनांत येऊन माझा कठ दाटला. आज ती असती, तर तिला किती धन्य वाटले असते ! मला डोळ्यांसमोर जणु ती दिसू लागली. तरुण, स्मित करणारी, आनदाने नि

विनोदानें नाचणारे डोळे, वधूपेक्षा जरा किंचित् वयस्कर दिसणारे–अशी तिची मूर्ति डोळ्यांसमोर मी आणू शकत होते. परंतु "असे–झाले–असते तर" ते विचार मीं दूर केले. सारे खिन्न नि उदासवाणे विचार दूर घालवण्याचा मीं यत्न केला. कारण त्या विचारांना यावेळींच आळा घातला नसता, तर ते सारखे लाटांप्रमाणे अधिकाधिक येतच राहिले असते. आणि सुखाचा दिवस–त्याची शोभा गेली असती.

कांहीं दिवस विवाहभोजनें चालू होतीं. मेजवान्या होत होत्या. ते जुने घर बरेंच प्रसन्न नि आनंदी दिसले. परंतु एकामागून एक पाहुणे परतू लागले. आणि कांहीं आठवड्यांनीं मीहि मुंबईला आले.

एक वर्ष गेलें. पुन्हां एकदां मी अहलाबादच्या मार्गावर होते. माझी बहीण स्वरूप ९ महिन्यांच्या तुरुंगवासानंतर पंधरा दिवसांच्या परवानगीने बाहेर आली होती. एक आठवडा तिच्याबरोबर दवडण्यासाठीं मी जात होते. त्या परिचित स्टेशनवर किती तरी रात्रीच्या वेळीं मी उतरले. पूर्वीपेक्षां ते स्टेशन जरा अधिकच मोडकळीस आलेले दिसत होते. माझी मैत्रीण नि भाची–म्हणजे स्वरूपची मुलगी मला स्टेशनवर भेटलीं. आम्ही घरीं यायला निघालों. या वेळेस मोटर नव्हती. जुन्या काळांतील टांग्यांत बसून चाललों. त्या वाईट रस्त्यांतून टांगा कसा तरी रखडत रांगत जात होता.

शेवटीं आनंदभवनाच्या दरवाजांतून आम्ही आंत आलों. एक वर्षापूर्वीच्या ज्या दृश्यानें माझें स्वागत केलें होतें, त्याहून आजचे दृश्य किती विभिन्न! लखलखीत दिवे नाहींत, इकडे तिकडे धांवपळ करणारे नोकर चाकर नाहींत. जवळजवळ अंधारच होता. फक्त पोर्चमध्यें एक अधुक दिवा होता; आणि दुसरा एक एका खोलींतून डोकावत होता. आमचे घर उदास, निःस्तब्ध, परित्यक्त असे दिसले. अपरिचित अशा जागेवर मी चालत आहे, असें वाटले. हेंच का ते आमचे घर? एक चमत्कारिक भीतीची भावना मनांत शिरली. एकदम हतधैर्य वाटलें. घरांत काय आढळणार याची कल्पना नव्हती. खचलेल्या हृदयानें टांग्यांतून मी उतरले नि स्वरूपच्या शोधार्थ निघाले. मी तिच्या खोलींत शिरतांच ती उठली. तिने माझें अभिनंदन केले, मला मिठी मारली. मीं माझे हात तिच्या गळ्याभोंवती घातले. तिची ती बदललेली चर्या पाहून मला काय वाटत होते ते मी तिच्यापासून लपवीत होते. माझे हृदय विरघळून गेले होते एक वर्षापूर्वी मी तिला पाहिले होते. त्या वेळेस स्वतःच्या वयाहून दहा वर्षांनीं लहान ती दिसत होती. नऊच महिने ती तुरुंगांत होती. आणि आतां दोन आठवड्यांपुरती बाहेर आली होती. पुन्हां एकदां तुरुंगाने एका प्रिय व्यक्तीची प्रकृति ढासळून टाकली. त्या नऊ महिन्यांत किती तरी वयस्कर ती दिसू लागली. तुरुंगांतील जीवनाची खूण तिच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें दिसत होती. किती बदललेला पालटलेला, तो चेहरा!

आठवडाभर राहून मी माझ्या घरीं, माझ्या मुलांकडे परत आलें. प्रिय जनां-विरहित असें जीवन जगू लागलें. स्वरूपला पुन्हा बेमुदत तुरुंगांत जावें लागलें. आपल्या तीन्ही तरुण मुलींना बाहेर सोडून तिला जावें लागलें. त्या तीन मुली कोठें राहणार? ज्या जगांत आशेचें नि सुखाचें स्थान विफलता नि कटुता यांनीं घेतलेलें आहे, अशा या जगांत स्वतःच स्वतःचें शक्य तितकें संरक्षण त्या मुलींनीं करून घेतलें पाहिजे होतें.

मुंबईला नेणाऱ्या गाडींत मी बसलें होतें. पुन्हां आनंदभवनांत कधीं जाईन, तेथें गेल्यावर पुन्हां नवीन फेरबदल काय दिसतील, याचा विचार करित मी बसले होतें. हास्य नि आनंद यांनीं भरलेलें असें आनंदभवन पुन्हां दिसेल का? कां ज्यांतील सारा आनंद, सारें सुख निरस्त झालें आहे असें सुनें सुनें उजाड असें तें दिसेल! आशा करीत होतें, कीं तें आनंदमयच दिसेल. वडिलांनीं जेव्हां आमच्या घराचें आनंदभवन नांव ठेवलें, तेव्हां तें सदैव आनंदाचें माहेर असावें अशा अर्थानें ठेवलें तें आनंदभवन पुन्हा तसें होवो म्हणून मीं मुकी प्रार्थना केली!

अति खिन्न अशा मनःस्थितींत मी माझ्या लहानशा मुंबईच्या गाळ्यांत आलें. आमचेंहि लहानसें घर—घर, म्हणून थोडेंच होतें? कारण राजा आमच्यांत नव्हता. जीवनाचा प्रवाह तर पुढें जातच असतो, गेलाच पाहिजे, हें खरें. राजा नाहीं म्हणून घर असून नसल्यासारखें. आणि जवाहर व इतर हजारो लोक तुरुंगांच्या गजांआड अडकलेले असतांना जीवनांत सुख, समाधान कोणतें असणार, कसें असणार? गेलीं चार वर्षें महायुद्ध सुरू आहे. साऱ्या मानवजातीला त्यानें ग्रासलें आहे. आम्हांला स्वातंत्र्य न देतांहि, या महायुद्धाच्या खाईंत मात्र लोटण्यांत आलें आहे. आमची औपचारिक समातिहि त्यासाठी घेतली गेली नाहीं. हें युद्ध जगाला स्वातंत्र्य नि शांति देण्यासाठीं आहे असें आम्हांला सांगण्यांत येतें. आणि असें असूनहि गेल्या चार वर्षांत पदोपदीं आम्हांला स्वातंत्र्य नाकारण्यांत आलें; आमच्या स्वातंत्र्याचा हक्क अमान्य करण्यांत आला. आमच्या नेत्यांच्या नेतृत्वाखालीं आमच्या देशांतील मनुष्यबळ नि इतर साहित्यबळ आम्हांला एकवटू दे असें आम्हीं म्हटलें तर त्यालाहि नकार! दोस्तासाठीं वाटणारी सहानुभूति परंतु साम्राज्यवादाबद्दल वाटणारी चीड, यांच्यामध्यें आमच्या लोकांची कुतरओढ होत होती, ओढाताण होत होती, ताणाताणी होत होती. म्हणून आम्हीं युद्धहेतूंची स्पष्ट घोषणा करा अशी मागणी केली. स्वातंत्र्याची सर्वांना ज्यांत ग्वाही दिलेली असेल अशी घोषणा आम्हांला हवी होती. परंतु आम्हांला साधें उत्तरहि देण्यांत आलें नाहीं. होना करतां करतां १९४२ मध्यें युद्धोत्तर स्वातंत्र्याचें एक अभिवचन आम्हांला देण्यांत आलें. परंतु हें दिलेलें वचन इतकें सशर्त होतें, त्याच्याभोंवतीं इतकीं कुपणें होतीं, इतक्या अडचणी उभ्या

करून ठेवलेल्या होत्या, कीं कोणत्याहि राष्ट्राला त्या अटी कधीं पुऱ्या करतां येणें शक्य नव्हतें. शिवाय गतकाळांत अशीं अभिवचनें आम्हांला का थोडीं दिलीं गेलीं होतीं? परंतु त्यांतील एकहि आतांपर्यंत पाळण्यांत आलेलें नाहीं. जें स्वातन्त्र्य, जी लोकशाही आम्हांला सदैव नाकारण्यांत आली आहे, तिच्या रक्षणासाठीं आम्हाला रक्त सांडायला सांगणें, उपासमार सहन करा म्हणून म्हणणें, साऱ्या हालअपेष्टा मुकाट्यानें भोगा असें सांगणे–ही केवढी उपहासाची गोष्ट, हा केवढा दंभ! केवढी वचना!

आज आमच्या भवितव्यावर आमची हुकमत असावी या हक्कासाठीं, स्वातंत्र्यासाठीं भीषण लढा लढण्यांत आपण गुंतलेले आहोंत. आमच्या देशांतीलच साम्राज्यवाद नष्ट व्हावा असे नाहीं आम्ही म्हणत; तर जगांत जेथें जेथें तो असेल तेथून तेथून तो नष्ट व्हावा अशी आमची इच्छा आहे. परकी सत्ता नि पिळणूक यांच्यापासून आमचीच नव्हे, तर साऱ्या जगाची सुटका व्हावी अशी जी महान् इच्छा, अशी जी इच्छिणारी शक्ति, त्यांचें प्रतीक म्हणजे आमची ही स्वतन्त्रता आहे. १९४१ मधील आमचा वैयक्तिक सविनय कायदेभंग ब्रिटिशांनीं आपले युद्धहेतु जाहीर करावे म्हणून होता. जगाच्या नैतिक भावनेला ती हांक होती. परंतु ती व्यर्थ गेली. आम्हीं ती हांक सतत मारीत राहिलें पाहिजे. अधिक आगींतून आम्हीं गेलें पाहिजे. हिंदुस्थानच्या सीमांना धोका होता, तरीहि राष्ट्रीय सभेने जनतेला अधिक बलिदान करायला हांक मारली. कारण आतां मानवजातीचें स्वातन्त्र्य, साऱ्या जगांतील शांति एवढाच प्रश्न उरला नव्हता; तर आमच्या देशाच्या रक्षणाचाहि प्रश्न होता. फॅसिस्ट आक्रमणांपासून आमच्या देशाचें रक्षण करायचें होतें म्हणून आजचा लढा सुरू होणें अपरिहार्य होतें. परंतु तरीहि तो लढा राष्ट्रीय सभेनें आपण होऊन सुरू केला नव्हता. सरकारनें ज्या वाटाघाटी राष्ट्रीय सभा करणार होती, त्या करायला लागण्यापूर्वीच पुढाऱ्यांना झडप घालून पळवून नेलें आणि लढा पेटला. हिंदी स्वातंत्र्यार्थ चाललेला हा आमचा लढा संकुचित राष्ट्राभिमानाचें प्रतीक नसून, अखिल मानवजातीच्या व्यापक नि खऱ्या अर्थानें असणाऱ्या स्वातन्त्र्याचें प्रतीक आहे. अखिल मानवजातीच्या स्वातन्त्र्याच्या प्रेरणेंतूनच हा हिंदी स्वातन्त्र्याचा लढा सुरू झालेला आहे. हिंदी जनतेनें फॅसिझम नि साम्राज्यवाद यांना सदैव विरोधच केलेला आहे. चीन, स्पेन नि इतर देश यांना जी कांहीं लहानसान मदत करतां येईल ती हिंदी जनतेनें स्वत: उपाशीं राहून केली आहे. आपली सक्रिय सहानुभूति दाखविली आहे. जेथें प्रत्यक्ष मदत करतां येणें शक्य नव्हतें, तेथें आपली सहानुभूति, आपली श्रद्धा, जगांतील सर्व पददलितांच्या कार्यावरील आपली निष्ठा पुन्हां घोषवून सांगितली आहे.

आज आमच्यासमोर, साऱ्या जगाच्याच समोर एकच ध्येय आहे. या जगांत मूलगामी बदल झाला पाहिजे, या महायुद्धांतच राजकीय, सामाजिक नि आर्थिक क्षेत्रांत

क्रान्तिकारक बदल झाले पाहिजेत. तसें होतील, तरच आम्ही आमच्या लोकांना जपानी आक्रमणापासून स्वदेशाचे रक्षण करण्यासाठीं उभे करू शकूं; आणि या देशाचा अध:पात थांबवून प्रगतिपथावर त्याला नेऊ शकू. सारें जग अधारांत आहे, गोंधळांत आहे. अशा या बजबजपुरी माजलेल्या जगांत, अस्ताव्यस्त जगांत थोडीफार शान्ति, व्यवस्था आम्हीच आणू शकू आमचे ते काम आहे. कदाचित् हिंदी जनतेच्या शक्तीबाहेरचें ते काम असेल. परतु जोपर्यंत ते ध्येय, ते स्वप्न आपल्या डोळ्यांसमोर आहे, आपण मशाल पेटत ठेवली आहे, तोंपर्यंत आशा आहे. जें आपण करू शकलों नाहीं, ते दुसरे करुन दाखवतील. सर्व मानव जातीचे हें जे सामान्य ध्येय त्याचा साक्षात्कार करुन घेतांना, त्याचा जीवनांत अवतार व्हावा म्हणून झगडत असतांना किती तरी अडचणी मार्गात येतील; किती तरी खांचखळगे दिसतील. परतु जोपर्यंत योग्य दिशेनें आपलीं पावलें पडत आहेत, आणि आपले डोळे धिमेपणाने परंतु अविचलपणे समोर पाहत आहेत, तोंपर्यंत सारें ठीक आहे; तोंपर्यंत कशाची फिकीर नाहीं.

सर्व जगभर, विशेषत: हिंदुस्थानांत स्वातत्र्य मिळेपर्यंत विश्रांति वा शांति आपल्याला नाहीं; हजारोंना नाहीं. किंमत कांहींहि द्यावी लागो. सारें जीवन कष्टांत, हालअपेष्टांत दवडावें लागले तरीहि शांतपणे तसें केलें पाहिजे; आणि सुख व समाधान आपल्याला जरी मिळायचीं नसलीं, तरी आपल्या मुलांबाळांना अधिक सुखाचे जग राहायला मिळावे म्हणून आपण आपले कार्य सतत पुढे चालविलें पाहिजे. तो पिअरी व्हॅा पॅासे आपल्या " Thal Day Alone" या पुस्तकांत म्हणतो :—

" एक दिवस असा खात्रीनें उजाडेल, कीं ज्या दिवशीं माणसाला एकटे फिरण्याचा कटाळा येईल नि तो आपल्या भावाकडे वळेल. दुसऱ्याचीं सुखदु:खे, दुसऱ्यांच्या आशानिराशा, क्लेशकष्ट हें सारें आपलेंच आहे असें ज्या दिवशीं वाटायला आपण शिकू, त्या दिवशीं ज्या प्रेमाच्या नि न्यायाच्या जागतिक नवरचनेसाठीं साऱ्या विश्वाला तहान आहे, हे आकाशांतील अत्यत प्रशान्त रात्रीच्या वेळेस चमकणारे ग्रहोपग्रह ज्या त्या प्रेमाच्या नि न्यायाच्या नवनिर्मितीचीं भव्य परतु अपूर्ण प्रतीकें आहेत, त्या नवनिर्मितीचा दिवस, त्या नवसमाजव्यवस्थेचा दिवस जवळ आला असें आपण समजूं "

माझ्या जन्मापासून १९१९ पर्यंत माझे जीवन सुरळीत, शांत, सुखी असे होते. माझ्या शात जीवनांतील पहिली प्रक्षोभकारी लाट जालियानवाला बागेतील कत्तलीनें उठली. ज्या गोष्टीचा विचार मी पूर्वी कधीं करीत नसे, त्या गोष्टींचा मीं विचार त्यावेळेपासून करूं लागले. ती पाहिली लाट, पहिला उत्पात ! नतर पुष्कळ लाटा आल्या, प्रक्षोभ आले, क्रान्तिकारक फरक आले. मागच्यापेक्षां पुढचे अधिकच मोठे. १९२०

पासून पुढें सुरळीत असें जीवन आमच्यांतील कोणाचेंच उरले नाहीं. तरीहि आमचें कुटुंब अभग होते. आणि ती एक मोठीच गोष्ट होती. १९३१ मध्यें वडील निवर्तले. त्यांच्या मृत्यूने आमच्या जीवनांत पडलेला खळगा हा पुढील आपत्तीचा केवळ आरभ होता. १९३६ मध्यें कमला गेली. दोन वर्षांनीं नतर आई गेली. आर्थिक स्थितिहि तितकीशी बरी राहिली नाहीं. आमच्यापैकी कोणाचेंच जीवन मृदुमधुर असे, सुखी संपन्न असे राहिले नाहीं. परतु मला वाटतें कीं आमच्यापेक्षांहि आमच्या मागून येणाऱ्या तरुण पिढीलाच त्यामुळें अधिक कष्ट सोसावे लागले आहेत. सदैव ताटतुटी आणि इतर लहानथोर आपत्ति यांतून पार पडणे म्हणजे एक कठीण कसोटी असे. मी तर पुष्कळ वेळां हताश होते. माझें धैर्य अजिबात नष्ट होत नसेल, आशा संपूर्णपणें जात नसेल, तर याला कारण एकच आहे कीं आमचे ध्येय न्याय्य आहे अशी वाटणारी श्रद्धा नि खात्री. हे स्वातत्र्याचे ध्येय केवळ आमचेंच नाहीं, तर सर्व मानव जातीचें आहे. हाच एक विचार मला धीर देतो, मदत करतो: आणि मला खात्री आहे, कीं या विचारानें दुसऱ्याहि अनेकांस धीर येत असेल, कुरकुर न करतां, हताश न होतां, कटु तोंड न करतां सारीं दुःखें, जीवनांतील सारे वियोग सहन करण्याचे धैर्य याच एका विचारानें येते.

इतकीं वर्षें जीवनाची जी अनिश्चितता माझ्या कुटुबीयांनीं आणि मीं अनुभवली आणि अनुभवीत आहोंत, आणि जी हजारो लाखों देशभक्त अनुभवीत आहेत, त्यामुळें मनावर अपार ताण पडतो ही गोष्ट खरी. नेहमीचे सुखशांतीचे, सुरळीत जीवनाचे दिवस येतील अशी मी आशा करीत असते नि वाट पाहत बसते. ताटातुटी जाऊन सर्वांचीं पुनर्मीलनें व्हावीत, देशाला शांति लाभावी, वैभव लाभावें, अशी आशा खेळवीत मी बसते. परतु भविष्यकाळ फारसा उज्ज्वल दिसत नाहीं. परंतु माझ्या जीवनपथांत जीं जीं दुःखें आलीं—आणि तीं मागितलीं त्यापेक्षांहि अधिक आलीं–जे जे हाल मला काढावे लागले, काढावे लागत आहेत, आणि ज्या कसोटया अद्याप पुढें असतील, आयुष्यभर प्रक्षोभ हाच जरी माझा सखा असला, तरीहि जें जे आतांपर्यंत घडले, त्याच्याकडे बघतांना मला खेद वा खत वाटत नाहीं.

"बधूंनो, आपल्या साधेपणाचा शुभ्र पोषाख करून मदांधांपुढें आणि सत्तांधांपुढें उभें राहायला लाजू नका. तुमचा मुकुट नम्रतेचा असो. आत्म्याचें स्वातत्र्य हें तुमचें स्वतंत्र्य असो. आपल्या दारिद्र्याच्या विशाल माळरानावर दररोज प्रभूचे सिंहासन मांडा; आणि लक्षांत ठेवा, कीं जे अगडबंब दिसतें तें महान् नसतें; आणि गर्व चिरंजीव नसतो."

रवीन्द्रनाथ ठाकूर

[ " दोन बहिणी " नि " आठवणी " हे लेख म्हणजे " ना खेद ना खंत " हें पुस्तक ज्याच्यातून परिणत झालें ते आरंभीचे मूळ लेख. त्या लेखांतील विषयाचाच विस्तार " ना खेद ना खंत " यांत आहे. पुस्तक येथें संपलें. विषय न संपणारा अमरच आहे. ते दोन लेख मी देत आहें. कारण माझ्या मनांत सदैव घोळत राहणाऱ्या अशा आठवणी यात आहेत. " ]

## दोन बहिणी

दहा वर्षे वयाची एक लहान मुलगी आपल्या आईच्या बिछान्याजवळ उभी राहून नवागताकडे पाहत आहे नुकतीच जन्मलेली चिमुकली बहीण किती चिमणी परंतु किती निर्दोष ! दहा वर्षे वयाच्या मानाने ती मुलगी फारच शहाणी हें लहानगें छकुलें कोठून आलें वगैरे मुर्खपणाचे प्रश्न ती विचारीत नाहीं. त्या सर्व गोष्टींची अस्पष्ट कल्पना तिला होती. आणि तेथें उभी राहून निसर्गाची कलाकृति मोठ्या कौतुकानें नि आश्चर्यानें ती पहात होती. एक दिवस असा येईल कीं ज्या दिवशीं या मुलासारखेंच गोड बाळ मलाहि खेळायला मिळेल असा जणूं ती विचार करीत होती. तिचें हृदय त्या चिमकुल्या जीवाकडे ओढत होते. केवळ ते बहिणीविषयींचेंच प्रेम

नव्हते. तर तिच्या त्या ओढींत कांही तरी अधिकच होते. एक प्रकारची कोमलता नि सांभाळवृत्ति हींहि होतीं.

वर्षे गेलीं. एका खानदानी घराण्यात महोत्सव होता. चारी बाजूला आनंदाच्या खुणा होत्या. ते जुने घर सुंदर रीतीनें शृंगारण्यांत आले होते. आणि घरांतून संगीताचे नि हास्याचे ध्वनि ऐकूं येत होते. त्या घराण्यांतील सर्वात लहान मुलीचे आज लग्न आहे. ती पाहा तेथें बसली आहे. अद्याप कोंवळी आहे. फिकट रंगाची गुलाबी साडी ती नेसली आहे. उषादेवीपेक्षांहि रमणीय दिसत आहे. तिच्या शेजारीं तिची मोठी बहीण आहे. तं हि तरुण अति सुंदर आहे. निष्कलंक धवल अशी साडी तिनें परिधान केली आहे. अंगावर तिच्या दागिने नाहींत अलंकृत करायला. कारण ती बालविधवा आहे. तिचें लग्न झाले, तेव्हां ती अशीच लहान होती. आणि एका वर्षांतच तिचा नवरा मेला, ज्याची तिला ओळखहि नव्हती! परंतु आज तिच्या हृदयांत दुःखाला किंवा स्वतःची कींव करायला जागा नाहीं. जिला तिनेंच जवळजवळ वाढविले होते, अशी ती धाकटी बहीण आज विवाहबद्ध होत होती. मोठा आनंदाचा तो दिवस होता. तिची सारी भक्ति या बहिणीसाठीं होती. तिला स्वतःला कांहीं नको होते. सुंदर कपडे, मोलाचीं माणिक मोतीं, ऐषआराम कशाचीच तिला इच्छा नव्हती. एकाच गोष्टीसाठीं तिने सदैव प्रार्थना केली. आज तर विशेषेंकरूनच केली. ती गोष्ट म्हणजे आपल्या आवडत्या प्रियतम बहिणीच्या मार्गात कधीं दुःख न येवो, आपत्ति न येवो. आणि त्या लहान नवरीजवळ बसली असतांना तिचे हृदय तिचें सौंदर्य पाहून अभिमानाने नाचत होते. तिचे ते करुण पिंगट डोळे सारखे त्या नववधूकडे पाहत होते. किती रमणीय होते चित्र तिच्या डोळ्यासमोर!

आणखीं वर्षे गेलीं. ती लहानशी बहीण आतां सुंदर स्त्री झाली आहे. अनेक मुलांची ती माता बनली आहे. सुखी समृद्ध गृहाची स्वामिनी बनली आहे. आणि अशा रीतीने पुष्कळ वर्षे सुखासमाधानांत गेलीं, शान्तींत गेलीं.

नंतर त्या मोठ्या घरांत बदल होऊं लागले आज त्या घराचा धनी तेथे नव्हता. तो त्या घराला शोभवायला उरला नाहीं आणि धनीणहि दुःखी, कष्टी आहे. आणि जे घर एके काळीं हास्याने नि आनंदाने भरलेलें असे, तें आज मुके आहे, दुःखानें काळवंडले आहे. तो जो कोणी निघून गेला, त्याच्याबरोबर जणूं सारा सूर्यप्रकाश, सारें सौख्य हींहि निघून गेलीं. आणि तो जो गेला तोच तर त्या घराचा जणूं प्राण होता.

बागेच्या एका कोपऱ्यांत दोन वृद्ध स्त्रिया आहेत. परंतु वाढत्या वयानें तारुण्यांतील त्यांचे सौंदर्य अधिकच रमणीय केलें आहे; अधिकच वाढवले आहे; त्या दोघांतील जी ज्येष्ठ होती, ती अधिक सशक्त दिसत होती. क्वचितच् एखादा तिचा केंस पिकला असेल. त्याच्या खिन्न चेहऱ्यावर अवर्णनीय रमणीयता आहे. जणु ती

रमणीयता स्वर्गीय आहे. कनिष्ठ जी होती ती तशीच लहानशी, नाजुक राणी आहे. तिचे केस हिमधवल आहेत. त्या केसांनीं तिच्या तोंडाभोंवतीं जणं तेजोवलय निर्मिले आहे. त्या तोंडावर दुःखाच्या, वेदनांच्या खुणा आहेत. दुरून वाऱ्याबरोबर लहान नातवंडांचे आवाज ऐकूं येत होते; आणि मधूनमधून ते आवाज ऐकून दोघींच्या तोंडावर हास्य चमकत असे.

ती बिछान्याजवळ उभी होती. जणं पुतळ्यासारखी निश्चल होती. आपल्या लहान बहिणीच्या शान्त सुंदर मधुर मुखाकडे ती पाहत होती. मृत्यूंतहि ती अति सुंदर दिसत होती, जशी जिवतपणीं दिसत होती. परंतु मोठ्या बहिणीला सोडून तिला जाववले कसे ? मोठ्या बहिणीला सोडून कशी गेली ? तें शक्य नव्हते, जी नेहमीं भ्यायची, घाबरायची, ती अज्ञानांतील त्या महान् यात्रेला एकटीच कशी गेली ? तो प्रवास तिनें एकटीनें अंगीकारणे कसें शक्य होईल ? तिला एकटीला ती मोठी बहीण कशी जाऊं देईल ? तिनें पाठोपाठ निघालेंच पाहिजे. नाहीं तर तिचा हात कोण धरील, तिला धैर्य कोण येईल......

त्यांनीं तिला नेलें आणि मोठ्या बहिणीजवळ कांहीं उरलें नाहीं. तिच्याजवळ फक्त तिचें शक्तिचूर्ण झालेले रक्ताळ हृदय होतें. शांतपणें थकलीभागलेली, स्तंभित झालेली ती पडून राहिली. तिचे डोळे मिटलेले होते. आणि सर्व प्रकारचीं चित्रें तिच्या मनश्चक्षूसमोरून जात होतीं. लहानशी बहीण, अगतिकपणे आईच्या कुशींत असलेली, लहानशी नवरी अति सुंदर, आणि अति बाल-सदृश अशी; आणि तेजस्वी माता नि तिचीं मुलें-वयस्कर अशी बहीण, अशक्त, कृश, दुबळीं, आणि नतर-नंतर प्रियतम बहिणीसारखेंच कोणी तरी परंतु बहिणीसारखें नसणारेंहि कोणीतरी, इतकी फिक्कट मुद्रा आणि इतकी शान्तपणे पडून राहिलेली-जणं प्राणहीन, निर्जीव. परतु नाहीं, ती मृत नाहीं-ती सारी चूक होती. कारण ती पहा आपल्या वडीलबहिणीला बोलावीत आहे, त्या नदींतून पलीकडे जाण्यासाठीं मदत करायला बोलावित आहे, बहिणीच्या मुखावर हास्य चमकले- अति कोमल असें ते हास्य होते. आपल्या बहिणीचा हात धरण्यासाठीं, परलोकांत जातांना लागणाऱ्या नदींतून हात धरून तिला नेण्यासाठीं ती पहा आपला हात लांबवीत आहे, आणि असे करतांना तोंडावरचे अपूर्व असे अति कोमल हास्य !

आणि तोंडावर अनंत शांति असलेली अशी ती त्यांना आढळली. सुख नि शांति. होय, कारण थोड्या तासांच्या विरहानंतर लगेच आपल्या बहिणीच्या पाठोपाठ या जगांतून त्या जगांतहि शोधीत ती नाहीं का गेली ! आणि बहिणीला पुन्हां नाहीं का ती भेटली ? त्या दोघी पुन्हां भेटल्या. तिचें सारे जीवन म्हणजे बहिणीसाठीं पेटवलेला भक्तिप्रेमाचा महान् यज्ञ होता. त्या दोघींना अलग ठेवण्याचे सामर्थ्य मृत्यूंतहि नव्हतें. तोहि त्यांची ताटातूट करूं शकला नाहीं.

## स्मृति

एका कवीनें म्हटलें आहे कीं "स्मृति म्हणजे डिसेंबरांतील गुलाब." ज्या वेळेस शून्य वाटणाऱ्या जिवाला त्या सुंदर पुष्पांचा सुगंध आणून देतात, त्या वेळेस त्या तशा असतात. परंतु साऱ्याच स्मृति सुंदर नसतात. कांहीं स्मृतींवर खिन्नतेची छटा असते; कांहींवर दुःखाच्या, हळहळीच्या छटा असतात; आणि कांहीं स्मृति तर अशा वेदना घेऊन येतात, कीं ज्या काळानें वा वातावरणानें बदलत नाहींत, कमी होत नाहींत. आपल्याजवळ सुखी दिवसांच्या स्मृति असतात, सूर्यप्रकाशाचे, हास्याचे दिवस–त्यांच्या स्मृति; त्याप्रमाणेंच ज्या वेळेस काळ्या मेघांनीं सूर्य झांकोळल्यासारखा होतो, ज्या वेळेस जीवन निरुपयोगी, शून्य असें वाटतें, अशा वेळच्या दुःखदायक स्मृति, त्याहि आपल्याजवळ असतात. परंतु या साऱ्या स्मृति जातात–कारण त्या गेल्याच पाहिजेत. कांहीं आपल्या थोड्या खुणा ठेवून जातात. परंतु कांहीं मात्र अविस्मरणीय असतात.

माझ्या बाळपणच्या घरीं जेव्हां जेव्हां मी जातें, तेव्हां स्मृति माझ्यावर हल्ला चढवितात. अपूर्व नि आश्चर्यकारक अशा धन्यतम बाळपणींच्या स्मृति, त्याप्रमाणेंच पुढील आयुष्यांतील शोकदायक स्मृति–अशा दिवसांच्या, कीं जे दिवस आपण पुन्हां जगूं शकत नाहीं. हृदय फुटेपर्यंत हृदयाला रडवणाऱ्या स्मृति; कारण पूर्वीं होतें तसें आज तें जुनें घर नाहीं. आणि ज्या ज्या वेळेस मी जातें, त्या त्या वेळेस तेथें कांहीं तरी नवीन बदल असतोच.

मी त्या जुन्या परिचित अशा बागेंत बसलें. सदैव बदलणाऱ्या जगांतील न बदलणारा असा भाग फक्त तेथेंच होता. माझ्या डोळ्यांसमोर तें भव्य घर होते, जें माझें घर होते. न पाहणाऱ्या डोळ्यांनीं मी त्याच्याकडे बघत होतें. कारण माझे विचार कोठें तरी दूर गेले होते. जे पुस्तक वाचायला म्हणून मीं आणलें होते, तें मांडीवर तसेंच उपेक्षिताप्रमाणे पडलें होतें. माझ्या पायांजवळ आणि सभोंवतीं सुंदर फुलपांखरें नाचत होतीं. हिरवळीचा ताजा वास येत होता. आणि वाऱ्याच्या झुळुकेसरशीं गुलाबाचा सुगंधहि येत होता. मी जरा तेथेंच आडवी झालें. एक सुस्कारा मीं सोडला. कारण माझ्या सभोंवतालचें सारें जरी सुंदर होतें, शांत होते, तरी माझ्या हृदयांत जें मला पकडून ठेवतां येत नव्हतें, जें मीं गमावलें होते आणि जें मीं पुन्हां मिळवू शकत नव्हते, अशा गोष्टीसाठीं एक प्रकारची हुरहुर होती, मद दुःख होते. आणि माझे विचार असंबद्धपणें सर्वत्र फिरत असतां मला झोंप लागली. जो काळ होता, जो आतां केवळ स्मृतिरूप झाला, त्या काळाचीं स्वप्ने पाहायला मी झोंपलें.

मीं एक माणसांनीं गजबजलेले घर पाहिलें. चांगले मोठें प्रशस्त ऐसपैस पसरलेलें जुने घर. त्या घरांत पैशानें नि अभिरुचीनें जे जे ऐषआराम आणणे शक्य होतें, ते ते सारे आणण्यांत आले होते. त्या घराचा मालक दिसायला रुबाबदार आहे, सुंदर आहे. त्याचे व्यक्तिमत्व अतिमानुषी जणू आहे, अति सामर्थ्यसंपन्न असें आहे. सारें घर जणू त्याच्या अस्तित्वाने भरलेलें होतें. त्याचें हास्य, कुटुंबावर असणारें त्याचें प्रेम—यांनीं तें घर भरलेलें आहे. एकीकडे त्याची प्रिय मंडळी आणि एकीकडे सारे उपद्रव यांच्यामध्यें तो सामर्थ्याचा जणुं महान् स्तंभच असा उभा असे. घराची स्वामिनी वर्णनांतीत सुंदर आहे. परंतु दुबळी अशक्त आहे. आपल्या कुटुंबाची ती काळजी घेत आहे. इकडे तिकडे धांवपळ करीत आहे. अशा अशक्त माणसांत इतकी उत्साहशक्ति आली तरी कोठून, असे आश्चर्य वाटे. पाहूं तेथें जीवन आहे, उद्योग आहे, सुख समाधान आहे. अशा या वातावरणांत तीन मुलें वाढलीं.

पुढें कांहीं वर्षांनीं. घर तेच. परंतु सारा डामडौल नाहींसा झाला होता. वैभवाच्या, थाटामाटाच्या साऱ्या खुणाहि पार धुतल्या गेल्या. कांहीं वर्षांपूर्वी जेथें उधळपट्टी करणारें भव्य वैभव होतें, तेथें आज केवळ साधेपणा होता. परंतु आंतील माणसें तींच होतीं. आणि धन्याचे तें महान् मुक्तहास्य अद्यापहि साऱ्या घरांत घुमत होतें आणि ज्यांना निरुत्साह नि गलित वाटत असेल, त्यांना उत्साह देत होतें. कारण जो बदल दिसत होता, तो दुर्दैवामुळें आलेला नव्हता. तर जीवनाकडे पाहण्याची दृष्टिच बदलली म्हणून नि कांहीं राजकीय सिद्धान्त श्रद्धेनें जवळ केले, म्हणून तो दिसत होता.

आणखी थोडीं वर्षे गेलीं. जुन्या घराशेजारीं एक नवे घर बांधलेलें आहे. ते घर जणूं स्वप्नमय भासत आहे. प्रेमळ पित्यानें प्रिय पुत्रासाठीं बांधलेलें घर. परंतु या घरानें आंत राहणाऱ्यांना सुख फारच थोडें दिलें, दुःख मात्र अपार चाखविलें.

एक प्रशस्त खोलींत एक वृद्ध मनुष्य बसलेला आहे. त्याचे केंस हिमधवल आहेत. त्याचे मस्तक विचारमग्न असल्यामुळें वांकलेलें आहे. तो फार आजारी होता. परंतु मुलाला त्याच्या कांहीं राजकीय मतांसाठीं मुलाला पकडून नेण्यापूर्वी त्याला एकदां बघावें, त्याच्याजवळ बोलावें म्हणून शेंकडों मैलांचा प्रवास अंगीकारून तो आला होता. तो वृद्ध मनुष्यहि त्याच राजकीय विचारांसाठीं तुरुगांतील कोठडींत कांहीं महिने राहून आला होता, पुन्हां जायला तयार होता. अगदीं वेळेवर तो आला. मुलाला घेऊन जाण्यापूर्वी त्याचा हात क्षणभर हातांत घेण्यासाठीं अगदीं वेळेवर तो वृद्ध मनुष्य आला होता. त्याच्याजवळ एक लहानशी स्त्री बसलेली आहे. शौर्यानें त्याच्या जीवनाचा, त्याच्या सुखदुःखांचा भाग तिनेंहि उचलला आहे. कधीं नव्हती इतकी अशक्त ती दिसत आहे. परंतु आश्चर्य हें, कीं तिनेंच त्याला प्रत्येक नवीन घाव सहन करण्याचे धैर्य दिलें होतें. ती इतकी भीत्री नि दुबळी दिसायची! तो निर्भय नि बलवान होता. परंतु ती त्याची आपत्काळची स्फूर्तिदात्री, धैर्यदात्री होती.

खोलीच्या एका कोपऱ्यांत घरांतील वडील मुलगी बसली आहे. तिचें लग्न झालेलें होतें. तिला मुलें होतीं. आणि म्हणून आपल्या आईबापांना काय वेदना होत असतील ते ती जाणू शकत होती. तिचे डोळे त्यांच्यावर खिळले होते; अनिमिष नेत्रांनीं आणि सचिंत मनानें ती त्यांच्याकडे पाहत होती. त्यांचे तें मुकें दुःख पाहून, आणि तें दूर करायला कांहीं उपाय नाहीं असे मनांत येऊन तिचें हृदय विदीर्ण झालें होतें. खोलीच्या दुसऱ्या भागांत लहान मुलगी उभी होती. भिंतीला टेंकून, दुसऱ्यांकडून तोंड फिरवून ती उभी होती. ती त्यांच्याकडे पाहत नव्हती. तिच्याहि हृदयांत दुःख होतें डोळ्यांत न ढाळलेले अश्रु होते. आणि तिच्या मनांत बंडखोर विचारांची गर्दी उसळली होती. जें जें नशिबांत असेल, ते ते मुकाट्यानें भोगायचें अशी बाकीच्यांची वृत्ति दिसत होती. परंतु तिची तशी नव्हती, कधीं कधीं तिला वाटे, कीं त्यांचे जें महान् ध्येय आहे, त्याच्यासाठीं ह्या हालअपेष्टा आवश्यकच आहेत. परंतु पुन्हां कांहीं वेळानें शंका नि संशय नि अविश्वास तिच्या मनाचा कबजा घेत. चिंता, शून्यता यांच्या बोजाखालीं वांकलेल्या आईबापांना पाहून तिची श्रद्धा जरा डळमळत होती. तिच्या आईबापांनीं साऱ्या जगावर सत्ता चालवली होती. साऱ्या दुनियेचे ते मालक झाले असते. सर्व चिंता, कथाकाळजी यांपासून ते दूर राहिले असते. असें असूनहि त्यांनीं कर्तव्याचा कठिण पथ स्वीकारला होता. मानवजात नि आपलें राष्ट्र यांच्या सेवेसाठीं त्यांनीं आपलीं जीवनें वाहिलीं होतीं. परस्परविरोधी विचारांची हृदयांत चाललेली ही लढाई तिला अपार त्रास देत होती. ती तेथें उभी होती. परंतु ज्यांचें दुःख ती कमी करू शकत नव्हती, त्यांच्याकडे ती पाहूं शकत नव्हती. प्रिय पुत्र जवळ नसल्यामुळें ते घर जणु मुकें बनलें होतें; परंतु ज्या मुलाला आपल्या चार भिंतींत वाढवलें, त्या मुलाचा अभिमान त्या घरालाहि जणु वाटत होता. तें

जुनें घर, जेथें तो पुत्र लहानाचा मोठा झाला होता, तें स्वाभिमानपूर्वक उभे होतें. आईबाप बसून होतीं. किती वेळ झाला इकडे त्यांचें लक्ष नव्हते. कांहीं मैलांवर असलेल्या तुरुंगांतील एक थंडगार खोलींत असणाऱ्या आपल्या मुलाची त्यांची तहान होती. तो त्या थंडगार तुरुंगांतील खोलींत आणि ते त्या प्रासादसदृश घरांत होते. सभोंवतालचीं मुखें पाहून त्यांना त्यांची चीड येई.

थोडावेळ ते बसले. प्रत्येक जण आपापल्या विचारांत गुंग होता. परंतु सर्वांचे विचार एकाच व्यक्तीभोंवतीं प्रदक्षिणा घालीत होते. एक क्षणभरच–आणि सुस्कारा आंतल्या आंत दाबून पिता उठला. त्याची ती दृढ हनुवटी अभंग निर्धारानें आणखीच दृढतर दिसली. जें काम मुलाला करूं देण्यांत येत नाहीं, तें आपण पुढें चालवलें पाहिजे. आपण कार्यांत रंगलें पाहिजे असें त्यानें ठरविलें; आणि रुंद खांदे अधिकच रुंद करीत तो निघून गेला. आणि महान् पुत्राची ती माता, ती दिसायला लहानशी माता, तीहि उठली. तिच्या तोंडावर शूर--हास्य होतें; जरी हृदय विद्ध झालेलें होतें. पूर्वीप्रमाणेंच दिवसाचें आपलें काम करायला तीहि उठली.

आणखी वर्षे गेलीं. हजारों लोक कित्येक मैलपर्यंत रस्त्याच्या दोन्ही बाजूने रांगेंत उभे आहेत. एकहि डोळा असा नाहीं, कीं जो रडला नाहीं. एकहि हृदय असें नाहीं, कीं जें विदीर्ण झाले नाहीं. स्वतःचेंच जणूं कांहीं तरी तुटलें फुटलें, गमावलें असें हृदयाहृदयाला वाटत होतें. ते त्या महान् मृताला वंदन करायला आले होते. तो प्रभु आज त्यांच्यांत नव्हता. सदैव झुंजणारा तो महावीर मृत्यूशींहि झुंजला. किती तरी दिवसरात्री तो झुंजत होता. स्वतःच्या जीवनावधि कर्माचें फळ पाहण्यासाठीं आणखी कांहीं वर्षे जगण्याची त्याला इच्छा होतीः म्हणून मृत्यूशीं लढाई; परंतु मृत्यु मात करतो. नेहमीं शेवटीं असेंच होते तो गेला. कायमचा गेला. एके काळीं आनंदमय असणाऱ्या त्या घराच्या एका खोलींत जो कायमचा गेला. त्याची विधवा पत्नी बसली आहे. तिला अश्रुहि ढाळवत नाहींत. कारण वियोगाचा तो आघात फारच तीव्र होता. जवळच तिला विळखा घालून तिचा पुत्र बसला होता. अश्रुपूर्ण त्याचे नेत्र होते. कारण पित्यावर त्याचें अपार प्रेम होतें. आईचें समाधान कसें करावें, सांत्वन कसे करावें, तें त्याला समजेना. परंतु तिनेंच त्याला धीर दिला. आपल्या त्या सशक्त तरुण पुत्राला तिने धीर दिला. आपल्या मृदु हातानें त्याचा हात हातांत घेतला.

काळ आणखी पुढे गेला. त्या जुन्या घरानें किती तरी फेरफार पाहिले. आणखी किती तरी पाहवे लागतील. मोटरी आणून ठेवलेल्या आहेत आवारांत ठायींठायीं पोलिस आहेत. काय आहे भानगड ? दोन मुलींना आज अटक व्हायची आहे. म्हणून ती तयारी. त्या मुली इतकीं वर्षे स्वस्थ नव्हत्या बसल्या. परंतु आपल्या वडिलांच्या पावलांवर पावलें टाकीत त्याहि काम करीत होत्या, पाठोपाठ जात होत्या, कुलाची परंपरा सांभाळीत

होत्या आणि यासाठीं पित्याप्रमाणें, भावाप्रमाणे, त्यांनाहि तुरुगांत जाणें प्राप्त होते. अधिकाऱ्यांनीं सभ्यतेनें वॉरंटें दाखविलीं. हंसतमुखानें मुलींनीं तीं घेतलीं. थोड्याशा वस्तु बरोबर घेण्यासाठीं त्या घरांत जरा गेल्या. इतक्यांत ती लहानशी आई आली. तिचे दुबळें आगमन तिला जितक्या त्वरेनें आणूं शकेल, तितक्या त्वरेने ती तेथें आली.

"काय आहे हें सारें ? इतक्या मोटरी, इतके लोक कशाला ?" वडील मुलीने आईच्या भोंवतीं बाहु पसरून हळूच सौम्यपणें सारें सांगितलें. क्षणभर ती कचरली. क्षणभर जरा दुबळेपणा दिसला. तिनें आपल्या मुलींना पोटाशीं धरलें. तिचे डोळे स्रवत होते. आणि कानांत हळूच म्हणाली, "तुमच्याशिवाय सुनें सुनें वाटेल." परंतु हा दुबळेपणा क्षणभरच. पुन्हां तिनें आपला लहानसा देह सरळ केला. आणि एखाद्या हत-बुद्ध सिंहिणीप्रमाणें या नवीन दिव्यालाहि तिनें धैर्यानें तोंड दिलें.

"मला तुमचा अभिमान वाटतो, किती तरी अभिमान वाटतो ! मीहि तुमच्या पाठोपाठ येईन. मी कांहीं तितकी म्हातारी नाहीं."

असें ती म्हणाली; डोळ्यांत चमक आणून म्हणाली. पुन्हां एकदां तिने मुलींना घट्ट हृदयाशीं धरलें आणि त्यांना आशीर्वाद देण्यासाठीं हात वर केले. परंतु ते लहान सुकुमार शरीर ! किती तरी दुःखें वेदना त्यानें सोसलीं होतीं; आतां त्राण उरलें नव्हते. ते शरीर अधिक सहन करूं शकत नव्हते. आशीर्वाद देण्यासाठीं तिने हात वर केले नि ती घेरी येऊन पडली. मुलींना मोटरींत घालून त्यांच्या मुक्कामावर नेण्यांत आलें आणि पुन्हां नित्याप्रमाणें जीवन चालू झालें.

तुरुगांतील एक खोली. सभोंवतीं काळ्या कराल भिंती. त्या खोलींत दोन बहिणी बसल्या होत्या. पूर्वी कधींहि एकमेकींकडे इतक्या ओढल्या गेल्या नसतील. आज समान-बंधन होते. एकमेकींना चिकटून त्या बसल्या होत्या. लोखंडी गजांतून सुंदर लाल आकाशाकडे त्या बघत होत्या. इतकें लाल आकाश त्या अर्थी कोठें तरी भव्य असा सूर्यास्त झाला असेल–या भिंतींच्या पलीकडे झाला असेल. विचारमग्न अशा त्या बसल्या होत्या. एकीच्या मनांत तिच्या घराचे विचार होते. पतीविषयीं, सोडून आलेल्या मुलांविषयीं तिचे विचार होते. आणि दुसरीच्या मनांत काय होतें ? वडिलांचें तें सर्वांना हंसवणारें, सर्वस्पर्शी हास्य, जें सदैव धैर्य नि आशा देई, त्या हास्याची आठवण तिला येत होती. आणि आईने आपल्याजवळ ओढून घेतलें आहे–अशा स्वप्नांत ती होती–आईच्या बाहुपाशांत असावें–ती आई, जी त्या भयाण अजस्र घरांत एकटी आहे, सारे जिला सोडून गेले आहेत.

कड्या सांखळ्या खळखळल्या; दारें उघडलीं. काय हें सारें ? कैद्यांना आश्चर्य वाटलें. त्या बहिणींकडे एक वॉर्डर बाई येते. हातांत तार आहे. भीतीनें हातांत घेतात. नंतर एका क्षणांत हसतात. असें. एकदरींत आईने म्हटल्याप्रमाणें केलें. त्यांची ती

लहानगी शूर आई. तीहि एका दूरच्या तुरुगांत तुरुंगांतील गजांआड जाऊन बसली. किती तिचें धैर्य ! आणि तिला नेणाऱ्यांचे केवढें क्रौर्य !–६५ वर्षांची वृद्ध स्त्री !

आणखी थोडीं वर्षे गेलीं. ज्या घरानें अपार आनद नि अपार दुःख या दोहोंची चव घेतली, त्या घरासमोर प्रचड गर्दी जमली आहे. ती लहानशी आई–एके दिवशीं सायंकाळीं तिनें सुस्कारा सोडला आणि शेवटीं प्राण गेला. शांतपणे, एक शब्दहि न बोलतां ती सदैव दुसऱ्यासाठीं जगली, मरतांनाहि कोणाला तिनें त्रास दिला नाहीं. आणि तेथें ती बिछान्यावर होती. किती सुंदर, जणू जिवत ! पुष्पांनीं अलकृत जणू एखादी राणी; कारण शेवटपर्यंत ती राणीच होती.

मीं एक सुने सुने घर पाहिलें. ज्या बागेची कोणी काळजी घेत नाहीं अशा अस्ताव्यस्त बागेंत तें घर उभे होतें. ना आनंद ना हास्य. सारें हिरावून नेण्यांत आलें होतें. आंत एका खोलींत मुलगा बसला होता. टेबलाजवळ बसून काम; सारखें काम त्याचें चालू होतें. त्याचें जे जीवन गेलें ते सुखाचें नाहीं गेलें; भविष्यकाळांतहि सुख, शांति, विश्रांति त्याला फारशी लाभणार नाहींत. कारण सरळ नि अरुद रस्ता त्यानें निवडला आहे. तेथें मागे वळणें नाहीं. अधूनमधून जेव्हां तो चकलेले डोळे वर करून बघतो, तेव्हां त्या डोळ्यांत एक प्रकारची शब्दातीत खिन्नता दिसते. कारण खरोखरच तो अगदीं एकटा एकटा आहे, तसाच होता. परतु दुसऱ्यांच्या समोर ही शून्यता तो लपवी, आणि आपल्या चिरमधुर स्मितानें, आणि अतिमधुर वर्तनानें सर्वांच्या हृदयांत शिरे.

मी झोंपेतच होतें. अस्वस्थ वाटून मीं कुशी बदलली. माझे हृदय दगडाहून जड झाले होतें. मी जागी झालें होतें का ? ज्या घरावर मी अपार प्रेम करीत होते, त्या घरांत या कित्येक वर्षांत किती फरक ! परंतु ज्या भावाला मी भेटायला आले होतें तो अद्याप तुरुगाबाहेर होता, हे ऐकून किती आनद वाटला ! कारण तो घरांत नसला म्हणजे तें घर घर असें वाटत नसे. मीं माझे डोळे उघडले. वरती त्याच्या खोलींत जाऊन त्याच्याजवळ बोलत बसावें अशी उत्कठा वाटली. मीं माझे पुस्तक उचलले आणि घराकडे जवळजवळ धांवतच गेले. मी घरांत शिरले नाहीं तों टेलिफोन वाजला. मीं तो उचलला. विचित्र आवाजांत एक आले, “एवढेंच तुम्हांला कळवायचें आहे, कीं तुमच्या भावाचा खटला उद्यां सुरू होईल.” “उद्यां खटला ! कोणता खटला !” मी आश्चर्यचकित होऊन विचार करूं लागलें. त्या बातमीशीं माझ्या झोंपाळू मेंदूला जुळवून घेतां येईना. आणि नंतर एका क्षणांत एकदम सारा प्रकाश पडला. भाऊ वर नव्हताच; माझ्यासाठीं वाट पाहणारा भाऊ तेथ कोठें असणार ! मी स्वप्नांत होतें तर. भावाला तर दोन दिवसांपूर्वीच अटक झाली होती.......

मी थकून गेलें होते. मी माझ्या खोलींत गेले. आणि जवळ भावाच्याऐवजीं त्याच्या स्मृति होत्या–गत काळांतील कडू–गोड स्मृति.... !

—वंदे मातरम्—

## पुस्तकावरील अभिप्राय

१ "कित्येक वर्षांत इतकें हृदयाला जाऊन भिडणारें लिखाण वाचलें नव्हतें. या पुस्तकांतील पानापानावर सुंदर विचारांची सृष्टि आहे. महान् घटनांना जणुं चित्ररूप देण्यांत आलें आहे. वाचक त्या त्या प्रसंगाशीं जणुं एकरूप होतो. त्या त्या थोर प्रसंगांना जणूं डोळ्यांनीं आपण बघत आहोंत असें वाटतें. या पुस्तकांत वर्णिलेल्या, व्यक्तींना आपण भेटणार आहोंत असें मनांत येऊन माझ्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे राहिले."

—डॉ. लिन युटांग

× × ×

२ "खरोखरच हृदयंगम पुस्तक"

—रॉय यांचे साप्ताहिक

× × ×

३ " इंग्लंडमधील सुधारणांच्या अभ्यासकाला रोपरनें लिहिलेले मूरचें चरित्र जितकें आनददायक व बोधदायक वाटतें, त्याप्रमाणेंच हिंदी राष्ट्रीय चळवळीच्या अभ्यासकाला हें कृष्णा हाथीसिंगचें पुस्तक वाटेल. "

—रिचर्ड सिमाण्ड्स्—विश्वभारतीमध्ये

× × ×

४ " अपूर्व असा आनंद देणारें स्मृतींचे पुस्तक "

—टाइम्स् ऑफ् इंडिया

× × ×

५ " कृष्णा हाथीसिंगचें हें आत्मचरित्र वाचून वाचकाला ह्या पुस्तकाची पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या आत्मचरित्राशीं तुलना करावी असें साहजिकच वाटेल. दोन्हीं पुस्तकें खरींखुरीं आत्मचरित्रे आहेत. परंतु केवळ आत्मकथेपेक्षांहि त्यांच्यांत कांहीं अधिक आहे......वैयक्तिक आणि सार्वजनिक जीवन, कौटुंबिक आणि राष्ट्रीय इतिहास–सर्वांचे येथें मधुर मीलन आहे. आणि त्यामुळे हीं दोन्हीं चरित्रें उत्कृष्ट कलेचे नमुने झालीं आहेत. हीं चरित्रें राष्ट्रीय वेद आहेत. त्याप्रमाणेच मानवतेनें नटलेलीं अधिकृत अशीं तीं लिखाणें आहेत. कृष्णा हाथीसिंगचें पुस्तक आकारानें लहान आहे. परंतु भावाच्या सुप्रसिद्ध आत्मकथेपेक्षां हे अधिक सहृदय व भावनामय आहे, अधिक उत्कट आहे. कृष्णा हाथीसिंगची भाषाशैली कोमल, परिणामकारक, जरा कावरीबावरी अशी वाटते. जवाहरच्या भाषाशैलींतील ती परिपूर्ण निर्दोषता, तें सामर्थ्य, ती आरसपानी विशुद्धता, येथें नाहीं. ते गुण कृष्णाला अद्याप मिळवायचे आहेत.

" ना खत ना खेद " हें पुस्तक रमणीय आहे. त्याचप्रमाणे तें ओजस्वी आहे, वीरतामय आहे."

डॉ. के आर् श्रीनिवास आयंगार आर्यन पाथमध्ये

× × ×

६ " किती तरी दिवसांपासून तुझ्या पुस्तकाची अपेक्षा करीत होतों. शेवटीं तें मिळालें आणि एकदम वाचून काढलें. वाचून झाल्यावर मग त्यांतील अनेक उताऱ्यांकडे पुनः पुन्हां वळलों. त्यांतील कांहीं भाग मी अनेकदां वाचीन. परंतु सध्यां इतरांना तें वाचायला हवें असल्यामुळें माझ्याजवळ

नाहीं. या पुस्तकावर निर्विकारपणें नि निरपेक्षपणें असा अभिप्राय देणें मला जड जाईल. कारण तुझ्या बाबतींत केवळ निःपक्षपाती दृष्टि मी कशी घेऊं शकेन ? शिवाय ज्या गोष्टी, ज्या घटना तूं वर्णिल्या आहेस, त्या आपल्या सर्वांच्या जीवनांशीं एकरूप झालेल्या आहेत. त्या घटनांकडे मी दुरून कसे वरें पाहू शकेन ? तरीहि अशा परिस्थितींत जितका निःपक्षपाती व त्रयस्थ रीतीचा अभिप्राय देतां येणे शक्य आहे, तेवढा देण्याचा प्रयत्न करतों.

मला पुस्तक आवडलें. तें सहज सोपारें असें आहे. वाचकाची तें पकड घेते. तुझें लिहिणें सुंदर आहे याचा हा पुरावाच आहे. पुष्कळ वेळां स्वतःविषयीं लिहितांना कृत्रिमता येते; मोकळेपणा नसतो. परंतु तू हे दोष टाळले आहेस आणि त्यामुळे तुझें पुस्तक अकृत्रिम असे झालें आहे. तेथें सहजसुंदर ओघ आहे, संस्फूर्तता आहे. तुझ्या भाषाशैलीचा, एकंदर लिखाणाचा दर्जा बराच वर लागेल. पुष्कळ उतारे हृदय विरघळवणारे आहेत. फारच सुंदर रीतीनें ते लिहिले गेले आहेत. परंतु ही उची सदैव सर्वत्र नाहीं कधीं कधीं तूं खालीं आली आहेस; परंतु गोडगोड शब्दजाळाच्या पाठीमागें लपण्यापेक्षां तू स्वतःचें मनोगत प्रकट करण्यासाठीं धडपडत आहेस, कळकळीने प्रयत्न करीत आहेस. असें पाहुन मनाला समाधानच वाटते. वर्णनाची व लिखाणाची उत्तुंगता राहिली नसली, तरी प्रांजळ प्रयत्नाचे स्वागत करावेसे वाटते. तुझे पुस्तक मर्यादित आहे. तूं जें चित्र काढूं पाहत आहेस, त्याला तं मर्यादित चौकट घातलेली आहेस. त्या मर्यादित फलकावर तूं शब्दचित्र लिहित आहेस. तुझें पुस्तक मुख्यतः कौटुंबिक कथा आहे. आणि ही कथाहि नीट सुसंबद्ध अशी न लिहितां तूं जणूं विविध दर्शनें दाखवीत आहेस; कांहीं वेचक प्रसंग निवडून त्याभोंवतीं ही कथा तूं गुंफिली आहेस. तसेच चरित्र असो वा आत्मचरित्र असो. आत्म्याची धडपड हा जो त्यांतील महत्त्वाचा भाग असतो, त्यांत तूं फारशी खोल गेली नाहींस. परतु तूं तसे करूं लागतीस, तर पुस्तकाची मर्यादा ओलांडावी लागली असती. आणि इतरहि अनेक अडचणी आल्या असत्या. तूं जी ही विशिष्ट रीति निवडलीस, विशिष्ट विणावट निवडलीस, ती चांगलीच गोष्ट केलीस.

तुला या पुस्तकानें अभिमान वाटला, आनंद वाटला, तर तें योग्यच आहे असें मला वाटतें. तो अभिमान, तें समाधान अकारण नाहीं. तुझ्या या पुस्तकांत सर्वत्र एक खिन्न अशी छटा आहे. दुर्दैव आपल्या पाठीस

लागलें आहे असा भास सर्वत्र होतो. तुझ्या मनोबुद्धीचें हें यथार्थ प्रतिबिंब आहे. आणि पुष्कळांची मनोरचना तुझ्याप्रमाणेंच बहुधा असते. ज्या वेळेस आपण गतगोष्टींकडे पाहतों, तो सारा भूतकालीन नकाशा पुन्हां डोळ्यांसमोर उघडतों, तेव्हां साहजिकच मनांत असें येऊन जातें. तूं पुस्तकाला नांव तर "ना खंत ना खेद" असें दिले आहेस आणि नांवाप्रमाणें मधून-मधून दैवाला तूं आवहनहि दिलें आहेस आणि तेच योग्य आहे. कारण या आत्मकथात्मक लिखाणांत जर कांहीं अर्थ असेल तर तो हाच. आपण सदैव दैवाशीं झुंजत होतों, त्याला जुमानीत नव्हतों. त्याच्यापुढें नमून जात नव्हतों; आणि जें जें नशिबीं आलें तें कुरकुर न करतां स्वीकारीत होतों. सूत्रें दैवाच्या हातीं नसून आपल्या हातीं होतीं. आपण बाहुलीं नव्हतों. आपण आरंभ करीत होतों, पावलें पुढें टाकायला निघत होतों. पुढें काय होणार याचें ज्ञान जरी आपणांस दिलेलें नसलें, तरीहि परिणाम काय होतील, काय फळें भोगावीं लागतील याची अटकळ आपणांस असे. तरीहि आपण पुढें जात होतों. आणि म्हणून प्रसगविशेषीं आपले जीवन जरी कठिण वाटलें, कष्टमय वाटलें, तरी त्यानें आपणांस धक्का बसला नाहीं; आपण वादळांत एकदम सांपडलों असे वाटलें नाहीं. मनाची अशी वृत्ति ठेवण्यांत आपणांस कितपत यश आलें ते आपणच कसें ठरवायचें ? तें अशक्य आहे.

तुझें पुस्तक प्रसंगविशेषीं फारच उठावदार झालें आहे. माझ्या मनांत शेंकडों गतस्मृति साकार होऊन उभ्या राहत. सारा भूतकाळ डोळ्यांसमोर उभा राही. एक प्रकारची अधुक हुरहुर वाटे. आनदभवनाची आठवण होई. आपणाशीं ज्यांचा परिचय नाहीं, अशा तिऱ्हाइतांवर या पुस्तकाचा काय परिणाम होईल तें मला माहित नाहीं. परंतु आपणाविषयीं किती तरी लोकांना उत्सुकता वाटत असते; आपलेपणा वाटत असतो. ते हजारों लोक तुझें पुस्तक आनंदानें वाचतील. त्यांच्या हृदयांतील भावनांना जणूं तूं मूर्त केलें आहेस. त्यांच्या भावनांचें प्रतीक जणुं तुझें पुस्तक आहे.

डॉ. महमुद येथें आहेत. त्यांनींहि तुझें पुस्तक मोठया गोडीनें वाचलें. पुस्तकांतील व्यक्तींशीं दीर्घ परिचय असल्यामुळें त्यांनाही पुस्कक वाचतांना खूप उल्हास नि उत्साह वाटत होता. त्यांनीं तें पुस्तक डोळसपणानें वाचलें. गुणदोष पाहण्याच्या दृष्टीनें वाचलें. तरीहि त्यांना तें आवडलें. ते म्हणाले, " यांतील कांहीं कांहीं भाग तर मी कधीं विसरणार

नाहीं." तूं असेंच लिहीत जाशील, तर सुंदर शब्दांची गुंफण करणारी तूं मोठी कलाकार होशील असें त्यांचें मत आहे. सुखमय प्रसंगांपेक्षां करुण प्रसंगच तूं अधिक सुंदर रंगवतेस. आणि महमूद म्हणतात, कीं खऱ्या कालावंताचें हेंच लक्षण. त्यांनीं पुस्तक संपवलें त्या वेळेस रात्र होती. त्यांचे हृदय भरून आलें होतें. त्यांच्या डोळ्यांत अश्रु होते. ते म्हणाले, "हिंदी स्त्रीला जवळच्या मंडळींविषयीं, प्रिय माणसांविषयीं जें निरपेक्ष प्रेम वाटते, त्या प्रेमाचा पूर या पुस्तकांत वाहतांना दिसतो. हिंदी स्त्रीच्या हृदयाचे हें विशिष्ट स्वरूप या पुस्तकांत प्रतीत होतें."

—जवाहरलाल नेहरू

# देशमुख आणि कंपनीचीं आगामी प्रकाशनें